

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५४ । अंक ३-४ । डिसेंबर २०००–जानेवारी २००१

अपूर्ण क्रांती

रा. भा. पाटणकर

[illegible] पाश्चात्त्य समाज हे उन्नत, प्रगत, [illegible] व समर्थ आहेत. याचे कारण त्यांनी [illegible] केलेली आधुनिक मूल्ये, वृत्ती व रीती; त्यांनी [illegible] सामाजिक व भौतिक शास्त्रे; तसेच, त्यांची तंत्र[illegible] आणि आर्थिक शक्ती. आपण पारतंत्र्यात होतो ही [illegible] खरी. त्यांनी आपले शोषण केले [illegible] खरे. पण त्यांच्यापासून आम्ही [illegible] धडे घेतले. ते आत्मसात करण्याची गरज होतीच. आणि त्यांचे राज्य प्रस्थापित झाले नसते तर [illegible] आम्ही आधुनिक युगात प्रवेश [illegible] शकलो नसतो. आम्ही 'निर्वसाहतीकरणा'च्या [illegible] दृष्टीआड करणारी देशीवादी भूमिका [illegible] व कृतघ्न आहे. प्रा. पाटणकरांनी [illegible] या अभ्यासपूर्ण ग्रंथात आपले हे [illegible]

अपूर्ण क्रांती

रा. भा. पाटणकर

अनुक्रमणिका








प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५४। अंक ३-४। डिसेंबर २०००–जानेवारी २००
मार्गशीर्ष-पौष, पौष-माघ, शके १९२२
किंमत रु. ३०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका








# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

# मेघश्याम पुंडलीक रेगे

२८ डिसेंबर २००० च्या उत्तररात्री झोपेतच मे.पुं. रेगे यांचे प्राणोत्क्रमण झाले. फार म्हणजे फारच अनपेक्षित अशी ही घटना होती. एका पातळीवर मृत्यूच्या घटनेचा स्वीकार करण्यावाचून गत्यंतर नसतेच. आपल्या अवतीभवती ते अजूनही आहेत असे वाटत राहण्याचे अजून थांबलेले नाही.

*नवभारत* मासिकाशी त्यांचा संबंध खूप वर्षांपासूनचा. प्रथमतः, प्रा. गोवर्धन पारीख संपादक असताना, कार्यकारी संपादक म्हणून; प्रा. पारीख यांच्या निधनानंतर संपादक म्हणून; आणि अलीकडे संपादकत्वाच्या जबाबदारीमधून मोकळेपण मिळाल्यावरही लेखक म्हणून त्यांचा संबंध पूर्वीइतकाच, किंबहुना कांकणभर अधिकच सक्रिय राहिला. आम्ही हक्काने त्यांच्याकडे लेखाची मागणी करीत होतो, आणि त्यांनाही *नवभारत*साठी लेखन करणे आवडायचे...

*नवभारत*च्या विद्यमान संपादक-मंडळांपैकी सर्वश्री अ.र. कुलकर्णी, एस.डी. इनामदार व अ.ना. ठाकूर हे रेगेसरांचे मराठी विश्वकोश निर्मितीच्या कार्यातही अनेक वर्षे सहकारी होते. त्यांची विद्वत्ता, अनेक विषयांमधील त्यांची गती, त्यांची परिपक्व व प्रगल्भ समज, अवघड विषयही चोख व सुबोध मराठी भाषेतून मांडण्याची विलक्षण क्षमता, तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील त्यांचा अधिकार याने वास्तविक कोणाचीही छाती दडपून जावी. जाणत्यांना त्यांचा एक धाक नक्कीच वाटे. पण त्यांच्याबरोबर काम करताना आम्हाला सदैव अनुभवास आली ती सहृदयता, सौजन्यवृत्ती आणि त्यांची समत्वबुद्धी. खऱ्या अर्थाने ते आम्हा सर्वांचे 'मार्गदर्शक, तत्त्वज्ञ आणि मित्र' (guide, philosopher and friend) होते. अशा वडीलधाऱ्या माणसाचे प्रेमळ व क्षमाशील छत्र इतःपर डोक्यावर नसण्याचा अभाव दीर्घकाळ जाणवत राहील.

काही विषयांवर *नवभारत*साठी त्यांनी खास लेखन करावे याविषयी अलीकडे बोलणे झाले होते. त्यांचे सुहृद प्रा. रा.भा. पाटणकर यांच्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकाच्या निमित्ताने त्यांना भारतीय समाजाने परकीय अंमलाला जो अंशतः तरी सर्जक प्रतिसाद दिला त्याबद्दल लिहावयाचे होते. वैचारिक जगतामध्ये काही काही भूमिका एकेका काळात प्रभुत्व गाजवितात, आणि त्यांची चटकदार, आक्रमक मांडणी करणारे प्रसिद्धीच्या झोतात चमकतात. 'निर्वसाहतीकरणा'च्या विषयातही अशा काही उथळ भूमिकांना नको इतके प्रामाण्य प्राप्त होत आहे, असे रेग्यांचेही मत आहे अशी छाप मनावर उमटली होती. डिसेंबरअखेर वाईला आल्यावर त्यांचा लेख ते लिहिणार होते. अमर्त्य सेन यांच्या *इकॉनॉमिक्स अँड एथिक्स* या पुस्तकाचे समीक्षण करण्याचे त्यांच्या मनात होते. अलीकडे चार्ल्स टेलर या अवल तत्त्वज्ञांच्या *सोर्सीस ऑफ सेल्फ* या महत्त्वपूर्ण ग्रंथावर रेग्यांनी वाईला अभ्यासवर्ग घेतला होता. या ग्रंथातील टेलर यांच्या मांडणीचा मराठी वाचकांना परिचय करून देण्याचे त्यांच्या मनात होते. आणि, या सर्वांच्या जोडीला, त्यांचा आवडता तत्त्वज्ञ कांट याच्या धर्मविषयक मांडणीला मध्यवर्ती ठेवून कांटची एकंदर भूमिका तपासून पाहण्याचे काम ते मराठी जिज्ञासूंसाठी करणार होते. जिज्ञासू वाचकांसाठी मराठी भाषेतून लिहिणे, अशा लेखनाद्वारे संवाद वाढवीत प्रबोधन करणे, एकूणच मराठीमधून सकस पण सुबोध लेखन करणे ही रेग्यांना मोठी भावणारी, समाधान देणारी कृती होती. आणि त्यांना लिहिते करण्याला व *नवभारत*मधून त्यांचे लेखन प्रसिद्ध करण्याला आम्ही नेहमीच उत्सुक असायचो.

विचारविमर्शाची उंची, खोली व व्याप्ती वाढविण्याऱ्या श्रेष्ठ गुणवत्तेच्या लेखनाला रेग्यांच्या मृत्यूने आपण कायमचे मुकलो आहोत, आणि ही हानी सहज भरून येणारी नाही.

मे.पुं. रेगे यांना आमची श्रद्धांजली.

संपादक मंडळ

***नवभारत***



अनुक्रमणिका

# वासाहतिक कालखंड आणि नंतर : लाभ-नुकसानीचा ताळेबंद

## प्रास्ताविक

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी जन्मशताब्दीवर्षातल्या कार्यक्रमाचा भाग म्हणून शारदोत्सवाचे प्रसंगी (४ ते ६ ऑक्टोबर २०००) "वासाहतिक कालखंड आणि नंतर : वैचारिक-सांस्कृतिक प्रक्रिया" या विषयावर प्राज्ञपाठशाळा-मंडळाने तीन दिवसांचे चर्चासत्र आयोजित केले होते. अलीकडेच नामवंत ज्येष्ठ समीक्षक प्रा. रा.भा. पाटणकर यांनी 'निर्वसाहतीकरण' हा विषय मध्यवर्ती ठेवून *अपूर्ण क्रांती* (मौज प्रकाशन गृह, मुंबई १९९९) हा अभ्यासपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथातील त्यांचे विवेचन वरील चर्चासत्रात सहभागी होणाऱ्यांनी ध्यानात ठेवावे अशी कल्पना होती.

या चर्चासत्रामध्ये निबंध सादर करण्याचे निमंत्रण देणाऱ्या पत्रात प्रा. मे.पुं. रेगे यांनी लिहिले होते :

"भारतात ब्रिटिश-पूर्वकाळात येथे दीर्घकाळ सुदृढ स्वरूपात एक समाजव्यवस्था – राजकीय-आर्थिक परिमाणांसह – कार्यरत होती. हिला उद्देशून 'परंपरा' असा शब्द वापरला तर ब्रिटिश राजवटीने आणलेल्या नव्या व्यवस्थेला 'नवता' म्हणता येईल. परंपरा आणि नवता यांच्यातला परस्पर आघात-प्रत्याघात, देवाण-घेवाण, लाभ-नुकसान यांची चर्चा वर्तमानकाळाच्या व नजीकच्या भविष्याच्या आलोकात करण्यावर चर्चासत्राचा भर राहावा असे योजिले आहे."

या चर्चासत्रासाठीच्या पत्रकात म्हटले होते : "व्यापारी म्हणून इंग्रज सतराव्या शतकाच्या आरंभी येथे आले. कालांतराने १७५७ ते १८४० या काळात भारतावर ब्रिटिशांची राजवट प्रस्थापित झाली. त्यावर १८५७ साली शिक्कामोर्तब झाले. १९४७ पर्यंत ब्रिटिशांचे राज्य चालले. स्वातंत्र्य मिळाल्याला आता पन्नासहून अधिक वर्षे लोटली.

"जेत्या इंग्रजांच्या समाजव्यवस्था व संस्कृती यांचा आघात वासाहतिक कालखंडात भारतावर खोलवर व सर्वांगांनी झाला. आधुनिक औद्योगिक-तंत्रवैज्ञानिक, तसेच राजकीय-आर्थिक संस्था, रीतीभाती, विचार यांच्या चौफेर आघाताला येथील समाजाने, विशेषतः येथील पारंपरिक धुरीण वर्गांनी, कसा प्रतिसाद दिला, या प्रक्रियेत काय कमावले व काय गमावले हा आज एका अटीतटीच्या महाचर्चेचा विषय बनलेला आहे. एका अर्थी ही महाचर्चा, आधी नसली तरी, किमानपक्षी, एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून वेगवेगळ्या अंगांनी उपस्थित आहेच असे म्हणता येते.

"ज्येष्ठ समीक्षक व सौंदर्यशास्त्री प्रा. रा.भा. पाटणकर यांनी या विषयावर महाराष्ट्राला – मुख्यत्वेकरून पश्चिम महाराष्ट्राला – मध्यवर्ती ठेवून *अपूर्ण क्रांती* हा ग्रंथ लिहिला आहे. आर्थिक, शैक्षणिक व साहित्यिक अशा तीन अंगांनी त्यांनी या कालखंडातील स्थित्यंतरांचा तपशीलामध्ये जात ऊहापोह केला आहे.

"चर्चासत्रासाठी त्यांचे *अपूर्ण क्रांती* हे पुस्तक, एक आधारभूत निबंध/मांडणी म्हणून डोळ्यांसमोर ठेवले आहे. अर्थातच, चर्चा या ग्रंथाच्या परीक्षणाच्या मर्यादेत राहावी अशी कल्पना नाही. तसेच, महाराष्ट्र हा विचारासाठी मुख्य प्रदेश व समाज मनात असला तरी भारतात अन्यत्र काय घडले याचाही विचार प्रस्तुत असेल."

या चर्चासत्रामध्ये प्रा. श्री.मा. भावे, प्रा. हरिश्चंद्र थोरात, प्रा. नीरज हातेकर यांनी निबंध सादर केले. प्रा. मे.पुं. रेगे, प्रा. अभंग, प्रा. सीताराम रायकर आणि श्री. वसंत पळशीकर यांनी काही विषयांची मांडणी केली. चर्चासत्रासाठीच्या विषयावर *नवभारत*चा एक मोठा विशेष अंक प्रसिद्ध करावा असे ठरविले होते. २८ डिसेंबर २००० रोजी प्रा. रेगे यांचे आकस्मिक निधन झाल्यामुळे, त्यांचे विवेचन लिखित स्वरूपात आपणांस आता कधीच उपलब्ध होऊ शकणार नाही याचे आम्हांला अतीव दुःख आहे. प्रा. नीरज हातेकर यांनी त्यांचा मूळ निबंध इंग्रजीत लिहिला होता. त्याचे भाषांतर यथावकाश प्रसिद्ध होईल.

प्रा. पाटणकर यांच्या ग्रंथातील विवेचनाचा, शक्यतोवर, त्यांच्याच शब्दांत सलग सारांश स्वतंत्रपणे दिला आहे. खेरीज, प्रा. अशोक जोशी (गोवा विद्यापीठ) यांचा *अपूर्ण क्रांती* वरील परिचयपर लेखही या अंकात प्रसिद्ध करीत आहोत.



अनुक्रमणिका

# इंग्रजी राज्याची प्रस्थापना आणि त्याचा आघात

वसंत पळशीकर

### १. साम्राज्ये आणि वसाहती

साम्राज्ये प्राचीन काळीही होती. रोमन साम्राज्य आपल्याला सुपरिचित आहे. भारताच्या इतिहासातही प्राचीन तसेच मध्ययुगीन काळात साम्राज्ये म्हणावीत अशी मोठी राज्ये होऊन गेली – अशोककालीन मौर्य साम्राज्य, मध्ययुगातले मुघल साम्राज्य, विजयानगरचे साम्राज्य.

एक राज्य बलिष्ठ बनते, ते स्वतःच्या सत्तेचा विस्तार करीत जवळचे-लांबचे प्रदेश आणि त्यांमध्ये राहणारे लोक यांच्यावर स्वतःचे राजकीय-आर्थिक प्रभुत्व प्रस्थापित करते. पण इथेच मामला थांबत नाही. केंद्रवर्ती सत्ता आणि अंकित प्रदेश यांच्यात श्रेष्ठ-कनिष्ठ, प्रधान-गौण, स्वाश्रयी-परावलंबी, शोषक-शोषित असा संबंध प्रस्थापित होतो. म्हणजे, जो सत्ताधीश समाज असतो त्याच्या सर्वांगीण भरभराटीसाठी, वैभवशाली बनण्यासाठी, त्याचे प्रभुत्व टिकविण्या-वाढविण्या-साठी इतर प्रदेश, त्यांच्या अर्थव्यवस्था यांचे अस्तित्व आहे, असा तो संबंध बनतो. या पलीकडे जाऊन, साम्राज्यसत्ता प्रस्थापित करणारा समाज सामाजिक रचना, वैचारिक आलोक, सांस्कृतिक घाट या अंगांनी इतरांसाठी अनुकरणीय नमूना ठरतो. तो लादलाही जातो; आणि, कोणी बळजबरी न करताही, त्याचे अंधानुकरण केले जाण्याची प्रवृत्ती पण उत्पन्न होते. असे जे अंकित प्रदेश व समाज त्यांना उद्देशून 'वसाहती' हा शब्द या विषयाच्या चर्चाविश्वात वापरला जातो.

'वासाहतिक आणि उत्तर-वासाहतिक कालखंड' हा वाद-विषय आज महत्त्व पावला आहे त्याचा संदर्भ, व्यवहारात, आधुनिक युगात युरोपीय राष्ट्रांनी जगभर स्थापन केलेल्या साम्राज्यांशी, आणि ती साम्राज्ये लयास गेल्यानंतर आकारास आलेल्या व्यवस्थेशी, बव्हंशी आहे. जे समाज या राष्ट्रांनी अंकित केले, ज्यांचे वसाहतीकरण केले ते 'आधुनिकपूर्व' समाज होते तर युरोपीय सत्ता या 'आधुनिक समाजा' मध्ये रूपांतरित होत होत्या.

पुष्कळदा हे ध्यानात घेतले जात नाही की, जगभरचे प्रदेश व समाज अंकित करण्याची प्रक्रिया आणि युरोपचे 'आधुनिक समाजा'मध्ये रूपांतर होण्याची प्रक्रिया या समकालीन तर आहेतच, पण एक दुसरीवर अवलंबून असलेली प्रक्रिया आहे. उदाहरणार्थ, सर्वंकष केंद्रीभूत राज्यसत्तांचा (Absolutist Modern State) उत्कर्ष ही आधुनिक युगाला जन्म देणारी, व आधुनिक युगाचे व्यवच्छेदक लक्षण असलेली घडामोड पंधराव्या शतकात सुरू झाली. पण साम्राज्यविस्तारा-शिवाय या राज्यसत्तेचा उत्कर्ष होऊच शकला नसता. तसेच, तथाकथित व्यापारी कंपन्या या वस्तुतः उदयोन्मुख सर्वंकष राजेशाही सत्तांच्या राजकारण-अर्थकारणाचे एक फार महत्त्वाचे साधन/हत्यार होत्या. या व्यापारी कंपन्यांनीच साम्राज्ये प्रस्थापित केली. व्यापारी कंपन्यांचा साम्राज्यविस्तार आणि आधुनिक काळाचे मर्मस्थान असलेली 'औद्योगिक क्रांती' यांचा घनिष्ठ आंतरसंबंध आहे, आणि तो अनेक पदरी व व्यामिश्र आहे.

ज्या विभिन्न समाजांना व त्यांच्या प्रदेशांना साम्राज्य-निर्मितीच्या व विस्ताराच्या काळात अंकित केले गेले ते समाज बहुविध होते. ते एकसारखे तर नव्हतेच; पण त्या सगळ्यांचे वर्गीकरण कोणतीही एक फूटपट्टी वापरून प्रगल्भ, रानटी, प्रगत, अप्रगत अशा प्रकारे करणे शक्य व योग्यही नाही. पण या सर्वांना उद्देशून 'आधुनिकपूर्व' समाज असे म्हणता येईल. तसेच, एक ना एका आधुनिक युरोपीय साम्राज्यसत्तेशी त्यांचा संबंध वसाहत असा होता; या अर्थाने 'वसाहती' असे ही त्यांचे एक वर्गीकरण करता येते.

### २. ब्रिटन आणि भारत

भारताच्या किनाऱ्यावर प्रथम येऊन पोचले ते पोर्तुगीज. त्या काळी स्पेन व पोर्तुगाल हे दोन सर्वाधिक बलिष्ठ देश होते. व्यापार, लूटालूट, (ख्रिश्चन) धर्मप्रसार व प्रभुत्वप्रस्थापना या दृष्टीने त्यांनी जग वाटून घेतले होते. या दोन राष्ट्रांचे डोळे दिपवून टाकणारे वैभव पाहून इतर युरोपीय राष्ट्रांनी त्यांचे अनुकरण केले. या ओघातच आधुनिक राष्ट्र अशी यांची जडणघडणही पक्की झाली. ब्रिटन (किंवा इंग्लंड) हे








तसे आरंभी या स्पर्धेत मागे असलेले राष्ट्र होते. स्थूलमानाने आपण असे म्हणू शकू की अठराव्या शतकाच्या आरंभापावेतो क्रमशः भारतीय उपसागरात ईस्ट इंडिया कंपनी (म्हणजेच इंग्लंड) ही युरोपीय 'व्यापारी' कंपन्यांमध्ये वरचढ बनली. समुद्रावरील नाविक वर्चस्वासाठी चाललेल्या सशस्त्र स्पर्धेत इंग्लंडची सरशी होत गेल्याचा तो एक लाभ होता. 'बळी तो कान पिळी' या निर्घृण न्यायाला अनुसरून.

ईस्ट इंडिया कंपनी ही केवळ व्यापारातल्या नफ्यासाठी कार्य करणारी कंपनी म्हणून तिचा विचार कोणत्याच कालखंडात करणे योग्य नाही. नवोदित युरोपीय राष्ट्रसत्तांचा परस्परांमध्ये वर्चस्वासाठी संघर्ष चालला होता त्याचा व्यापारी चढाओढ हा एक अंगभूत भाग होता, आणि व्यापारासाठीही जगातले प्रदेश मक्तेदारीने स्वतःच्या अंकित करण्याचे उद्दिष्ट आरंभापासूनच होते. यासाठी स्वकीय राज्यसत्तांची पूर्ण साथ व पुष्टी या व्यापारी कंपन्यांना होती. मक्तेदारी प्रस्थापित करण्यासाठी समुद्रावर उघडपणे युद्ध, चांचेगिरी चाले. भारताच्या भूमीवर जी प्रस्थापित राज्ये होती त्यांच्यावर यासाठी वेगवेगळ्या मार्गांनी दबाव आणण्याचे राजकारण आरंभापासूनच आढळते. या प्रकारचे या कंपन्यांचे व्यवहार जाणूनच छत्रपती शिवाजीमहाराजांनी आरमाराच्या उभारणीचे कार्य हाती घेतले, ही गोष्ट विसरता कामा नये.

ज्या प्रदेशातील राज्यसत्ता (म्हणजे राजा वा मुघल सुभेदार वा नवाब*) दुबळी असेल तिथे स्वतःची व्यापारी मक्तेदारी राजमान्यतेसह प्रस्थापित करणे हे पहिले पाऊल. यासाठीचे दरबारी राजकारण हिकमतीने केले जाई. एकदा मक्तेदारी प्रस्थापित झाली, विशेष सवलती पदरात पाडून घेतल्या की मग जोरजबरदस्ती, दंडेली, लूटमार, पिळवणूक करण्यात कोणतीच शरम नसे. या सर्व गोष्टी करताना, ईस्ट इंडिया कंपनी ही एका दूरस्थ पण प्रबळ राज्यसत्तेची अधिकृत प्रतिनिधी म्हणून व्यवहार करीत होती, सैन्य बाळगीत होती, स्थानिक कायदे, न्यायव्यवस्था जुमानत नव्हती. म्हणून, प्लासीच्या लढाईनंतर ठळकपणे चित्र बदलले हे म्हणणे ठीक असले तरी, तोपर्यंतच्या दीडशे वर्षांच्या काळात कंपनी ही एक निरुपद्रवी, निरागस व्यापारी मंडळी होती या भ्रमात राहू नये.

युरोपीय व्यापारी कंपन्यांची वखारींची मुख्य ठाणी ही केवळ व्यापारी ठाणी न राहता ती स्वायत्त व प्रतिस्पर्धी राज्ये बनू पाहतात, आणि या उद्देशांने तटबंदी उभारतात, सैन्य बाळगतात याचा अंदाज एतद्देशीय राजवटींना आला तेव्हा काही वेळा तंटेबखेडेही उत्पन्न झाले. मुघल साम्राज्यसत्ता प्रबळ व सुसंघटित होती तोवर, इतकेच नाही तर शिवाजीमहाराजांचे 'मराठा स्वराज्य' किंवा आदिलशाही, कुतुबशाही ही विजयनगर साम्राज्याची वारसदार राज्येही नष्ट झाली नव्हती, समर्थ होती त्या काळात ईस्ट इंडिया कंपनीवर वचक टिकून होता. पण, दुर्दैवाने, मुघल साम्राज्य खिळखिळे होऊन व्यवहारात मोडून पडले – कागदावर बादशाही अंमल थेट १८५७ पर्यंत राहिला – तेव्हा पोकळी निर्माण झाली. एका पर्यायी समर्थ, सुव्यवस्थित व दूरदर्शी राज्याची – खरे तर साम्राज्याची – उभारणी करून ती पोकळी भरून काढण्याची संधी मराठ्यांना होती. पेशव्यांच्या कुळात पहिला बाजीराव, राघोबादादा, थोरले माधवराव असे पेशवे व दाभाडे, गायकवाड, शिंदे, होळकर, रघूजी भोसले आदि सरदार कर्तबगार लढवय्ये निपजले. त्यांच्या कर्तृत्वामधून, डोलारा वरून कायम राहिला तरी पण मुघल बादशाही आतून पार पोखरून निघाली. मुघल बादशाहीने एका पद्धतीने जवळजवळ सर्व हिंदुस्थान एका छत्राखाली आणला होता आणि, तणावपूर्ण का असेना, हिंदू व मुसलमान सरदारांना एका राज्यव्यवस्थेचे घटक बनविले होते. साऱ्या हिंदुस्थानला डोळ्यासमोर ठेवून, समग्र व दूरदर्शी दृष्टी व लक्ष्य बाळगून मुत्सद्दी नेतृत्व करण्याची क्षमता व कर्तृत्व प्रकट करण्याची ऐतिहासिक भूमिका मराठ्यांकडे चालून आली होती. पण शिवाजीमहाराजांचा वारसा चालवू शकेल असा कोणी पुरुष नंतरच्या काळात उत्पन्न झाला नाही. मराठ्यांच्या उपस्थितीमुळे अन्य कोणी ही भूमिका वठवू शकत नव्हता, इतका हिंदुस्थानचा सारा मध्यवर्ती प्रदेश मराठ्यांच्या वर्चस्वाखाली या सर्व काळात होता!

हे चित्र जसे उलगडत चालले, त्याने निर्माण झालेल्या संधी जशा समोर आल्या, गादीवर कोणी बसायचे यावरूनच्या तंट्यांमध्ये मदतीसाठी आमंत्रणे येऊ लागली, आश्रयासाठी कंपन्यांच्या ठाण्यांकडे राज्यासाठीचे उमेदवार वा धनिक व्यापारी धावा घेऊ लागले तशा कंपनीच्या चाणाक्ष, जाणत्या व मुत्सद्दी नोकरांच्या ठायी व्यापारी उद्दिष्टांसाठी राजकीय प्रभुत्व प्रस्थापित करण्याच्या आकांक्षा उत्पन्न झाल्या. कारण

* मुघल साम्राज्यसत्ता समर्थ व कार्यक्षम होती तोवर थेट बादशहाचा अंमल चाले.



अनुक्रमणिका

ते वळण आधीपासूनच होते. दुसऱ्या कोणत्याही राज्याचे सर्व हिंदुस्थानभर प्रभुत्व प्रस्थापित होऊ नये, स्वतःच्या महत्त्वाकांक्षांना शह बसेल अशी एकजूट त्यांच्यात होऊ नये याची खबरदारी कंपनीने घेतली. एतद्देशीय राजेरजवाड्यांच्या सार्वभौम सत्तेचा मुखवटा कायम ठेवून राज्यकारभारावर स्वतःचे प्रभुत्व प्रस्थापित करणारे, कंपनीला महसुली उत्पन्न मिळवून देणारे करारमदार करण्याचे राजकारण किती हिकमतीने, लबाडीने, धोरणीपणाने केले गेले त्याचा इतिहास सांगत बसण्याची गरज नाही.

एतद्देशीय हिंदू व मुसलमानी राजवटींचा पराभव का झाला? त्यांना कालांतराने मांडलिकत्व तरी प्राप्त झाले वा ती नामशेष झाली, याचे कारण काय? या प्रश्नांचा खल आज जवळपास पावणेदोनशे वर्षे तरी चालला आहे. युरोपीय राज्ये हीदेखील या काळात राजेशाहीच होती. तेथे सरंजामशाही व्यवस्था प्रभावी होती. पण आधुनिक सर्वंकष केंद्रीभूत राज्यसत्ता ही गुणात्मकदृष्ट्या वेगळी संरचना तेथें उत्पन्न झाली व तिची संघटनसूत्रे वेगळी होती.

हे गुणात्मक अंतर काय होते याची बऱ्यापैकी कल्पना शिवाजीमहाराजांच्या 'स्वराज्या'च्या संघटनेवरून, संरचनेवरून येऊ शकते. शहाजीराजे भोसले तत्कालीन कर्तृत्ववान सरदारा-प्रमाणे वागले. निजामशाही त्यांना तगवता आली नाही तेव्हा ते आदिलशाहीचे सरदार बनले. आदिलशाहीतही त्यांची कुचंबणा केली जाऊ लागली तेव्हा त्यांनी पार दक्षिणेत जाऊन मुलुखगिरी करून तिथे आपले बस्तान बसविले. त्या आधारे पुढे तंजावर संस्थान अस्तित्वात आले. पण शिवाजी-महाराजांनी प्रादेशिक-सांस्कृतिक-धार्मिक घटकांना एकत्र करून, मुसलमानी राजवटींच्या परधर्मीय/परकीय वर्चस्वाखाली आपणास दबलेल्या अवस्थेत राहायला लागते याविषयीच्या हिंदू समाजात खोलवर खदखदत राहणाऱ्या असंतोषाच्या आधारे अस्मिता जागवून 'स्वराज्या'ची संकल्पना राबविली. उच्चनीच स्थानी असलेल्या, विषम वागणूक अनुभवणाऱ्या विभिन्न जातिजमातींच्या लोकांमध्ये स्वराज्यसंस्थापनेसाठी सामंजस्य, एकरसता व निष्ठा उत्पन्न केली; अनेक भेदांपलीकडे पोचणारे राष्ट्रप्रेम उत्पन्न केले; जीवनाला एका उच्च ध्येयाची प्राप्ती करून दिली. यासाठी आवश्यक, इष्ट व उपकारक मानस निर्माण करण्याचे काम प्राधान्याने वारकरी चळवळीने, समर्थ रामदासांनी, पण इतरही बुवाबैरागी यांनी केले. उत्तरेकडून झालेल्या कडव्या, हिंस्र व राजकीय-धार्मिक मुस्लिम आक्रमणाचा आघात अनुभवल्यावर, जाणीवपूर्वक, स्वतःचा समाज सावरून धरण्याचे, त्याचे नीतिधैर्य वाढवण्याचे उद्दिष्ट डोळ्यासमोर ठेवून त्यांनी ते केले असे दिसते. या कारणाने बलाढ्य महासत्ता असलेल्या मुघल साम्राज्यसत्तेविरुद्ध शिवाजी-महाराजांना, एका सीमित प्रदेशात का होईना, भक्कम उभारणी करता आली. या उभारणीत एवढी शक्ती व ऊर्जा होती की, शिवाजीमहाराजांच्या निधनानंतरही, औरंगजेब बादशहाला प्रदेश जिंकता आला पण स्वराज्य निर्मूल करता आले नाही; तोच पराभूत झाला. शिवाजीमहाराजांनी राज्याची जी घडी बसवली तिला प्रचंड हादरे बसले. पण ती जेवढी टिकली तेवढी टिकल्यामुळेच मुघल साम्राज्याशी मराठा स्वराज्य इतकी प्रदीर्घ लढत देऊन यशस्वी होऊ शकले. अनेक लढाया हरले तरी युद्ध अखेरीस जिंकले. राष्ट्र-राज्याच्या निर्मितीची ती पहिली पावले होती.

आधुनिक काळाचे वैशिष्ट्य असलेल्या राष्ट्र संकल्पनेवर आधारलेली, व्यक्तिनिरपेक्ष पातळीवर संघटित होत चाललेली, एका सुसंघटित स्थायी यंत्रणेच्या सामूहिक बळावर दीर्घ पल्ल्याच्या योजना मनात बाळगून, चढउतारांना सामोरे जात व त्यांच्यावर मात करून, आपले उच्चतर उद्दिष्ट साध्य करण्यासाठी रणनीती आखून ती कार्यान्वित करणारी, यासाठी जरूर ती माहिती गोळा करून तिचे विश्लेषण करण्याची शिस्त अंगी बाणवीत असलेली राष्ट्रसत्ता एका बाजूला आणि, दुसरीकडे, राजेपदी विराजमान असलेल्या व्यक्तीवर बव्हंश मदार असणाऱ्या, व्यापक व व्यक्तिनिरपेक्ष राष्ट्रनिष्ठेचा अभाव असलेल्या, दूरगामी उच्चतर ध्येये-लक्ष्ये न बाळगणाऱ्या, चैनविलासात मश्गूल असणाऱ्या, आणि लोकांमध्ये पाळेमुळे रुजविण्याविषयी काही विचारच नसलेल्या लहानमोठ्या राजेशाह्या, असा हा भारतात अठराव्या शतकाच्या उत्तरार्धामध्ये सामना होता. आणखी एक विशेष लक्षात घेण्याजोगा आहे. ईस्ट इंडिया कंपनी ही व्यापारी मंडळी ही उत्कर्षशाली राष्ट्रसत्तेचे एक अंग व हत्यार होती. हा संबंध उभयपक्षी होता. तर भारतात, अठराव्या शतकाच्या आरंभापासूनच बहुधा, एतद्देशीय बड्या देशव्यापी व्यापारी पेढ्या या त्यांच्या व्यापारवृद्धीच्या आणि संपत्तीच्या संरक्षणाच्या दृष्टीने कंपनीच्या प्रभुत्व विस्ताराला उत्तरोत्तर अधिकाधिक अनुकूल होत गेल्या. एतद्देशीय राज्यसत्तांनी त्यांना हाताशी धरून, त्यांचे हितसंबंध जोपासत

स्वतःचे व्यापक राजकारण करण्याची बुद्धी प्रकट केली नाही.

इंग्रजांची भारतात जी सरशी झाली तिचे श्रेय औद्योगिक-शेतकी क्रांतीमधून उत्पन्न झालेले आर्थिक बळ, शस्त्रास्त्रबळ, सैन्य बळ अशा गोष्टींना देता येत नाही. अगदी १८५७ चा उठाव जरी घेतला तरी, बंडवाल्यांच्या ठायी दूरदर्शी मुत्सद्दी मध्यवर्ती नेतृत्वाचा असलेला अभाव, केंद्रीभूत राष्ट्रसत्तेच्या दीर्घसूत्री धोरणांचा व रणनीतीचा अभाव, एकराष्ट्रीयत्वाच्या पायाभूत मानसिकतेचा अभाव डोळ्यात भरतो. नव्या इंग्रजी राज्याविषयी असंतोष तसा बऱ्यापैकी सार्वत्रिक होता. पण ज्या राजेरज-वाड्यांना तहनाम्यांनी व मैत्रीच्या करारांनी इंग्रजांनी त्यांच्या बाजूने बांधून घेतले होते त्यांच्यापैकी ज्यांची वैयक्तिक गाऱ्हाणी न सुटलेली होती त्यांनी तेवढेच मनात ठेवून उठावात सहभाग दिला. सर्व राजेरजवाडे एकत्र येऊन स्वतंत्र होण्याची गोष्ट करते, आणि एतद्देशीय शिपाई इंग्रजांच्या बाजूला नाहीत अशी स्थिती असती तर कंपनीचे राज्य बुडते. आणि एकदा ते बुडाले असते तर, नव्याने इंग्लंडहून गोरे सैन्य आणून हिंदुस्थान जिंकून घेण्याची गोष्ट इंग्लंडने केली असती असे वाटत नाही. स्व-तंत्र राहण्यासाठी, राज्य गमावण्याचा धोका पूर्णतया टाळण्यासाठी इंग्रज कंपनीबहादूरांचे संरक्षण व हमी गरजेची, इष्ट व श्रेयस्कर वाटावी इतकी कोती व स्वार्थी दृष्टी येथील राजेरजवाड्यांची बनली होती.

१८५७ साली इंग्रजांची सरशी होऊन त्यांचे राज्य येथे भक्कमपणे प्रस्थापित व्हावे यात एक प्रकारचा न्यायच होता.

### ३. भारतातील स्थित्यंतराकडे दृष्टिक्षेप

व्यापार करण्यासाठी युरोपीय येथे आले तेव्हा त्यांची ज्या समाजाची गाठभेट झाली तो हिंदुस्थानी समाज स्वतःच्या समाजाशी तुलना करता अडाणी, मागास, दरिद्री आहे असे त्यांना वाटले नाही. उलट येथील मोठी राज्ये – मुघल बादशाही, आदिलशाही, कुतुबशाही – सामर्थ्य, समृद्धी, वैभव, सांस्कृतिक प्रगल्भता या सर्व दृष्टींनी स्वतःपेक्षा त्यांना सरसच आहेत हेच जाणवले असणार. व्यापार आणि राज्यकारण (स्टेटक्राफ्ट) यांचा संयोग त्यांनी केलेला असल्याने येथील समर्थ, प्रगल्भ, समृद्ध राज्यसत्तांचे दुबळेपण हेरून आपला कार्यभाग साधण्याच्या बाबतीत ते तत्पर होते. तुलनेने, शिवाजीमहाराजांचा अपवाद सोडता, येथील सत्ता-महासत्ता युरोपीय व्यापाऱ्यांच्या संदर्भात आत्मसंतुष्ट व अदूरदर्शी होत्या. मुद्दा असा की, वेगवेगळ्या राज्यांच्या वा सुभेदारांच्या दरबारांमध्ये वकील म्हणून काम करणाऱ्या ईस्ट इंडिया कंपनीच्या मुत्सद्दी नोकरांची भावना, हा एक अगदी वेगळ्या घाटाचा समाज आहे, अधिक व्यामिश्र आहे, आणि काही बाबतीत आपल्यापेक्षा पुढारलेला व संपन्न आहे, अशी होती असे दिसते

भारतीय अर्थव्यवस्था या उपखंडाच्या सरहद्दींमध्ये बंदिस्त (ऑटार्किक) होती; ती आपल्या गरजा भागविण्याच्या मर्यादेत कार्य करणारी 'स्थानिक' स्वरूपाची अर्थव्यवस्था होती (लोकल, सब्सिस्टन्स इकॉनॉमी); ती ग्रामीण, शेतकीप्रधान, मागास अर्थव्यवस्था होती हे म्हणणे खरे नाही. खुष्कीच्या मार्गाने तसेच सागरी मार्गाने आयात-निर्यात व्यापारात दीर्घकाळापासून गुंतवणूक व अनुभव गाठीशी असलेली ही अर्थव्यवस्था होती. कापडाची निर्यात भारताच्या पश्चिम व पूर्व किनाऱ्यांवरून मोठ्या प्रमाणावर होत असे. हिमालयातल्या खिंडींच्या मार्गांनी तिबेट-चीन, मध्य व पश्चिम आशियाई देश (आणि त्यांच्या माध्यमाद्वारे पश्चिम युरोप) यांच्याशी व्यापार चाले. एरवी युरोपीय देश आफ्रिका खंडाला वळसा घालून भारतापर्यंत येतच ना. कोलंबसही भारताच्या शोधात मूळात निघाला होता.

केवळ व्यापाराच्या निमित्तानेच दीर्घकाळापासून दूरवरच्या वेगवेगळ्या समाजांशी संबंध आला होता असेही नाही. लष्करी आक्रमणेही झाली, राजनैतिक संबंधही आले, आणि धार्मिक-सांस्कृतिक संबंधही आले. आग्नेय आशियावर भारताच्या पूर्व किनाऱ्यावरील राज्यांचा राजकीय-सांस्कृतिक प्रभाव दीर्घकाळ होता. बौद्ध धर्म भारतातून अनेक देशांमध्ये गेला. भारतीय दार्शनिक विचार व सांस्कृतिक गोष्टी ग्रीसपर्यंत एकेकाळी जाऊन पोचल्या असणार. तात्पर्य, प्राचीन काळापासून, किमानपक्षी मौर्य साम्राज्याच्या काळापासून येथे एक नागर, प्रगल्भ समाज-संस्कृती भरभराटलेली आहे. मुसलमानी आक्रमणांनी काही काळ परागती प्राप्त झाल्यासारखी अवस्था झाली; केवळ लूटमार करण्यासाठी आक्रमणे होत होती तेव्हा. पण जशी येथे त्यांनी राज्ये स्थापन केली, ती स्थिरावली तसा पुन्हा एकदा बहर आला. दक्षिणेत विजयनगरचे साम्राज्य, त्याच्या नाशानंतर भरभराटलेली आदिलशाही, कुतुबशाही, निजामशाही ही राज्ये आणि उत्तरेतले मुघल साम्राज्य यांचा घाट प्रगल्भ, नागरी होता.

अनुक्रमणिका






पौर्वात्य जगातील समाज व संस्कृती यांच्याविषयी जो अहंगंड गौरवर्णीय युरोपीय समाजांच्या ठायी कालपरवापर्यंत प्रकर्षाने आढळून येत होता त्याचा आरंभ धार्मिक श्रेष्ठत्वाविषयीच्या निःशंक खात्रीमधून झाला असे वाटते. ख्रिश्चन धर्म हा मनुष्याचे तारण करू शकणारा एकमेव खरा धर्म आहे ही श्रद्धा ख्रिश्चन धर्मसंस्थेच्या व्यवहाराच्या गाभ्याशी राहिली आहे. धर्मप्रसार आणि राजकारण यांचाही संयोग प्राचीन व मध्ययुगीन काळापासून आढळतो. पोर्तुगीज भारतात आले तेव्हा व्यापाराबरोबरच धर्मप्रसार हा त्यांचा एक प्रधान हेतू होता. प्रॉटेस्टंट ख्रिश्चन देशांतल्या व्यापारी कंपन्या व त्या देशांतल्या राज्यसत्ता यांचीही भूमिका पोर्तुगीजांसारखीच, ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केल्यानेच ख्रिस्ती नसलेल्या व्यक्ती व समुदाय यांचे अंतिमतः तारण होणार आहे अशी, व तेवढीच निःशंक व ठाम असली तरी, धर्मप्रसार हा त्यांचा फार गौण हेतू होता आणि, व्यापारवृद्धीच्या दृष्टीने, तो आपला हेतू नाहीच, ही भूमिका आरंभीच्या काळात त्यांनी घेतली. दांडगाईने व लबाडीने चालविलेल्या पोर्तुगीजांच्या धर्मप्रसार-कार्याला येथील राजवटींची व समाजांची येणारी तीव्र प्रतिक्रिया त्यांनी स्वतःचे बस्तान बसविण्यासाठी वापरून घेतली.

यशस्वी राजकीय हस्तक्षेपाद्वारे ईस्ट इंडिया कंपनी ही एक प्रबळ राजकीय शक्ती बनली त्याच काळात जगाच्या मोठ्या भूभागावर नाविक वर्चस्वाच्या आधारे इंग्लंडची हुकूमत प्रस्थापित होत होती. ब्रिटिश पार्लमेंटने अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात जागतिक साम्राज्यसत्तेचे केंद्र ही भूमिका वठवायला सुरुवात केली, आणि त्यासोबत श्रेष्ठत्वाचा गंड पण उत्पन्न झाला.

प्रबोधनयुगाची शिकवण अशी होती की, पृथ्वीवर मानवजातीचे घटक असलेले विभिन्न समाज हे रानटी ते प्रबुद्ध या दोन टोकांमधील वाटेवर वेगवेगळ्या टप्प्यांवर असलेले समाज आहेत. रानटी=विवेकशून्य तर प्रबुद्ध=विवेकशक्तीचा पूर्ण आविष्कार आढळणारा, अशी व्याख्याच होती. तसेच, धर्माच्या बाबतीतही, एका टोकाला धर्माचे 'रानटी' रूप होते. दुसऱ्या टोकाला विवेकाचा प्रकाश होता. त्यातल्या त्यात, जगासाठी ऐहिक व्यवहाराचे नियम घालून दिल्यावर आणि स्वतःच्यावरून बेतलेल्या मानवाची निर्मिती केल्यावर, कोणतीही लहरी ढवळाढवळ न करणाऱ्या देवाचे अंतिम नियंतेपण तेवढे सांगणाऱ्या, विवेकाने जागा करून दिलेल्या मर्यादेतील धर्म हा दुसऱ्या टोकाच्या पुष्कळ जवळ पोचणारा म्हणून मान्य होता. प्रबोधनयुगाच्या कसोट्यांवर गौरवर्णीय युरोपीय, आणि त्यातही इंग्रज, हे तत्कालीन बहुसंख्य इंग्रजांच्या दृष्टीला सर्वोच्च स्थानी असल्याचे निर्विवादपणे दिसत होते. जगभर प्रस्थापित होत असलेले राजकीय-आर्थिक प्रभुत्व हा याचा एक पुरावाच होता. या समजुतीला फ्रेंच राज्यक्रांतीने अल्प काळ हादरा दिला. पण नेपोलियनच्या साम्राज्याला उतरणी लागल्या-वर इंग्रजांच्या श्रेष्ठत्वाच्या अहंगंडाला अटकाव उरला नाही.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात बंगालमध्ये 'दिवाणी' हस्तगत झाल्यावर आणि दक्षिण भारताच्या पूर्व किनाऱ्यावर मुलुख ताब्यात आल्यानंतर कंपनीचे रूपांतर राजेरजवाड्यांपैकी एक असे झाले. या काळातल्या इंग्रज सत्ताधाऱ्यांवरील व त्यांच्या व्यवहारांवरील एका ग्रंथाला पर्सिव्हल स्पिअर या इतिहास-कारांनी *द नबाब्स* असेच नाव दिले आहे. १७७० नंतर ब्रिटिश पार्लमेंटने कंपनीवर स्वतःचे राजकीय नियंत्रण प्रस्थापित करण्यासाठी पावले उचलली. कंपनीच्या वखारींमध्ये वा सैन्यात वा प्रशासन-यंत्रणेत काम करावयास आलेल्या नोकरां-मधून हिकमतीने व कर्तृत्वाने वरिष्ठ पदांवर पोचलेल्या बहुतेकांनी समर्थ, भरभराटलेल्या, वैभवशाली व कर्तबगार अवस्थेतला भारतीय समाज अनुभवलेला होता. त्यांच्या डोळ्यादेखत या समाजाची राजकीय व्यवस्था पार खिळखिळी व अंदाधुंद होत जाऊन कंपनीच्या राजकीय सत्तेचा विस्तार होत गेला होता. त्याबरोबर कंपनीतल्या छोट्यामोठ्या इंग्रज नोकरांची गुर्मी व हडेलहप्पी वाढली. लोभाला धरबंद उरला नाही. लूटमार सुरू झाली. याविरुद्ध इंग्लंडमध्येच आरडाओरडा इतका झाला की, भारतातील कंपनीचे राज्य आपल्या साम्राज्याचा भाग असल्याने त्याचे नियंत्रण करण्याची जबाबदारी ब्रिटिश पार्लमेंटने स्वीकारली. कंपनीचा नोकर असलेल्या गव्हर्नर जनरल वॉरन हेस्टिंग्जवर पार्लमेंटने चालविलेला अभियोग (इंपीचमेंट) तसेच पार्लमेंटने केलेली लॉर्ड कॉर्नवॉलिस यांची गव्हर्नर-जनरल म्हणून नेमणूक अशा या प्रक्रियेतील दोन ठळक घटना होत. पराभूत समाजावर राज्य करण्यासाठी अगदी तरुण वयात अंमलदार म्हणून नेमणुका होऊन माणसे येथे येऊ लागली. श्रेष्ठत्वाचा गंड रोमरोमात भिनवूनच या तरुणांना शासक-प्रशासक म्हणून पाठविले जाऊ लागले, असे म्हटले तरी चालेल

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात अनेक गोष्टी एकत्र

आल्या. 'आधुनिक विज्ञाना'च्या जनकत्वाचे कार्य करणारी रॉयल सोसायटी सतराव्या शतकाच्या आरंभी स्थापन झाली होती. वैज्ञानिक ज्ञानाचे उपयोजन करून लष्करी सामर्थ्य वाढविणे, उत्पादन वाढविणे, श्रमाची उत्पादकता वाढविणे, उत्पादित वस्तूची गुणवत्ता वाढविणे, या व इतर अनेक गोष्टींना चालना मिळाली. याची फळे हाती येऊ लागली. शेती, उद्योग, व्यापार या आर्थिक क्षेत्रांतील व्यवहार – उत्पादन, विक्री व व्यापार – वाढविण्याच्या व त्याद्वारा संपत्तीमध्ये ('वेल्थ') वाढ करण्याच्या, नफा वाढविण्याच्या हेतूने अधिक शास्त्रशुद्ध व कार्यक्षम संघटन होऊ लागले. मनुष्याविषयीचे दर्शनही न्यूटनप्रणीत भौतिकीच्या प्रामाण्या व प्रभावाखाली बदलले. या बदलांना अनुसरून अनुरूप राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, नीतिविचारशास्त्र, समाजशास्त्र व मानसशास्त्र यांचीही रचना या काळात झाली. राज्यव्यवस्था व राजकीय संस्कृती, आर्थिक व्यवहार, औद्योगिक उत्पादन व अर्थव्यवस्था, दार्शनिक विचार, विज्ञान-तंत्रविज्ञानाची करामत (इंग्लंड हे *वर्कशॉप ऑफ द वर्ल्ड* बनण्याच्या मार्गावर होते) अशा विभिन्न क्षेत्रांमधले यश आणि त्याच काळात ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा होत चाललेला जगड्व्याळ उत्कर्ष यामुळे जगात आपण सर्वश्रेष्ठ आहोत, आणि साम्राज्य हा आपल्या सर्जनशील प्रतिभा व कर्तृत्व यांचा विवेकसंपन्न आविष्कार आहे, याविषयी इंग्लिश राज्यकर्त्या वर्गाची खात्रीच झाली.

जे जे इंग्लिश ते ते श्रेष्ठ, योग्य, उन्नत, प्रगत, श्रेयस्कर याच नाण्याची दुसरी बाजू ही ठरली की जे जे भारतीय/ एतद्देशीय, विशेषतः हिंदू, ते हीन, अयोग्य, अवनत, अप्रगत व त्याज्य. विशेषतः हिंदू का, तर ख्रिश्चॅनिटीच्या तुलनेत अज्ञान, अंधश्रद्धा, रानटी चालिरीती, अनाकलनीय भ्रामक समजुती, मूर्तिपूजा (तीही तेहेतीस कोटी देवांची) यांनी ओतप्रोत असलेल्या हिंदू धर्माला अनुसरणारे हिंदू लोक होते म्हणून. आधुनिक पाश्चात्त्य धर्तीचा राष्ट्रवाद, त्याचे पोषण करणारी व राष्ट्रवादाने पुष्ट होणारी एक केंद्रीभूत आधुनिक राज्यसत्ता येथे नव्हती; जी एक साम्राज्यसत्ता होती ती ढासळली आणि एतद्देशीयांचीच मदत घेऊन इंग्रजांनी येथे राज्य प्रस्थापित केले, हा ताजा इतिहास जरूर होता. पण कालपरवापर्यंत येथील राज्ये ही आपल्या तोडीस तोड होती, ती समृद्ध, वैभवशाली होती, शेती, उद्योग, व्यापार, व्यवस्थापन, प्रशासन या क्षेत्रांमध्ये प्रगल्भ व कार्यक्षम होती, हा स्वतःचाच अनुभव नवे इंग्रज राज्यकर्ते विसरले. रानटी – प्रगत या दोन टोकांमधील रेषेवर भारतातील लोकांना त्यांनी कोठे ठेवले? समाजव्यवस्था, धर्म, ज्ञानव्यवहार, उद्योग, शेती इत्यादी इत्यादी कसोट्यांवर त्यांनी हिंदू लोकांना अगदी रानटी ठरविले नाही, पण अजाण, मागास, अप्रगत अशी भारतीयांची 'बाल्यावस्था' असून त्यांना आपल्यासारखे ज्ञानसंपन्न, प्रगत, सभ्य व सुसंस्कृत बनवून प्रौढ अवस्थेला आणून पोचविण्याची पालकत्वाची जबाबदारी स्वतःवर आहे अशी भूमिका त्यांनी घेतली (The White Man's Civilizing Mission).

इंग्लंडमध्ये या काळात तेथील राजकारणात 'परंपरानिष्ठ' आणि 'नवविचारवादी' असे दोन तट होते. हे दोन्ही तेथील अभिजनवर्गाचेच घटक होते. एक भारतीय शब्द वापरायचा तर, ते 'भद्र लोक' होते. नवविचारवादी जे होते ते जबाबदार प्रातिनिधिक राज्यसत्तेचा, उदयोन्मुख भांडवली औद्योगिक उत्पादनव्यवस्थेचा, जुन्या खानदानी सरंजामदारी विशेषाधिकारांच्या निर्मूलनाचा, व्यक्तिवादी जीवनदृष्टीचा पक्ष घेणारे होते. प्रबोधनयुगाचा वारसदार असा हा वर्ग होता असे स्थूलमानाने म्हणता येईल. तो निधर्मी नव्हता; धर्माची विवेकनिष्ठ चिकित्सा करून परिष्कृत स्वरूपात धर्माचे अधिष्ठान व्यक्ती व समाज यांच्या जीवनाला असावे असे मानणारा होता. जगभर ख्रिश्चन धर्माचा प्रसार करण्याच्या कार्यक्रमास त्याचा पाठिंबा होता. राजकीय-आर्थिक व्यवहार, राज्यकारभार मात्र एरवी सेक्युलर भूमिकेतून चालावा अशी त्यांची भूमिका होती, असे स्थूलमानाने म्हणता येईल. मार्क्सच्या परिभाषेतला हा बूर्ज्वा वर्ग, असेही स्थूलमानाने म्हणता येईल. बेन्थॅम-जेम्स मिलप्रणीत युटिलिटेरियनिझम, जॉन लॉक यांच्या तत्त्वज्ञानाने प्रभावित लिबरॅलिझम, हर्बर्ट स्पेन्सर यांचा समाजविषयक विचार, आणि रिकार्डो-जॉन स्टुअर्ट मिल यांची 'पोलिटिकल इकॉनॉमी' विषयक मांडणी यांच्या संमिश्रणामधून एक जीवनविषयक दृष्टी आणि, त्याहीपेक्षा जास्त, आमूल सामाजिक परिवर्तनवादी तत्त्वज्ञान या नवविचारवादी पक्षाला लाभले होते.

सर्वांगीण श्रेष्ठत्वाविषयी निःशंक मन असलेले, ब्रिटनचे जगाच्या मोठ्या भूभागावर असलेले साम्राज्य हे त्या भूभागांमधील लोकांच्याही उद्धारासाठी आवश्यक आहे अशी खात्री बाळगणारे, सत्ता, वैभव व प्रतिष्ठा उपभोगण्यास व

गाजविण्यास उत्सुक असलेले, आणि 'काळ्या कातडी'च्या नेटिवांमधील अभिजनांविषयीही हीनभाव, दुरावा व अविश्वास बाळगणारे 'सनदी नोकर' ('सिव्हिल सर्व्हंट्स') एकोणिसाव्या शतकाच्या आरंभापासून येथे येऊ लागले. १८३० पूर्वीच्या राज्यप्रस्थापनेच्या आरंभीच्या काळात ज्यांनी कंपनीचे राज्य हिंदुस्थानभर प्रस्थापित केले आणि चालविले ते शास्ते कंपनीच्या सेवेत अनेक वर्षे येथे राहिलेले, येथल्या एतद्देशीय समाजांची, राज्यांची चांगली स्थिती पाहिलेले होते. त्यांचे वळण एतद्देशीय संस्था, परंपरा, रीतिभाती यांच्याविषयी काही प्रमाणात आदर बाळगणारे, समंजस व उदार होते. ते साम्राज्याचे एकनिष्ठ सेवक होते; एतद्देशीय राज्यांना जिंकून घेऊन वा त्यांना अंकित करून येथे ब्रिटिश राजवट प्रस्थापित व स्थिर त्यांनीच केली. ब्रिटिश राज्यव्यवस्था व संस्कृती, ख्रिश्चनधर्म यांच्या श्रेष्ठत्वाविषयी त्यांचे काही वेगळे मत नव्हते. कंपनीचे व्यापारी हितसंबंध आणि इंग्लंडचे राजकीय हितसंबंध यांची जपणूक करण्याविषयी ते दक्ष होते. या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी, शक्यतोवर, येथील लोक, त्यांच्या संस्था, परंपरा, रीतिभाती यांचा आदर करीत, त्यांना जरूर तेथे मुरड घालीत पण त्यांचा उपयोग करीत 'हलक्या हाता'ने राज्य करून प्रजेला संतुष्ट राखावे, तसेच पूर्वीच्या राज्यकर्त्यांनाही संतुष्ट राखावे अशी त्यांची भूमिका होती. माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन हे या भूमिकेचे एक चांगले प्रातिनिधिक उदाहरण म्हणता येईल. पण राज्य करण्यासाठीच प्रशिक्षण देऊन व संस्कार करून (किंवा पढवून म्हणा) पाठविल्या जाणाऱ्या करकरीत, पूर्वग्रहाने झापडबंद बनलेल्या, अहंभावी, साम्राज्यवादी वृत्तीच्या नव्या मंडळींचा भरणा जास्त वाढला तसे वातावरण, संबंध व मानसिकता यात मोठे अंतर पडले.

विभिन्न मानव समाजांची अवस्था व स्थाननिश्चिती काही निकषांवर करावयाची जी चौकट प्रबोधनयुगाने घालून दिली होती ती वापरून भारताविषयीची एक प्रतिमा निर्माण करून नव्या राज्यकर्त्या इंग्रजांच्या मनात ठसविली गेली. ती प्रतिमा हेच वास्तव असे पक्के मनात धरून, या राज्यकर्त्यांपैकी उन्नत ध्येये बाळगणाऱ्या कर्तव्यनिष्ठ गटाने भारतीय समाजाची सर्वंकष पुनर्रचना करण्याचे कार्य आपणास पार पाडावयाचे आहे अशी आपली जबाबदारी ('व्हाइट मॅन्स बर्डन') मानली. अर्थात यासाठी त्यांना येथील स्थिती, समाजरचना, कायदेकानून, सामाजिक संस्था, रीतिभाती, भाषा, भूगोल, साधनसंपत्ती इत्यादी इत्यादींची 'शास्त्रशुद्ध' माहिती गोळा करून, तिचे 'शास्त्रशुद्ध' वर्गीकरण व विश्लेषण करून, तिचा अर्थ लावून मगच राज्य करता येणार होते. तसे काही न करता राज्य करणे म्हणजे, त्यांच्या दृष्टीने, भारतीयांचा उद्धार करण्याची आपली जबाबदारी झटकून टाकणे झाले असते; ह्या उच्च साम्राज्यवादी मिशनरी भूमिकेशी तो द्रोह ठरला असता.

ज्या परकीय भूप्रदेशावर व लोकांवर राज्य करावयाचे आहे त्यांची सर्व प्रकारची माहिती करून घेणे, तिचे वर्गीकरण व विश्लेषण करून तिचा अर्थ लावणे, आणि आपले हेतू साध्य करण्यासाठी तिचा कुशलतेने उपयोग करून घेणे यासाठी इंग्रज राज्यकर्त्यांनी केवढा प्रचंड उद्योग केला हे पाहिल्यावर थक्क व्हायला होते. जिल्ह्यांची तयार केलेली गॅझेटियरे हे एक उदाहरण पुरे. साऱ्या देशाचे, भूपृष्ठरचनेच्या अंगाने मोजणी करून नकाशे (टोपो मॅप्स्) काढले. महसूल गोळा करण्यासाठी व मालमत्तेची नोंद करण्यासाठी जमिनीची मोजणी केली. प्राचीन शास्त्रग्रंथांचा, व त्यासाठी भाषांचा, अभ्यास केला. याचे कौतुक केले पाहिजे; आणि यासाठी आपण या नव्या राज्यकर्त्यांचे सदैव ऋणीही राहणार आहोत. ज्या उज्ज्वल प्राचीन वारशाचा आपण अभिमान बाळगतो आणि त्या आधारे आपले – 'आर्यां'चे व वैदिक संस्कृतीचे, तसेच इतरही कालखंडांमधील कर्तृत्वाचे – मोठेपण सांगतो तो वारसा उजेडात, अनेक वेळा अक्षरशः उजेडात आणण्याचे काम या शासकांपैकी अनेकांनी कर्तव्यबुद्धीने, आस्थेने, आणि शिस्तीने केले. हे तिन्ही गुण अभ्यासकांच्याही ठायी आज आपल्या समाजात किती विरळा आढळतात! या शासकांपैकी औपचारिकतः विद्वान, संशोधक या वर्गांमध्ये मोडणारे फार कमी होते. या 'ज्ञानसंपादना'च्या उद्योगाशी निगडीत काही प्रश्न आहेत, त्याकडे नंतर परत येऊ. येथे मुख्य मुद्दा असा की, ५०-६० वर्षांच्या काळात, जे आर्जवी नम्र व्यापारी होते ते शिरजोर सत्ताधीश बनले. हा बदल १७५० ते १८१८ या काळात घडून आला. आणि आम्ही हिंदुस्थानी लोक, आणि आमची समाजव्यवस्था, आमचे ज्ञानभांडार, आमची संस्कृती अपात्र, अडाणी व टाकाऊ ठरली. गोरे इंग्रज, मग तो लष्करातला शिपुरडा का असेना, गोरे असण्यामुळे व इंग्रजांपैकी असल्यामुळे, आमचे 'स्वामी' बनले; आमची पायरी आम्हाला दाखवून देत आमच्याशी जाणीवपूर्वक, ठरवून मुजोरीने वागू लागले.

### ४. नवे राज्य आणि त्याचा आघात

कोणाला (राज्याच्या) गादीवर बसण्यात मदत केली, कोणाच्या राजेपणाची हमी घेतली, आणि अशा सेवेबद्दल मुलुख तोडून घेतला, असा हा व्यवहार करण्यात एका व्यापारी कंपनीने एवढा रस का घ्यावा? उत्पन्नासाठी जागीर देणे ही तत्कालीन रीत होती. इथले जे हिंदू वा मुसलमान राजे, नवाब आदि होते त्यांना ही व्यवस्था सोयीची होती. पण कंपनीला याचे आकर्षण का वाटावे? आपली हिंदुस्थानातील चाकर मंडळी निष्कारण हा नसता बोजा उचलीत आहेत असे ईस्ट इंडिया कंपनीच्या इंग्लंडमधील संचालकांनाही आरंभी काही काळ वाटले. औपचारिकतः जरी बादशहा वा राजा हा सर्वाधिकारी असला – आणि तो जर सक्षम व प्रबळ असला तर त्याचा वचक व नियंत्रण राहीदेखील – तरी जागिरीच्या प्रदेशात जागीरदार हा सर्वेसर्वा असे. केंद्रीय राजवट जेव्हा दुबळी, कर्तृत्वहीन बने तेव्हा जागिरीचे रूपांतर स्वतंत्र राज्यातही करण्यास जागिरदार मोकळा असे, व कर्तबगार व महत्त्वाकांक्षी व्यक्ती ती संधी घेतही. कंपनीचे स्थानिक मुत्सद्दी अधिकारी हे सर्व पहात होतेच. व्यापारी मक्तेदारी प्रस्थापित करून, इतर व्यापाऱ्यांना बेदखल करून वा अंकित करून, उत्पादक कारागिरांचे स्वतःच सावकार बनून व्यक्तिशः स्वतः पैसा करण्यास व कंपनीचाही फायदा वाढविण्यास कंपनीचे जवळजवळ सर्वच नोकर व अधिकारी उत्सुक व तत्पर असत. पाच-सात वर्षांमध्ये धनसंचय करून परत इंग्लंडला जायचे आणि तिथे त्या पैशाच्या गुंतवणुकीवर आरामात जगायचे, राजकारणात भाग घ्यायचा, ही वहिवाटच पडल्यासारखी झाली. जर आपण मुलुख तोडून घेऊ शकलो तर मग आपण राजेच, हवे ते करावयास रान मोकळे. कंपनीला राजा वा बादशहाही जाब विचारू धजणार नाही हे माहीत. कारण त्यालाच 'संरक्षण' हवे असे ना!

व्यापारासाठी जे भांडवल लागे ते सोने-चांदी या रूपात आरंभी इंग्लंडमधून भारतात पाठवावे लागे. तत्कालीन परिस्थितीत भारतात निर्यात करण्यासारखा इंग्लिश माल या कंपन्यांजवळ फारसा नव्हता. यावर काही मार्ग काढला गेला. पण जर मुलुख ताब्यात आला तर महसूल गोळा करणे, इतर वेगवेगळे कर वसूल करणे, वेठबिगार करवून घेणे, बाजारहाटांवर नियंत्रण व मक्तेदारी वर्चस्व प्रस्थापित करणे, असे भांडवल गोळा करण्याचे मार्ग राजरोस खुले होणार होते. ही गोष्ट कंपनीच्या किती फायद्याची आहे हे कंपनीच्या इंग्लंडमधील संचालकांना उमगण्याला काही वेळ लागला नाही.

महसुली उत्पन्न हे कंपनीचे मुख्य उत्पन्न होते. यातून सर्व खर्च भागवावयाचा असे. बर्नार्ड कोह्न यांनी म्हटले आहे, 'Throughout the history of the Company and its successor, the imperial Government of India, the best indicator of efficiency of administration was its capacity to collect 100 percent of the assessed revenues.' त्यांनी असेही लिहिले आहे, 'In the British cultural system, the capacity to assess taxes was inextricably linked with law. Forms of knowledge that would enable the foreign rulers to frame regulations that would guarantee their obtaining what they thought was the just share of the surplus of agricultural production had to be acquired or created.' आता, हे ज्ञान हस्तगत करण्याच्या व ते उपयोगात आणून महसूल गोळा करण्याच्या प्रक्रियेत काय घडले याची चुणूक कोह्न यांच्या पुढील वाक्यांत मिळते : 'After 1765 (बंगाल इलाख्याची 'दिवाणी' मिळविल्यानंतर) the British so badly managed the task of assessing and collecting land revenue that within five years they found that their actions had caused a horrendus famine, in which they estimated that a third of the population of Bengal had died... Both the famine and the revenue policies of the British also led to a breakdown in law and order; roving gangs (dacoits) began to prey on a helpless peasantry to disrupt trade.'*

ब्रिटिशपूर्वकाळात साऱ्याची आकारणी आणि त्याची प्रत्यक्षात वसुली यात फरक पडत असे. हिंदुस्थानच्या वेगवेगळ्या

* वरील तिन्ही अवतरणे कोह्न यांच्या Colonialism and Its Forms of Knowledge : the British in India (ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, दिल्ली, १९९७) या पुस्तकातील आहेत. पृ. ६१, व पृ. ५९-६०.






भागांमध्ये व्यवस्था भिन्न भिन्न होत्या; पण धर्मपाल यांनी केलेला एक मुद्दा महत्वाचा दिसतो. स्थानीय समाजांना ('लोकॅलिटीज' हा शब्द त्यांनी त्यांच्या लेखनात वापरला आहे) सर्वत्र कळीचे स्थान होते. पूर्वापार चालत आलेल्या त्यांच्या रीती, अधिकार, हक्क यांना वरिष्ठ पातळ्यांवरील सत्ताधाऱ्यांची स्वीकृती असे.* वाटाघाट होऊन प्रत्यक्ष वसूली कमीअधिक होई. दुसरा मुद्दा त्यांच्या व इतरांच्या मांडणीमधून येतो. त्यानुसार, जो महसूल गोळा होई त्यांपैकी बराच मोठा हिस्सा गावांमध्ये, स्थानीय क्षेत्रात वेगवेगळ्या बाबींसाठी ठेवून घेतला जाई, असेही दिसते. कंपनीबहादूरने म्हणजे नव्या राज्यकर्त्यांनी जी केंद्रीभूत राज्यसत्ता प्रस्थापित केली तिचा ही व्यवस्था मोडण्यावर भर होता. न्याय्य कांय, योग्य काय, शास्त्रशुद्ध काय हे प्रश्न उपस्थित करून जरूर विचार केला गेला. पण त्याची तात्त्विक बैठक व वळण परकीय होते. प्रा. गं.बा. सरदार यांनी त्यांच्या 'पाश्चात्त्य विद्येच्या प्रकाशात' या लेखातही# महसुली धोरण व त्याची अंमल-बजावणी याच्या घोर परिणामांचा उल्लेख केला आहे.

भारतीय शेतीची तत्कालीन स्थिती भरभराटीची व तिची उत्पादकता उच्च कोटीची होती असेही प्रतिपादन धर्मपाल यांनी त्यांच्या लेखनामधून केले आहे. पॅट्रियाटिक अँड पीपल ओरिएंटेड सायन्स अँड टेक्नॉलॉजी या अभ्यास-गटाच्या नियतकालिकाच्या (*पीपीएसटी जर्नल*) एका अंकात 'इंडियन ॲग्रिकल्चर' असा त्यांचा एक निबंध प्रसिद्ध झाला. मद्रासच्या दक्षिणेला असलेल्या चेंगलपेट या जिल्ह्यातील सुमारे दोनसव्वादोनशे गावांची तपशीलवार माहिती ब्रिटिश अधिकाऱ्यांनी गोळा केली होती. त्या माहितीच्या आधारे त्यांनी विवेचन केले होते. भारतीय शेतीची दुरवस्था आणि ब्रिटिश राजवट यांचा एकाहून अधिक स्वरूपाचा घनिष्ट संबंध दिसतो. चढ्या दराने सारानिश्चिती आणि त्याची निर्घृण वसूली हे एक कारण. ब्रिटिश राज्याच्या प्रस्थापनेने जी 'शांतता' ('पॅक्स ब्रिटानिका') प्रस्थापित झाली त्याचा एक भाग म्हणून लोकांचे अनेक रोजगार हातचे गेले, व्यवसाय बंद पडले; मुलुखगिरी हाही उत्पन्न मिळविण्याचा एक मार्ग होता, तोही बंद झाला. याचाही उल्लेख प्रा. सरदारांच्या उपरोक्त लेखात आहे. याचा काही मार्मिक व भेदक तपशील महात्मा फुल्यांच्या लेखनातही येतो. ब्रिटिश जे उत्पन्न कर रूपाने गोळा करीत त्यातला प्रमाणाबाहेर मोठा हिस्सा त्यांचे प्रशासन, व्यापार व राजकारण यावर खर्च होई. लोकांची क्रयशक्ती यामुळे मोठ्या प्रमाणावर घटली असेल तर अन्नधान्यांचे भाव गडगडले असणार. भाव पडलेले असतानाच शेतमाल विकावा लागण्याचाही ('डिस्ट्रेस सेल') विपरीत परिणाम झाला असणार. याची काही चर्चा रोमेशचंद्र दत्त या अव्वल पिढीतील हिंदी सनदी प्रशासकांच्या *इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ इंडिया* या ग्रंथाला प्रा. धनंजयराव गाडगीळांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत आल्याचे आठवते. या काळात शेतीवरील लोकसंख्येचा भार वाढल्याचे चित्रण म. फुल्यांच्या लेखनात येते. तात्पर्य असे की, १७५७ ते १९१४ या सुमारे दीड-पावणेदोनशे वर्षांच्या काळात, नव्या-जुन्या नगदी व्यापारी पिकांखालील अपवादभूत क्षेत्रे वगळता भारतीय शेतीचा व, पर्यायाने, ग्रामव्यवस्थेचा, अर्थव्यवस्थेचा व समाजाचा कणा मोडला असा निष्कर्ष हाती येण्याची दाट शक्यता आहे. *पॉव्हर्टी अँड फॅमिन्स* या त्यांच्या गाजलेल्या प्रबंधात अमर्त्य सेन यांनी केलेले विवेचन या काळातल्या, दारिद्र्य-उपासमारीमुळे वेळोवेळी पडलेल्या भूकबळींनाही लागू पडेल ही शक्यता ध्यानात घेतली पाहिजे.+

अठराव्या शतकात भारतीय अर्थव्यवस्था शेती, उद्योग व व्यापार यांच्यात एक संतुलन साधणारी होती. उद्योग म्हटल्यावर आपल्या डोळ्यासमोर आधुनिक कारखाने, मोठाली यंत्रे, केंद्रीभूत मोठ्या प्रमाणावरील उत्पादन व सर्वदूर वितरण हे चित्र उभे राहते. पण औद्योगिक उत्पादन स्थानिक पातळीवर विकेंद्रित व विखुरलेल्या स्वरूपात होऊ शकते. भारतामधून कापड मोठ्या प्रमाणावर निर्यात होत होते, आणि ही निर्यात वाढविण्यात एका कालखंडात ईस्ट इंडिया कंपनीचाही वाटा होता. इंग्रजांचे राज्य एकोणिसाव्या शतकाच्या चौथ्या दशका-पर्यंत भारतभर प्रस्थापित झाले. औद्योगिक क्रांतीला याच सुमारास भरीव आकार प्राप्त झाला. नेपोलियनचा पराभव झाल्यामुळे इंग्लिश राष्ट्राची ही नवी औद्योगिक शक्ती जग पादाक्रांत करायला मोकळी झाली. इंग्लंडच्या पक्क्या मालाला

---

* 'भारतीय समाज, त्याची वैशिष्ट्यपूर्ण जडणघडण आणि आजचा पेचप्रसंग', *नवभारत*, वर्ष ५३, अंक ७, एप्रिल २०००, पृ. १-२५.

\# *नवभारत*, वर्ष ५३, अंक ११, ऑगस्ट २०००, पृ. १९-२९ (पुनर्मुद्रित).

\+ पहा : अमर्त्य सेन, 'दुष्काळ, भूकबळी आणि दारिद्र्य' (परिचयपर लेख), *नवभारत*, वर्ष ५३, अंक १२, सप्टेंबर २०००.

अनुक्रमणिका

जगाची बाजारपेठ उपलब्ध होण्यात इंग्लंडचा हितसंबंध ठळकपणे उत्पन्न झाला. प्रा. के.एन. चौधुरी यांनी म्हटले आहे : 'The importance of the second period (i.e. from 1813 to 1850) stems from the fact that during these years certain fundamental structural changes took place in the commodity composition of Indian trade, changes that were to characterise this trade almost until the end of the first World War. India was gradually transformed from being an exporter of manufactured products - largely textiles - into a supplier of primary commodities, importing finished consumer goods as well in return. These qualitative features persisted throughout the third period (i.e. 1850 to 1914).'* याचा एक अर्थ असा की, भारतीय अर्थव्यवस्थेचे संतुलन नष्ट झाले आणि या बदलाचे विध्वंसक परिणाम समाजव्यवस्थेवर झाले. तसेच तंत्रवैज्ञानिक शोधकवृत्ती, उत्पादक कौशल्ये, व्यवस्थापन कौशल्ये यांच्यावरही विपरीत परिणाम झाला. 'कच्च्या माला'ची वा प्राथमिक उपभोग्य शेतमालाची निर्यात करणारा देश बनण्याचा एक अर्थ असा होता की, शेतकरी वर्गावरील दडपणूक व त्यांची पिळवणूक वाढली : अमूक एक पिकेच घेतली पाहिजेत, ती निर्यात केली पाहिजेत, ही 'गरज' बनली. निळीच्या शेतीची हकीकत आठवावी.

इतरही अनेक अंगांनी व प्रकारांनी इंग्लंडच्या आर्थिक हितसंबंधांच्या दावणीला भारतीय अर्थव्यवस्था वांधली गेली. ती त्या अर्थव्यवस्थेचे केवळ उपांग बनविली गेली. भारताचे रूपांतर 'कच्च्या माला'चे, शेतमालाचे तेवढे उत्पादन करणाऱ्या 'मागास' अर्थव्यवस्थेत घडवून आणले गेले. भारत हा 'शेतकीप्रधान', 'ग्रामीण' देश बनवला गेला. 'लोकसंख्या' हा तेव्हापासूनच जटिल प्रश्न बनला.

इंग्रजांनी येथील राज्ये बुडविली, अंकित केली. आपला पराभव हाच राज्यव्यवस्थेच्या क्षेत्रातल्या आपल्या नालायकीचा, मागासलेपणाचा पुरावा मानला गेला. राष्ट्रवादी आधुनिक राष्ट्र-राज्य ही अभिनव राज्यसंस्था या काळात उत्कर्ष पावली आणि काही अंगांनी ती सरस ठरली ही गोष्ट निर्विवादच आहे. परिणामी, राज्य संपादन करणे, उभारणे, ते चालविणे, शास्त्रे रचणे, व्यवस्था घालून देणे इत्यादी क्षेत्रांमध्ये येथील राज्यकर्त्या वर्गांचा अनुभव, विचार, जाणकारी, क्षमता व कौशल्ये ही निकामी ठरवली गेली; म्हणजे असे की, फार फार तर ब्रिटिश शास्ते, प्रशासक, न्यायाधीश, पोलीस व सैनिकी अधिकारी यांचे दुय्यम मदतनीस म्हणून काम करण्याची पात्रता तेवढी या देशातल्या राज्यकर्त्या वर्गात आहे ही भूमिका घेतली गेली. हा नकार, ही बेदखली, ही काम काढून घेऊन घरी बसविण्याची गोष्ट हा समाजव्यवस्थेची मोडतोड करणारा, तसेच मने, बुद्धी यांना झाकोळून, होरपळून टाकणारा प्रचंड मोठा आघात होता. पण याची आम्ही समाज म्हणून दखलही घेतलेली नाही.

१८५७ च्या उठावाला स्वातंत्र्ययुद्ध म्हणावयाचे की नाही हा विवाद्य मुद्दा म्हणता येईल. ब्रिटिशपूर्व हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेचा व त्या युगाचा तो मृत्यूपूर्वीचा आचका होता. मृत्यू अटळ होता, असे म्हणायला लागेल. कारण ब्रिटिशांचा फास पक्का आवळलेला होता, आणि भारतातल्या त्यांच्या प्रमुख केंद्रांमध्ये त्यांचा पक्ष घेणारा एक भारतीयांचा वर्ग एव्हाना उभा राहिला होता. तरीही ब्रिटिशांच्या तोंडचे पाणी पळविण्याइतका उठावाचा दणका मोठा होता. उठाव मोडून काढत असताना व नंतरही त्यांनी जी सूडबुद्धी उत्तर भारतात प्रकट केली त्याची वर्णने आजही संताप उत्पन्न करणारी आहेत. या देशाला त्यांनी निःशस्त्र केले. या निःशस्त्रीकरणाच्या नाण्याची दुसरी बाजू लोकांची भयभीत व शरणागत, लाचार मानसिकता ही होती. एक प्रकारची स्मशानशांतता पसरली. मोठी खेदाची गोष्ट अशी की, ब्रिटिश राज्याच्या स्थैर्याशी ज्यांचे पोटपाणी व भरभराट जोडली गेली होती असा जो वर्ग एव्हाना निर्माण झाला होता त्याने १८५७च्या उठावाविषयी औदासीन्य प्रकट केले एवढेच नाही, पण नंतर लोकांवर जी दहशत ब्रिटिशांनी बसविली त्याचीही दखल घेतली नाही. इंग्रजांचे राज्य हे वरदान आहे ही त्यांची पक्की धारणा असल्याचा परिणाम म्हणून हा आंधळेपणा आला असावा.

* के.एन. चौधुरी, 'फॉरिन ट्रेड अँड बॅलन्स ऑफ पेमेंट्स, १७५७-१९४७', *द केंब्रिज इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ इंडिया*, खंड २ (ओरिएंट लाँगमन, दिल्ली), पृ. ८०७.


अनुक्रमणिका

जो राज्य करतो त्याला न्यायनिवाडा करावा लागतोच. इंग्रजांकडेही हे काम आले. पूर्वीही सर्वच तंटेबखेडे लोक आपापसात, त्यांच्या त्यांच्या चालत आलेल्या रीतींनुसार व संस्थांमार्फत सोडवू शकत नसत. राज्यातल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांसमोर तंटे नेले जात व न्यायनिवाडा केला जाई. पण तरीही पंचमंडळींमार्फत स्थानिक पातळीवर न्याय करण्याची व्यवस्था पुष्कळ व्यापक स्वरूपात अस्तित्वात होती. जात/ज्ञातिपंचायती, ग्रामपंचायती, याच धर्तीच्या वरच्या पातळ्यांवरील पारंपरिक संस्था यांचे स्वायत्त अधिकार होते. व्यक्ती व समाजविषयक एका वैकल्पिक धारणेवर आधारलेली ही व्यवस्था होती. नव्या व्यवस्थेत, न्याय व दंड हे दोन्ही अधिकार सर्वस्वी केंद्रीभूत राज्यसत्तेचे, ही भूमिका होती. 'कायद्याचे राज्य' या नावाने ओळखली जाणारी एक विशिष्ट संकल्पना होती. या चष्म्यातून पाहिले असता 'आढळणारे' हिंदुस्थानातल्या स्थितीचे वर्णन बर्नार्ड कोह्न यांनी त्यांच्या 'लॉ अँड द कलोनिअल स्टेट' या निबंधात तत्कालीन ग्रंथकारांच्या लेखनावरून पुढीलप्रमाणे केले आहे : " 'To both these peoples (the lords and slaves – म्हणजे मुस्लिम राज्यकर्ते व हिंदू प्रजाजन -- of this empire), custom and religions have given all the regulations...' 'Every province has fifty sects of Hindus, and every sect adheres to different observances.' (ओर्मे या ग्रंथकाराचे मत) ... Justice was dependent not on the rule of law but on the rule of men, who could be influenced by money, status and connection in the exercise of their office of judge."* याच्या विरोधात, त्यांच्या कल्पनेतील 'कायद्याचे राज्य' प्रस्थापित करण्याचा उपक्रम हाती घेतला. गव्हर्नर-जनरल हेस्टिंग्ज आणि सर विल्यम जोन्स यांच्या मते, ज्यांना 'कायद्याची पुस्तके' म्हणता येतील असे प्रामाण्यप्राप्त प्राचीन ग्रंथ होते, हिंदू व मुसलमान दोन्ही लोकांपाशी. पण येथील भ्रष्ट पुरोहितवर्ग व लहरी शासनव्यवस्था यांमुळे लोकांना न्याय मिळत नव्हता. तो मिळवून देण्याच्या प्रयत्नात जी कोर्टकचेऱ्यांची न्यायदानयंत्रणा व रीती त्यांनी प्रस्थापित केली, मालकी हक्क, मालमत्तेची खरेदी-विक्री, कर्जव्यवहार, कंत्राटे अशा आर्थिक व्यवहारांच्या क्षेत्रात जी इंग्लिश तत्त्वे, कायदे लागू केले, त्यांचा एकंदर परिणाम विघातक झाला. आजही आपण अनुभवतो की, कोर्टाची पायरी चढणे म्हणजे, त्या प्रकरणापुरते तरी, आपले भवितव्य दुसऱ्यांच्या हाती सुपूर्त करणे, एक हताशा व दुबळेपणा अनुभवणे असते. कायदेकानू, त्यांचे बारकावे, त्यांची गुंतागुंत या गोष्टीही अगदी उच्चशिक्षित माणसांच्याही समजेपलीकडच्या असतात. शिवाय, पुस्तकात काय लिहिले आहे, आणि व्यवहाराच्या रीती काय आहेत, यांच्यातही जागजागी अंतर असते, आणि त्याचे ज्ञान व त्यावर पकड वकील नावाच्या मध्यस्थालाच असते. त्याच्यावर आपणास विसंबावे लागते. पूर्वीच्या काळी 'न्याय' कशाला म्हणायचे, आणि तो कसा मिळतो, न्याय करण्याची प्रक्रिया आणि न्यायनिवाडा करणारी पंच मंडळी या साऱ्या गोष्टी परिचित, आकलनीय आणि साक्षात होत्या. न्याय करणारे, 'न्याय' विषयक धारणा, न्याय मागण्यासाठी पोचलेल्या व्यक्ती वा गट हे सारे एकाच वैचारिक-भावनिक, सामाजिक-सांस्कृतिक विश्वाचे घटक होते. न्याय आपल्याला मिळाला नाही असे अनुभवाला येत असेल. पण त्याचे कारण-स्पष्टीकरण कळत असे. आता, 'कायद्याचे राज्य' या कल्पनेच्या चौकटीतला न्याय हा 'आंधळा' असावा हीच न्यायाची प्रतिमा होती. वर ती सारीच प्रक्रिया व न्यायदान-व्यवस्था ही गूढ, अनाकलनीय, परकी बनली.

कोर्टकचेरीद्वारा जो निवाडा पदरी पडेल त्याला 'कायद्यानुसार दिलेला न्याय' म्हणणे प्राप्तच होते, आणि न्यायाधीश ज्ञानी, जाणता, निष्पक्ष आहे हेही गृहीत धरणे प्राप्त होते. पण या दोन्ही गोष्टी या नव्या व्यवस्थेतही किती शंकास्पद राहिल्या आहेत हे आपण जाणतो. पक्षकाराच्या बाजूने निकाल लागावा यात वकीलाचा स्वार्थी हितसंबंध असतो. त्यासाठी तो साक्षीपुरावे उभे करतो, प्रसंगी विरोधी जाणारा पुरावा नष्ट करतो, साक्षीदारांना खोटे बोलावयास पढवतो, विरुद्ध पक्षाच्या साक्षीदारांची उलटतपासणी घेताना त्यांची वैयक्तिक विश्वासार्हता शंकास्पद ठरविण्याची वा चारित्र्याविषयी संशय उत्पन्न करण्याची चाल खेळतो या गोष्टी परिचित आहेत. सत्य, न्याय, चांगुलपणा यांची प्रस्थापना करण्यासाठी न्यायव्यवस्था कार्य करीत असते ही लोकांची समजूत बनणे केंद्रीभूत सर्वंकष राज्यसत्तेच्या दृष्टीने अर्थातच उपकारक असते; या समजुतीमुळे राज्यसत्तेची पकड अधिक घट्ट

* कोह्न, उपरोक्त, पृ. ६४-६५.



अनुक्रमणिका

होते. काही प्रकरणी न्यायालये जो निवाडा देतात त्याने सत्य, न्याय, समत्व (इक्विटी) यांची पुष्टी जरूर होते, आणि अशा निवाड्यांचा गाजावाजाही पुष्कळ होतो. पण एकंदरीने पाहता न्यायव्यवस्था केंद्रीभूत राज्यसत्तेला प्रामाण्य व वैधता प्राप्त करून देऊन तिची सत्ता वाढविते, आणि लोकांचे दुबळेपण वाढविते. या व्यवस्थेत कोणत्या समाजघटकांची भरभराट होते, या प्रश्नाचे वस्तुनिष्ठ उत्तर देऊ गेल्यास खऱ्याचे खोटे व खोट्याचे खरे करू शकणाऱ्या चलाख, हिकमती व्यक्तींची, डोकेबाज न-नैतिक धंदेवाईक भूमिकेमधून काम करणाऱ्या वकीलांची, बलिष्ठ व धनिक मंडळींची, कायदा वाकवू शकणाऱ्यांची असे उत्तर हाती येण्याची शक्यता अधिक आहे.

हिंदुस्थानात 'कायद्याचे राज्य' (म्हणजे, सत्याचे, न्यायाचे प्रबुद्ध असे राज्य, असे वाचावे) अशी काही गोष्ट नाही;* सगळा लहरी, लांडीलबाडीचा, हडेलहप्पी कारभार आहे, असा निवाडा करीत एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर ब्रिटिशांनी जेव्हा परिश्रमपूर्वक कायद्यांची पुस्तके (कोड्स) तयार केली, त्यांच्या धाटणीची न्यायव्यवस्था उभारली तेव्हा, व्यवहारात, वैयक्तिक, कौटुंबिक व सामाजिक व्यवहार अधिक सत्यवादी, न्याय्य व समत्वनिष्ठ बनले, यामुळे भारतीय समाजाची नैतिक-सांस्कृतिक उंची वाढली, असे घडले नाही. नव्या व्यवस्थेत दडलेल्या संधींचा अंदाज ज्यांना घेता आला अशा स्वार्थी, चाणाक्ष, बेरकी, हुशार मंडळींनी या व्यवस्थेचा फायदा उठवला. या ओघात काही प्रकारच्या – मालमत्तेच्या वाटपावरूनच्या, कर्जव्यवहारावरूनच्या, करारपत्रांवरूनच्या वगैरे – बाबींवरूनच्या कज्जेदलालीत अनेक पटींनी वाढ झाली. मध्यस्थदलाल, वकील हे वर्ग भरभराटले; यातले अनेक मालमत्तावाले, धनाढ्य बनले. एकंदर परिणाम उत्पातकारी झाला.

ईस्ट इंडिया कंपनी ही व्यापारी कंपनी नफ्याचे उद्दिष्ट बाळगून कार्य करणारी पण त्याचवेळी इंग्लंडच्या साम्राज्यवादी विस्ताराच्या, युरोपीय राष्ट्रांच्या सत्तासंघर्षाच्या व त्यामधून उत्पन्न झालेल्या साम्राज्यवादी विस्ताराच्या राजकारणात सक्रिय असलेली कंपनी होती. १७५० नंतर एकदा तिचे रूपांतर एका भारतीय राज्यसत्तेत झाल्यावर, उपलब्ध संधींचा पद्धतशीरपणे फायदा उठवीत तिने सगळा उपखंड ताब्यात घेतला. पण इंग्लंडच्या साम्राज्याचे एक उपांग म्हणूनच तिने भारतावरील राज्याकडे पाहिले. येथील राजेरजवाड्यांचे तिने निरुपद्रवी शोभिवंत कळसूत्री बाहुल्यांमध्ये रूपांतर केले. येथील अर्थव्यवस्थेचे खच्चीकरण केले.

एका अर्थी, येथील अभिजनवर्गाला अपंग व निकामी बनवले; इंग्रजी राज्याचे चाकर म्हणूनच त्यांना गौण भूमिका बहाल केली. येथील प्रजेला रोजगार/व्यवसायविहीन, निशस्त्र व निस्त्राण बनविले. येथील एकेकाळची भरभराटलेली, जोमदार समाजव्यवस्था पार मोडकळीला आणून ठेवली.

### ६. इंग्रज राज्यकर्त्यांचा समाजपुनर्रचनेचा प्रकल्प

हिंदुस्थानावर साम्राज्य प्रस्थापित करणारे इंग्रज आधुनिकयुगीन होते आणि त्यांचे साम्राज्यही आधुनिक युगातले होते. व्यापारासाठी शस्त्रबळाने पृथ्वीवरील वेगवेगळ्या भूभागांतील समाजांना अंकित करणे, काहींना तर मोठ्या प्रमाणावर नष्ट करणे, तेथे आपल्या लोकांच्या वसाहती करणे याला, 'यात आमचा स्वार्थ आहे, गौरव आहे', असे रांगडे स्पष्टीकरण व समर्थन त्यांना स्वतःलाच पुरेसे वाटले नाही. इंग्लिश राष्ट्र हे ख्रिश्चन होते तसेच प्रबोधनयुगाचे, विज्ञानयुगाचे वारसदार होते, हे आपण पाहिले.

ज्ञानाच्या द्वारे नियंत्रण व सत्ता प्राप्त होते; आणि तिचा वापर करून आपण निसर्गावर 'विजय' मिळवावा ('कॉंक्वेस्ट ऑफ नेचर'), आणि निसर्गाला आपले हेतू साध्य करण्याच्या कामी लावावे, ही जबरदस्त प्रेरणा या युगात उत्पन्न झाली; ते एक प्रधान, महत्त्वाकांक्षी उद्दिष्ट बनले. ज्ञान प्राप्त झाले की अज्ञानांधःकार दूर होतो, वा करता येतो, आणि माणूस, व्यक्ती तसेच समूह प्रबुद्ध, उन्नत व परिपूर्ण बनत जातात;

* कोहन यांच्या पूर्वोक्त लेखातले पुढील दोन-तीन उतारे उद्‌बोधक आहेत : (१) "Generally speaking, most of the British who were concerned with Inida agreed that India had a state system... which had recognisable institutions and functions of a state. They also agreed that the peoples of India.... had an ancient civilization and forms of self-governance that were stable and deeply entrenched." (पृ. ५८). (२) "The British realized that there were a large number of judicial officials in India, and a regular system of courts, with the Mughal's *darbar* (court) at the top, and that redress was always open to the subjects of the emperor by going to his court to seek justice." (पृ. ६४)

म्हणजे, माणसाच्या नैसर्गिक अवस्थेतील अविवेकी, विकारी, अडाणी, रानटी स्वभावप्रकृतीवर 'विजय' मिळविण्याचे ज्ञान हे सर्वोत्तम साधन आहे. म्हणून शिक्षण देण्याचे महत्त्व. ही प्रबोधन युगाची मध्यवर्ती धारणा.

जगामध्ये ख्रिस्ती (वा इस्लाम) धर्माचा प्रसार करीत असताना अनन्वित अत्याचार केले गेले आहेत, पराकोटीची असहिष्णुता प्रकट झाली आहे खरी. पण ख्रिस्ती (वा मुस्लिम) धर्माची दीक्षा घेतल्याखेरीज तारण नाही, कारण तोच एकमेव खरा धर्म आहे, ही दृढ श्रद्धा होती हेही खरेच. या श्रद्धेपासून बळ व संदेश प्राप्त करून, जगभरच्या धर्मविहीन वा खोट्या धर्मांच्या विळख्यात सापडलेल्या माणसांना तारण प्राप्त करून देण्याचे आपले कर्तव्य पार पाडण्याची प्रेरणा धर्मप्रसारकार्याच्या पाठीशी होती, ही गोष्ट विसरता येत नाही.

स्वार्थ आणि परमार्थ यांचा विलक्षण संयोग साम्राज्यवादाच्या उपक्रमामध्ये झालेला होता. आधुनिकयुगीन साम्राज्यवादाचे हे व्यवच्छेदक लक्षण म्हणता येईल. याच कारणामुळे असेल, पण कॉन्झर्व्हेटिव्ह विचाराच्या मंडळींपेक्षाही लिबरल, युटिलिटेरियन विचाराच्या मंडळींचा साम्राज्यविस्ताराविषयीचा उत्साह जास्त आढळतो. *लिबरॅलिझम अँड एम्पायर* या ग्रंथात उदय मेहता यांनी हा विषय हिंदुस्थानचेच उदाहरण घेऊन अलीकडे विस्ताराने मांडला आहे. कोह्न यांच्या उपरोक्त पुस्तकाच्या 'फोरवर्ड' मध्ये निकोलस डर्क्स लिहितात, "The cultural effects of colonialism have too often been ignored or displaced into the inevitable logic of modernization and world capitalism; but more than this, it has not been sufficiently recognized that colonialism was itself a cultural project of control... Cultural forms in societies newly classified as 'traditional' were reconstructed and transformed by and through this knowledge, which created new categories and oppositions between colonizers and colonized, European and Asian, modern and traditional, West and East... Britain set in motion transformations every bit as powerful as the better known consequences of military and economic imperialism."(पृ. ix).

राज्यसत्तेचा वापर करून समाजाची मूलगामी पुनर्रचना करण्याचे उदात्त उद्दिष्ट हिंदुस्थानच्या नव्या राज्यकर्त्यांनी अंगिकारले. आंतरराष्ट्रीय राजनैतिक, व्यापारी-आर्थिक हितसंबंधांच्या पूर्ततेसाठी नाही, तर हिंदी लोकांचा उद्धार करण्यासाठी आम्ही येथे आहोत; – १८५७ नंतरच्या काळात येथे राज्य करण्याचे त्यांचे मुख्य समर्थन हे होते. हे नैतिक-तात्त्विक समर्थन नसते तर लिबरॅलिझमचा राजकीय विचारव्यूह अंगिकारून वर साम्राज्यवादी राहता आले नसते. एरिक स्टोक्स यांचे *द इंग्लिश युटिलिटेरियन्स अँड इंडिया* या मथळ्याचे पुस्तकच आहे. एकोणिसाव्या शतकाच्या साधारणपणे तिसऱ्या दशकानंतरच्या काळात राज्यसत्तेचा वापर करून पुनर्रचनेचा व्यापक उपक्रम कोणता व कसा हाती घेतला गेला याचे उद्बोधक विवेचन त्यात केले आहे.

इंग्रज व भारतीय यांच्या संबंधात एक ठळक, आमूलाग्र असे स्थित्यंतर १७५० नंतरच्या पन्नास वर्षांमध्ये घडून आल्याची नोंद आपण घेतली. वस्तुतः, १६०० ते १७५० या दीडशे वर्षांच्या काळात भारतीय समाजाशी त्यांचा साक्षात् परिचय होताच. वेगळेपणाचे स्पष्ट भान त्यांना होते, आणि आपले इंग्लिशपण, ख्रिश्चनपण वेगळे राखण्याबद्दल आग्रहही होता. त्यांच्यातल्या अनेकांनी भारतीय जीवनशैली अंगिकारली. अनेकांनी, औपचारिकरित्या धर्मपत्नी म्हणून स्वीकार न करता, येथील बायका केल्या व संसारही केला ही वस्तुस्थिती असली तरी, आपण वेगळे लोक आहोत हे पक्के मनात होतेच. येथील लोकांचे सगळेच वेगळे आहे, विचित्र वाटावे असेही बरेच काही आहे; पण हा एक शक्तिशाली, भरभराटलेला, सुव्यवस्थित समाज आहे ही मान्यता होती. विचारात पाडणारी गोष्ट अशी की, या कालखंडात त्यांनी जे 'ज्ञान' संपादन केले ते पुढच्या टप्प्यावर बाद ठरल्यासारखे होते. त्यांचा 'चष्मा' बदलतो, पवित्रा बदलतो, आणि हेतूही बदलतो. आता, प्रथमतः, दुहेरी मूल्यन आहे. आपण सर्व बाबतीत श्रेष्ठ आहोत, कारण आपला जीवनव्यवहारांना ज्ञानाचे अधिष्ठान आहे. या उलट, हे हिंदुस्थानी लोक – विशेषतः हिंदू –, यांचे सारे व्यवहार रूढी वा धर्मप्रणीत (म्हणजे वस्तुतः अधर्मप्रणीत) आहेत. ते पृथ्वीच्या पाठीवरील काही मानवसमाजांसारखे रानटी नाहीत हे खरे, पण ते अज्ञानी आहेत. त्यांच्या ठायी विवेकशक्ती ('रीझन') चा उदय व्हावयाचा आहे. या अर्थाने त्यांची अवस्था अज्ञान पाल्याची आहे.




अशा या लोकांवर आपल्याला राज्य करावयाचे आहे. ते राज्य असे करावयाचे आहे की ज्यामुळे ते जगातील सर्वश्रेष्ठ सभ्यतेशी (म्हणजे 'वेस्टर्न सिव्हिलायझेशन' शी, त्यातही सर्वोच्च अशा ब्रिटिश सभ्यतेशी) जोडले जातील, तिचा भाग बनतील आणि पायरीपायरीने प्रबुद्ध होत जातील. यांचे म्हणून जे जे काही आहे ते टाकाऊच आहे; फारसे काही मूळात नाहीच. पण ते निर्मूल करण्यासाठीही आधी नीट माहिती करून घेतली पाहिजे, वर्गीकरण व मूल्यन केले पाहिजे, व नियंत्रण प्रस्थापित करण्यासाठी संपादित केलेल्या ज्ञानाचा कुशलतेने वापर केला पाहिजे.

जो चष्मा आपण घालतो, जी चौकट आपण वर्गीकरणासाठी, मूल्यनासाठी वापरतो त्यामुळे ज्याला आपण 'ज्ञान' म्हणतो त्याचा आशय व आकार ठरतात. हे चष्मे आणि चौकटी पूर्वग्रहनिरपेक्ष, हेतूनिरपेक्ष नसतात. उदाहरणार्थ, लिहिता-वाचता येणारा तो 'साक्षर', ज्याला लिहिता-वाचता येत नाही तो 'निरक्षर', हे वर्णन तटस्थपणे कोणत्याही मूल्यनाशिवाय केलेले वर्णन कधी म्हणता येईल? निव्वळ तांत्रिक अर्थाने निरक्षर माणूस प्रत्यक्षात सुसंस्कृत व ज्ञानी, आणि म्हणून अनेकानेक 'साक्षर' माणसांपेक्षा श्रेष्ठ व श्रेयस्कर असू शकतो, हे जर पक्के मान्य असले तर. पण निरक्षरचे समीकरण अडाणी, मागास, असंस्कृत यांच्याशी घातले गेले की मामला बदलतो व बिघडतो.

येथील समाजाचे पालकत्व करण्याची भूमिका घेणाऱ्या नव्या राज्यकर्त्यांचा भर लोकांच्या 'कल्याणा'ची काळजी वाहणाऱ्या समर्थ व सर्वंकष राज्यसत्तेची पोलादी चौकट उभी करण्यावर होता : अजाण, अपात्र मुले स्वतःचे हित कशात आहे हेही जाणू शकत नाहीत व ते स्वतःच्या भरवशावर हित साधूही शकत नाहीत, ही भूमिका आग्रहाने घेतली गेली. युरोपमध्येही कोणत्या दिशेने वाटचाल होत होती ते कोहून यांनी त्यांच्या उपरोक्त पुस्तकाच्या 'प्रास्ताविका'त सांगताना म्हटले आहे, 'From the eighteenth century onwards European states increasingly made their power visible... through the gradual extension of "officializing" procedures that established and extended their capacity in many areas... The state licensed some activities as legitimate and suppressed others as immoral or unlawful. With the growth of public education and its rituals, it fostered official beliefs in how things are and how they ought to be. The schools became the crucial civilizing institutions and sought to produce moral and productive citizens.' (पृ. ३)

१८१३ नंतर ईस्ट इंडिया कंपनीची व्यापारी मक्तेदारी पार्लमेंटने संपुष्टात आणली. इंग्लंडचे व्यापारी, औद्योगिक आणि आर्थिक हितसंबंध राखणारी धोरणे राबविणे, इंग्लंडच्या साम्राज्याचे रक्षण व विस्तार करण्याचा काही आर्थिक बोजा भारतावर टाकणे, सरकारी नोकऱ्यांच्या द्वारे इंग्लडमधील व्यक्तींना रोजगाराच्या संधी राखीव पद्धतीने उपलब्ध करून देणे हे आता व्यापाराऐवजी कंपनीचे मुख्य काम बनले. इंग्लंडची धन करण्यासाठी, इंग्लंडच्या सत्ता व वैभवासाठी हिंदुस्थानच्या साधनसंपत्तीचा व्यय करण्याची भूमिका अबाधित ठेवून येथील समाजाची पुनर्रचना करण्याचे, येथील लोकांचे कल्याण करण्याचे आणि त्यांचे उद्बोधन करण्याचे काम करावयाचे होते. या कारणाने, जी औद्योगिक क्रांती इंग्लंडमध्ये घडून येत होती तिचा येथे विस्तार करून औद्योगिक भरभराट घडवून आणण्यासाठी पुढाकार घेण्याचे काम केले गेले नाही. शेतीवरील कराचा भार कमी करता येत नव्हता, कारण तेच तर सरकारचे मुख्य उत्पन्न होते. औद्योगिक कच्चा माल म्हणून ज्या पिकांचा उपयोग होतो त्या पिकांच्या लागवडीला प्रोत्साहन दिले गेले. पण बाकी मग भर 'सार्वजनिक बांधकामे' काढून – रस्ते, धरणे, पूल, रेल्वे मार्ग इ. – काही रोजगार व उत्पन्न लोकांच्या पदरात टाकण्यावर ठेवला गेला.

समाजपरिवर्तनाची मुख्य क्षेत्रे कोणती होती? शासनाच्या कक्षेत मोडणाऱ्या औपचारिक सार्वजनिक व्यवहाराची व्यक्ती ही बैठक ठरविली गेली; व्यवस्थेला व्यक्तिवादी पाया दिला गेला. खाजगी मालमत्तेचे तत्त्व आग्रहपूर्वक प्रविष्ट केले गेले. आर्थिक व्यवहारांमध्ये खाजगी मालमत्तेचे तत्त्व पायाभूत म्हणून स्वीकारले गेले; तिच्या खरेदी-विक्रीवरचे निर्बंध उठविले गेले. गोतावळा (बिरादरी), जात, जातपंचायत, गाव – असे जे समुदाय होते त्यांना अधिकृत कायदेशीर मान्यता उरली नाही. गाव हे प्रशासकीय एकक (युनिट) बनले, पण ते आणि पूर्वीची गाव-पंचायत या गुणात्मकदृष्ट्या व व्यवहारातही






वेगळ्या संस्था ठरल्या. व्यक्तींनी, मंडळ्यांनी 'राजीखुषीने' केलेले व सरकारदरबारी नोंदवलेले करार हा आर्थिक व अन्य व्यवहारांचाही नवा पाया वा नवी चौकट ठरली. 'फ्रॉम स्टेटस टू कॉंट्रॅक्ट' असे या परिवर्तनाचे वर्णन केले गेले आहे.

सरकारदरबारी निर्दिष्ट अधिकारपात्र अधिकाऱ्याकडे/कार्यालयात नोंदणी केलेले व्यवहार तेवढे वैध व प्रमाण; किंवा जो व्यवहार नोंदला गेला नसेल तो घडलेला नाही, असे शासन आता म्हणू शके. जीवनव्यवहारांचे सरकारीकरण व नोकरशाहीकरण झाले तशी समाजाची पूर्वीची घडी विस्कटली.

'कायद्याचे राज्य' हे आधुनिक लिबरल लोकशाही राज्यव्यवस्थेचे एक व्यवच्छेदक लक्षण मानले जाते. हे सांगण्याचा मथितार्थ असा असतो की, पूर्वीच्या राज्यव्यवस्था या व्यक्तिंगत, लहरी, अस्मानी-सुलतानी व्यवस्था होत्या. शिवाय जे काही कायदे होते ते सर्वांना समानतेने लागू असत नाहीत हीच 'व्यवस्था' असे. 'कायद्यासमोर सर्व व्यक्ती समान' असा 'कायद्याचे राज्य' याचा एक अर्थ. (पुष्कळदा हे औपचारिकत:ही खरे नसते. कारण कायदेच वर्णभेद, वंशभेद, धर्मभेद, लिंगभेद व अन्यभेद करणारे असतात. व्यवहारात तर कायद्यासमोर सगळे समान ठरत नाहीत हा अनुभव सर्व समाजांमध्ये येतोच.)

पण 'कायद्याचे राज्य' याचा एक अर्थ असाही होताना दिसतो – शासनाच्या दप्तरी नोंदलेले कायदे, त्यांचे राज्य. आणि प्रवृत्ती अशी की, कायद्यांची संख्या वाढत जाते; जीवनाची अधिकाधिक क्षेत्रे कायद्याच्या कक्षेत आणली जातात. व्यवहारात याचे दोनतीन परिणाम होतात : (१) नोकरशाहीची पोच सर्वदूर निर्माण होते, हस्तक्षेप वाढतो आणि कर्मचारी-अधिकारी यांची लहरी सत्ताही वाढते. (२) जास्तीत जास्त जीवन कायदे, नियम, न्यायव्यवस्था, पोलिसयंत्रणा यांच्या कचाट्यात सापडते. (३) हिंदुस्थानसारख्या देशात यामधून मध्यस्थ-दलाल, वकील, 'दादा' मंडळी यांचा मोठा वर्गच अस्तित्वात येतो व भरभराटतो. कायद्याचे राज्य हे अडवणूक, दडपणूक, पिळवणूक यांचे फार प्रभावी साधन ठरू शकते.

आपले राज्य प्रबुद्ध ठरावयाचे असेल तर ते ज्ञानावर आधारले पाहिजे; किंबहुना, ज्ञानाद्वारे सत्ता व प्रभुत्व यांची संपादणी होते, ही प्रबुद्ध धारणा होती. सत्ता गाजवायची–ती गाजवायलाच हवी – याविषयी लिबरल इंग्लिश मंडळींच्याही मनात कोणत्याही प्रकारचा संदेह नव्हता. कारण ती येथील, त्यांच्या मते, भोळ्या-भाबड्या, अडाणी, असंस्कृत, मागास, दरिद्री सामान्य जनतेची गरज होती. पण राज्यसत्ता शास्त्रशुद्ध, प्रबुद्ध नसेल तर युटिलिटेरियन ('जास्तीत जास्त लोकांचे जास्तीत जास्त सुख') कसोटीला इंग्रजी राज्य उतरणार नव्हते. तेव्हा नव्या राज्यकर्त्यांनी 'ज्ञान' संपादन करण्याचा प्रचंड उद्योग केला. या उद्योगाचा हेतू तिहेरी होता : (१) या लोकांवर आपले प्रभुत्व व आपली सत्ता घट्टपणे प्रस्थापित झाली पाहिजे. यासाठी लबाड, चलाख, धूर्त, कारस्थानी नेटिव अभिजन वर्गावर आपणास विसंबून राहण्याची गरज उरता कामा नये. (२) इंग्रजांची सर्वंकष सत्ता आपल्याच भल्यासाठी कशी अत्यावश्यक आहे, आणि ती प्रदीर्घकाळ टिकून राहणे कसे इष्ट व आवश्यक आहे हे या ज्ञानाधारे पटवून देता आले पाहिजे. आणि (३) या ज्ञानाच्या आधारे इंग्लंडचे साम्राज्यवादी राजकीय व आर्थिक हितसंबंध राखत व संवर्धित करीत येथील प्रजेचे प्रबोधन, उन्नयन व सक्षमीकरण करता आले पाहिजे. इंग्लडचे साम्राज्यवादी हितसंबंध साधणे आणि एतद्देशीयांचा भौतिक व मानसिक-सांस्कृतिक उद्धार साधणे यात विसंवाद तर नाहीच, पण त्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत हे पटवून देता आले पाहिजे.

या उद्योगाचा भाग म्हणून भारताचे इतिहास लिहिले गेले. या इतिहासांचे प्रयोजन व कार्य कोह्न यांनी स्पष्ट केले आहे : "....they can be seen to have begun the formation of a legitimizing discourse about Britain's civilizing mission in India". (पृ. ६)

अनेकविध सर्वेक्षणे हाती घेतली गेली. किती विविध प्रकारची माहिती या सर्वेक्षणांमधून गोळा केली गेली त्याची चुणुक गॅझेटियरांवरून येते. पुढच्या काळातील जनगणनां-विषयक अहवाल, प्रबंध यांवरूनही येते. या माहितीची मांडणी हिंदुस्थानचे एक चित्र ('रेप्रेझेंटेशन'; प्रतिकृती) समोर ठेवण्याच्या अंगाने करीत असताना, एका गतिमान, जिवंत, रसरशीत समाजाचे व लोकांचे ते चित्रण न होता, अपरिवर्तनीय पुराण व कालबाह्य समाजाचे ते चित्रण बनले. कारण ज्यांनी सर्वेक्षण केले त्यांची येथले लोक, त्यांच्या सामाजिक संस्था, रीतीभाती, व्यवस्था यासंबंधी धारणाच तशी बनली होती.

यांमध्ये जनगणनांचे आपले एक स्वतंत्र स्थान व महत्त्व आहे. भारतीय जनगणना, तिच्यासाठी तयार केलेले आराखडे,

व तिच्या अनुषंगाने सादर केले गेलेले अहवाल यांमधून भारतीय समाजाचे एक सर्वांगीण समाजशास्त्रीय चित्र सादर केले गेले आहे. या चित्रणापाठीशी सिद्धांतनही, आणि एक 'चष्मा'ही, राहिला आहे. कोह्न म्हणतात, "It is my hypothesis that what was entailed in the construction of the census operations was the creation of social categories by which India was ordered for administrative purposes... through the enumerative modality, the project also objectified social, cultural and linguistic differences among the peoples of India." जे वास्तव होते ते त्यांनी नोंदवले असे घडले नाही. अनेक महत्त्वाच्या विषयांत गतिमान व म्हणून काहीशा संदिग्ध असणाऱ्या अनेक बाबींच्या बाबतीत त्यांनी स्वतःच्या निर्णयाने 'वास्तव' निर्माण केले ('ऑब्जेक्टिफाइड'). जात, धर्म यांच्या क्षेत्रात असे घडण्याचे दूरगामी परिणाम झाले. अनेक जातींचे नामकरण 'नोटिफाइड अँड क्रिमिनल ट्राइब्ज' असे केले गेले, हे आपणास परिचित आहे.

सामाजिक पुनर्रचनेचा हा जो प्रकल्प हाती घेतला होता तो केवळ स्वतःच्या भरवशावर व सामर्थ्यावर इंग्रज राज्यकर्ते पार पाडू शकणार नव्हतेच. याची त्यांनाही पूर्ण कल्पना होतीच. त्यांचे राज्य चालवायलाही त्यांना कनिष्ठ पातळ्यांवरील अधिकारी व कर्मचारी लागणारच होते. लिखापढी जाणणारा, राज्यकारभाराच्या वेगवेगळ्या पातळ्यांवर कामे करण्याचा प्रदीर्घ अनुभव असलेला कुशल वर्ग (विशिष्ट जातींच्या रूपात) भारतभर होताच. या वर्गातल्या मंडळींशी कंपनीच्या मंडळींचा संबंध होताही. इंग्रजी भाषा ही राज्यकारभाराची भाषा ठरल्यावर इंग्रजीचे ज्ञान आवश्यक बनले. शाळांचे रीतसर जाळे निर्माण होण्याआधी कामचलाऊ इंग्रजी शिकण्याच्या सोयी, मागणी तसा पुरवठा या न्यायाने, अस्तित्वात येत गेल्याही. यात मिशनऱ्यांनी चालविलेल्या शाळांनीही एक भूमिका बजावली हे आपणास माहीत आहे. येथे करावयाचा मुद्दा हा आहे की, इंग्रजांनी कारकून निर्माण करण्यासाठी शाळा, कॉलेजे, विद्यापीठे उघडली असे जे सर्रास म्हटले जाते ते अंशतःच खरे आहे. नवे आंग्ल शिक्षण येथे आवर्जून देण्यामागचे महत्वाचे प्रयोजन कोह्न यांनी वर स्पष्ट केले ते असे आहे : इंग्रजांच्या साम्राज्यवादी भूमिकेचे, त्यांच्या 'सिव्हिलायझिंग मिशन'चे मनःपूर्वक समर्थन करणारा व यामध्ये सहभागी होणारा शिक्षितांचा एक वर्ग त्यांना निर्माण करावयाचा होता. आपल्याबरोबर दुय्यम सहकारी म्हणून इमानेइतबारे काम करता करता हा वर्ग प्रबुद्ध व लायक बनेल; तसा तो प्रबुद्ध व लायक बनत चालला की त्याच्या पात्रतेनुरूप त्याच्या हाती कारभारातल्या योग्य तेवढ्या गोष्टी सोपविता येतील; हे पण शिक्षणाचे एक प्रयोजन व कार्य होते. आपला नमूना पुढे ठेवून – कारण इंग्रज हा जगातला सर्वश्रेष्ठ सुसंस्कृत व प्रगत माणूस, आणि इंग्लिश ही सर्वोच्च सिव्हिलायझेशन –, त्या नमुन्याबरहुकूम (केवळ कातडीच्या रंगाचा फरक तेवढा राहील) सुशिक्षित भारतीयांचा वर्ग निर्माण करण्यात यश आल्यास मग अशा वर्गाच्या हाती राज्य सोपवायला हरकत नसेल. कारण हा वर्ग भारताला आपल्याएवढ्याच निष्ठेने ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक मानून राज्य करील अशी इंग्रज राज्यकर्त्यांना खात्री होती. अर्थात हे घडून यायला अनिश्चित असा प्रदीर्घतम काळ लागणार होता हे गृहीतक होते.

या त्यांच्या उपक्रमात इंग्रज कमालीचे यशस्वी झाले. भारतीय समाजाचे जे ऐतिहासिक-सामाजिक चित्र त्यांनी नवशिक्षितांच्या मनावर ठसविले ते 'शास्त्रशुद्ध' पद्धतींनी गोळा केलेल्या माहितीमधून संपादित केलेल्या 'ज्ञाना'च्या आधारे. पण काही अपवादभूत चांगला भाग वगळला – आणि असा अपवादभूत चांगला भाग कोणता तेही त्यांच्या समजुतीनुसार इंग्रजांनी सांगितले – तर, नव्या जमान्यात आपली सुधारणा व प्रगती व्हावयाची असेल तर, आपले ते बव्हंशी सारे टाकून देऊन, वेगळ्या पायावर नव्याने समाज व संस्कृती यांची उभारणी करावयास हवी ही येथील उच्चशिक्षितांची मनोधारणा घडविण्यात ब्रिटिशांना यश आले. 'इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान होय' असे उद्गार या यशाचे निदर्शक म्हणता येतील.

भारताच्या प्राचीन साहित्याचा, इतिहासाचा अभ्यास जसा इंग्रजांनी चालविला तशी, बऱ्याच प्राचीन काळी भारत हा प्रगत समाज होता ही गोष्ट त्यांना मान्य करावी लागली. संस्कृतमधील धर्मग्रंथ व शास्त्रग्रंथ अभ्यासताना काव्य, तत्त्वज्ञान अशा काही विषयांत येथे फार मोठी उंची गाठली गेली होती हे स्पष्ट झाले. संस्कृत ही भारतीय-युरोपीय (इंडो-युरोपियन) भाषाकुलातील भाषा असल्याचे लक्षात

अनुक्रमणिका

आल्याने, प्राचीन काळी कधी तरी या भाषा बोलणाऱ्या लोकांचे आद्य पूर्वज हे एकच लोक असणार, व त्यांचे वास्तव्य एकाच प्रदेशात असणार हा निष्कर्ष काढला गेला. हिंदुस्थानातल्या ज्यांची भाषा संस्कृत ते 'वैदिक आर्य' व त्यांचे वंशज यांच्याशी युरोपीय गौरवर्णियांचे असे जवळचे नाते प्रस्थापित झाले. हिंदुस्थानात मध्ययुगात मुघल साम्राज्याने जो विस्तार गाठला होता आणि जे वैभवशाली रूप धारण केले होते तेही नाकारता येण्यासारखे नव्हते. हीच हकीकत विजयनगरच्या साम्राज्याची होती. या गुंत्यामधून सोपी सोडवणूक अशी करून घेतली गेली की, प्राचीन काळी, पूर्वीच्या काळी वाङ्मय, तत्त्वज्ञान, राज्यविस्तार, राजकीय कर्तृत्व या क्षेत्रात उंची गाठली होती हे खरे; पण या केवळ अपवादभूत गोष्टी अपवादात्मक व अल्प काळापुरत्याच खऱ्या. त्या वगळून जे उरते, आणि जे समाज व संस्कृतीचे खरे सनातन स्वरूप प्रकट करते ते हिणकस, ओंगळ, अविवेकी, अमानुष, अडाणी, दळभद्री आहे. येथील 'बिचाऱ्या' सामान्यजनांची स्थिती नेहमीच अर्धनग्न, अर्धपोटी, अज्ञानांध:कारात हरवलेली अशी राहिलेली आहे. तेव्हा, खरी अवस्था ही बालकाचीच होती व आहे. इंग्रजांचे राज्य हे ईश्वरी वरदान आहे असे म्हणणाऱ्यांनीही बव्हंशी हे प्रतिपादन मान्य केले असे दिसते. म्हणजे, उपनिषदांमधले तत्त्वचिंतन, वेदांताची शिकवण, वेदात आढळणारा प्रतिभेचा अद्‌भुत काव्याविष्कार, भगवान बुद्धाची शिकवण; राज्यकारणाच्या क्षेत्रात चंद्रगुप्त मौर्य, अशोक, पुढील काळातील अकबर, शिवाजीमहाराज; इथल्या संतांचे भक्तिकाव्य – अशा गोष्टी सुट्या सुट्या स्वरूपात आधाराला घेऊन ज्यांनी सुधारणेच्या चळवळी (ब्राह्मो समाज, प्रार्थना समाज इत्यादी) स्थापन केल्या त्यांनीही ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या भूमिकेची चिकित्सक परखड तपासणी केलेली दिसत नाही.

ब्रिटिशांनी आमचा स्मृतिलोप घडवून आणला; आमचा एक प्राचीन इतिहास आहे, आम्हाला गौरवशाली परंपरा आहे याची आठवणच त्यांनी पुसून टाकली, असे कोणी म्हणत असेल तर ते वस्तुस्थितीला धरून नाही. उलटपक्षी, आमचा गौरवशाली प्राचीन इतिहास त्यांनी प्रकाशात, अक्षरश: प्रकाशात आणला. अजिंठ्याच्या लेण्यांचे एक उदाहरण देखील बोलके आहे. किंबहुना, शिवाजीमहाराजांच्या समाधीच्या दुरवस्थेकडे, किल्ल्यांच्या उपेक्षेकडे ठळकपणे लक्ष वेधणारे इंग्रज राज्यकर्तेच होते. ज्ञानसंपादनासाठी त्यांनी केलेल्या प्रचंड उद्योगांमुळेच आत्मविश्वास व आत्मसन्मान परत मिळविण्यासाठी सबळ आधार आम्हाला लाभले.

पण येथेही अंतर्मुख होऊन विचार करण्याचे मुद्दे आहेत. आमचा उज्ज्वल, गौरवशाली इतिहास, आमची परंपरा, आमचे तत्त्वचिंतन, आमचा धर्मविचार, आमचे वाङ्मय, आमच्या कला यांच्याही बाबतीत आमच्या आंग्ल-शिक्षित नव अभिजनवर्गाने आपली मते राज्यकर्त्यांच्या मतांना अनुसरून बनविली अशी दाट शक्यता आहे. कारण हे सर्व शोध लावत असताना हा नवा अभिजनवर्ग येथील सामान्यजनांशी मनाने जोडला गेला असे अनुभवाला येत नाही. नवअभिजनवर्गाने प्राचीन व मध्ययुगीन भारताच्या वारशातला चांगला, गौरवशाली भाग कोणता, व कोणत्या कारणासाठी, हे मूल्यन इंग्रजांकडूनच घेतले. म्हणजे, मानसिक जडणघडण त्यांनीच केली. म्हणजे, या मुद्यावरूनही, येथला नवा अभिजनवर्ग येथील सामान्यजनांपासून तुटलेला व नव्या राज्यकर्त्यांशी जोडलेला, त्यांनी प्रभावित, त्यांनी घडविलेला राहिला.

हा नवा अभिजवर्ग पुढे राजकीय अधिकारांची, सत्तेत वाटा मिळण्याची मागणी करू लागला, आणि स्वत:च्या मागण्यांना पुष्टी म्हणून इंग्रजाचीच राजकीय विचारप्रणाली व त्यांच्या स्वदेशातील कृती यांचा आधार घेऊ लागला. तेव्हा, या वर्गाचा 'बाबू लोक' म्हणून तुच्छतेने उल्लेख करीत, या बाबूंच्या विरोधात जनसामान्य हिंदवासीयांचे भले चाहणारे, त्यांना निष्ठा बाळगणारे आम्ही, अशी भूमिका इंग्रज राज्यकर्त्यांनी घेतली.

हिंदुस्थानातील लोकांना, तत्कालीन एतद्देशीय राजवटींना इस्लामचे धार्मिक व राजकीय आक्रमण थोपवता आले नाही. ते वेगवेगळे आणि एकत्र, दोन्ही रूपांत झाले. (तत्कालीन लोकांना व राजवटींना तुमची ओळख द्या असे म्हटले असते तर त्यांनी 'हिंदू' हा शब्द वापरला असताच याची खात्री देता येत नाही. इस्लाम व मुस्लिम राजवटी यांच्यामुळे, त्यांच्या विरोधामध्ये 'हिंदू' ही ओळख हळूहळू रुजत, ठसत व रेखीव बनत गेली.) कालांतराने जेव्हा या राजवटी येथे विस्तार पावल्या, प्रबळ झाल्या तेव्हा तत्पूर्वीच्या व्यवस्थेला व संस्कृतीला काही हादरे तर बसलेच. प्रशासकीय मांडणीही बदलली असेल. मुस्लिम राजवटींमध्ये हिंदूंना सर्वसाधारण गौणत्व

पत्करावे लागले असणारच. फारशी भाषा ही राज्यकारभाराची भाषा बनल्याचाही विपरीत परिणाम तर झाला असणारच. पण येथील हिंदू समाजाने प्राप्त परिस्थितीशी जुळवून घेऊन, या राजवटींनाही एक प्रकारे पचवले. येथले धर्मांतरित मुसलमान आणि बाहेरच्या देशांमधून आलेले मुसलमान यांचा धर्म औपचारिक-दृष्ट्या तोच एक असला तरी, आपण वेगळे, जास्त 'खरे' मुसलमान, व म्हणून श्रेष्ठ अशी भावना व भूमिका या राजवटींच्या परदेशी कुळींच्या उच्चतर अभिजन मुस्लिमांमध्ये आढळत असे. 'इथले' व 'बाहेरचे' असे तटही असत, व त्यांच्यात सत्तेवरून चांगली रस्सीखेचही चाले. पण येथील राजवटींना विशुद्ध परकीय राहण्यात यश आले नाही. औरंगजेबाला फार प्रयत्नपूर्वक मुघल बादशाहीला धार्मिक रंग देण्याचा खटाटोप करावा लागला. पण त्याची किंमत बादशाही इतकी दुबळी होण्यात झाला की ती नामधारी शिल्लक राहिली.

इंग्रजांनी प्रस्थापित केलेल्या राज्याचे वेगळेपण, ते परकीयांनी प्रस्थापित केलेले राज्य, हे केवळ नव्हते. वेगळेपण त्यांच्या शोषणपद्धतीतही होते. मुस्लिम राजवटी येथल्याच राजवटी झाल्यावर, येथल्या राजांचे, बादशहांचे वैभव, त्यांचे चैनविलास येथल्या अर्थव्यवस्थेच्या भरभराटीवर मुख्यतः अवलंबून असत. येथल्या व्यक्ती व समुदाय यांना कर्तृत्वाची क्षेत्रे, संधी उपलब्ध असण्यावर, कर्तृत्वाच्या वाटा मोकळ्या असण्यावर राज्याचे उत्पन्न अवलंबून असे. आपल्या राज्यातील शेती, उद्योगधंदे, व्यापार यांना बरकत यावी यासाठी राजे-बादशहा प्रयत्नशील असत. याच्याशी तुलना करता, इंग्रज हे इथले राजे बनले नाहीत. ईस्ट इंडिया कंपनी ही आरंभापासून इंग्लंडच्या राष्ट्र-राज्याच्या जडणघडणीत* सक्रिय होती. ज्या वेळी अठराव्या शतकामध्ये इंग्लंड एक प्रबळ साम्राज्यसत्ता बनली आणि हिंदुस्थानातही कंपनी एक राज्यसत्ता बनली तेव्हा, इंग्लंडच्या राज्यसत्तेचे नियंत्रण येथे प्रस्थापित केले गेले, आणि कंपनी ही एजंट बनली. याच सुमारास 'औद्योगिक क्रांती' नावाची घडामोड झाल्यानंतर, इंग्लंडच्या आर्थिक हितसंबंधासाठी आवश्यक त्या प्रकारचे खच्चीकरण येथल्या अर्थव्यवस्थेचे करणे हे धोरणच बनले. हिंदुस्थानचे शोषण चालू ठेवणे भागच होते, कारण पुरेसे उत्पन्न कर रूपाने प्राप्त करणे ही सर्वप्रथम शर्त होती. त्याच वेळी, शेती, उद्योगधंदे, व्यापार आदि प्रत्येक क्षेत्रात येथे कोणत्या संधी नाकारायच्या, कोणते जाचक निर्बंध घालावयाचे, कर्तृत्वाच्या कोणत्या वाटा रोखावयाच्या हे विचारपूर्वक ठरत असे. म्हणजे, शोषण पद्धतीच्या भरीला शासकीय मुस्कटदाबी हे पण एक वेगळेपण इंग्रजी राज्याचे म्हणून सांगता येते.

ब्रिटिश राजवटीचा कारभार चालविणारी बरीचशी मंडळी एतद्देशीय होती; कालांतराने हिंदी लोकांना काही एका प्रमाणात अगदी वरिष्ठ पदेही दिली गेली; लोकप्रतिनिधिक राज्य-पद्धतीचाही काही मर्यादांमध्ये अवलंब केला गेला. इतके सारे असूनही ही राजवट लोकांपासून तुटलेली, परकीयच राहिली. याचे एक गमक असे की, येथील उद्योगपतीही त्यांच्या मोठ्या आधुनिक उद्योगधंद्यांच्या उभारणीसाठी ब्रिटिश राज्यकर्त्यांशी सहकार्य करीत असल्याचे दृश्य दिसत असले तरी, भांडवलदार-उद्योगपती म्हणून त्यांची वाढ होण्यासाठी ब्रिटिशांचे राज्य जावे याची त्यांना निकड स्पष्ट जाणवत होती. या कारणाने काँग्रेसने चालविलेल्या स्वातंत्र्यलढ्याला त्यांचा पाठिंबा होता.

तात्पर्य असे की, साम्राज्यसत्तेची एक 'वसाहत' ही येथील समाजाला दिलेली भूमिका असल्याने, व ती वठविण्या-विषयी कटाक्ष असल्याने, १७५० पावेतो प्रगल्भ, समृद्ध व जोमदार असलेल्या येथील समाजव्यवस्थेची व अर्थव्यवस्थेची व्यापक, सर्वांगीण मोडतोड करून झाल्यावर आमूल समाज-परिवर्तनाचा प्रकल्प आखडता घ्यावा लागला. मूलगामी परिवर्तनासाठी येथील जातपात व स्पृश्यास्पृश्यता यांच्यात मोठा बदल घडवून आणणाऱ्या शक्ती मोकळ्या करणे गरजेचे होते. प्रबोधन युगाचे वारसदार या नात्याने दैनंदिन व्यवहारातील कर्मकांडी, रूढीप्रधान, अनाचारांच्या स्वरूपातील रीतीभातींनी व नाना पूजाअर्चांनी ओतप्रोत हिंदूधर्माचे – हिंदूधर्म व्यवहारात असा आहे हे त्यांचे मत होते हे ध्यानात घ्या – समूळ उच्चाटन करण्यासाठी ठोस पावले टाकण्यात त्यांनी वस्तुतः पुढाकार घ्यावयास हवा होता. हे धाडस करून आपले राज्यच उखडले जाण्याचा धोका पत्करावयाचा नाही हे ब्रिटिशांनी अव्वल इंग्रजीकाळातच ठरवले होते. परिवर्तनाचा संकल्प सोडूनच दिला गेला.

* कोहन यांच्या उपरोक्त पुस्तकाच्या 'फोरवर्ड' मध्ये निकोलस डर्क्स लिहितात, 'the historical anthropology of the colonial state must not be separated from the historical anthropology of the modern state in general.' (पृ. ६)

### ७. नवे 'इंग्रजी' शिक्षण

ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापारामध्ये त्यांना वेगवेगळ्या प्रकारे साथ देणारा एक वर्ग हिंदुस्थानात निर्माण झालेला होता. पण तो समाजाच्या बौद्धिक व्यवहारांमध्ये अग्रेसर असणारा वर्ग नव्हता. त्यांच्या नव्या राज्याला समाजाच्या उच्च वर्गांमध्ये अधिमान्यता प्राप्त व्हावी आणि या उच्चवर्गीयांनी नव्या परकीय राज्याचे समर्थन करावे ही राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीने गरज होतीच. हे राज्य त्यांच्या सहकार्यानेच चालवता येणार होते. अनुकूल मानस घडविण्याचे काम करण्यासाठी शिक्षण हे साधन म्हणून त्यांनी जाणीवपूर्वक निवडावे ही गोष्ट स्वाभाविकच होती.

ब्रिटिशपूर्व भारतीय समाजातही अनेक व्यवहारांसाठी लिखापढी केली जात होती. व्यापारी पेढ्यांच्या व्यवहारांत त्यांना याची पदोपदी गरज भासत असणार. राज्यकारभारासाठीही सार्वत्रिक गरज असणार. राज्यांना अधिमान्यतेसाठी, बदलत्या परिस्थितीने उभ्या केलेल्या प्रश्नांची उत्तरे काढण्यासाठी बौद्धिक-वैचारिक समर्थन, स्पष्टीकरण, सिद्धांतन यांचीही गरज पडतेच. हे काम धर्मसंस्था करीत असत असे म्हणता येईल. शास्त्री-पंडित, मुल्ला-मौलवी यांची दीर्घ परंपरा येथे होती. ग्रंथरचनाही होत होती. याखेरीज त्या त्या काळातल्या बंडखोर ('रॅडिकल') धार्मिक-सामाजिक चळवळींनीही साहित्य निर्माण केले. ते सर्व मौखिकच राहिले असे नाही. संतवाङ्मयाच्या पोथ्या लिखित स्वरूपातही होत्या. महानुभावांचेही ग्रंथ होते.

अर्थ असा की, हिंदुस्थानची समाजव्यवस्था व संस्कृती ही बऱ्यापैकी आधीच्या काळापासून, आणि मध्ययुगापासून तर विशेषच, केवळ मौखिक नव्हती; ती बऱ्यापैकी 'साक्षर' ('लिटरेट') होती. ती उच्च कोटीची बौद्धिक संस्कृतीही होती. याचा अर्थ असाही की, येथे शिक्षणाची बऱ्यापैकी सार्वत्रिक अशी औपचारिक व्यवस्थाही कार्यरत असणार. लिखापढीचे शिक्षण घेण्यास अनेक जातिजमातींना बंदी होती, की गरज नसल्याने असे शिक्षण त्यांच्यातील फार कोणी घेत नसे? उदाहरणार्थ, संतांच्या भक्तिकाव्याच्या पोथ्या वाचण्याइतकी साक्षरता, शूद्र-अतिशूद्र गणल्या गेलेल्या कोणामध्येच आढळत नव्हती अशी स्थिती वारकरी चळवळीच्या पार्श्वभूमीवर शक्य वाटत नाही. धर्मदृष्ट्या बंदी होती ती संस्कृतमधील अनेक विवक्षित ग्रंथांच्या श्रवणाला, पठणाला, अध्ययनाला. शास्त्रग्रंथांच्या आधारे शिक्षण देणाऱ्या पाठशाळा सर्वत्र होत्या. व्यावसायिक शिक्षण देण्या-घेण्याची व्यवस्था स्वतंत्रच होती. ती बव्हंशी जातपातीबद्ध होती, असे सर्वसाधारण विधान करता येईल.

इंग्रज ज्या गोष्टींना शिक्षण म्हणत होते ते शिक्षण येथे एका औपचारिक शासकीय व्यवस्थेद्वारा दिले जात नव्हते, पण म्हणजे येथे नाव घेण्याजोगी शिक्षण ही गोष्ट घडत नव्हती हा प्रसृत झालेला समज बरोबर नाही. या शिक्षणव्यवस्थेमधून नव्या इंग्रजी राज्याला अधिमान्यता मिळणार नव्हती, हे मात्र स्पष्ट होते. या पातळीची साक्षरता पुरेशीही पडणार नव्हती; इंग्रजी भाषेच्या शिक्षणाचीही आता व्यवस्था आवश्यक होती.

राज्यकारभाराचा एक अंगभूत भाग म्हणून शिक्षणखाते स्थापन करून निवडक गावी शासनाने शाळा सुरू केल्या. त्यांचे प्रयोजन दुहेरी-तिहेरी होते : आपले शासन लोकहितदक्ष आहे, लोकांना प्रबुद्ध करण्याचे उच्च ध्येय आपण बाळगतो, आणि येथे एक सज्ञान प्रागतिक समाज निर्माण करण्याची प्रक्रिया आपण सुरू करीत आहोत असा त्यांचा दावा होता. गर्भित संदेश असा होता की, आमची राजवट प्रस्थापित होण्यापूर्वीच्या राजवटी लोकहितदक्ष नव्हत्या, लोकांना अडाणी ठेवण्यात त्यांचा हितसंबंध होता, आणि आम्ही शिक्षणाचे कार्य हाती घेतले नसते तर हा समाज मागास व अडाणीच राहिला असता.

समाजामध्ये पूर्वीपासूनच लिखापढीची कामे करून जगणारा जो वर्ग होता त्याने तत्परतेने नवे 'इंग्रजी' शिक्षण घेतले, कारण त्यावर त्याचे पोटपाणी, त्याची भरभराट सरळसरळच अवलंबून होती. या वर्गातीलही अनेक व्यक्ती नव्या आंग्ल शिक्षणाकडे वळल्या नाहीत. धर्म बुडविणारे हे शिक्षण आहे असे त्यांना वाटले. अनेक सरदार, वतनदार, जागिरदार, जमीनदार घराण्यांतील मंडळींना लेखणी हाती धरून चाकरी करणे कमीपणाचे वाटले. अशा मंडळींबद्दल लोकहितवादींनी 'शतपत्रां'मधून त्यांची निर्भर्त्सना करीत लिहिले. ते लेखन आपल्या परिचयाचे आहे. असे शिक्षण घेऊन जे नोकरीचाकरीला लागले त्यांची ऐहिक भरभराट तर झालीच, पण त्यांना नव्या जमान्यात प्रतिष्ठा, मानमरातब प्राप्त झाले. ही मंडळी नव्या राजवटीची समर्थक बनली. यापैकी अनेकजण या राजवटीचे 'प्रचारक'ही बनले.

एक स्वतंत्र, गतिमान, कर्तृत्ववान, सुस्थितीतला नागर समाज असे मराठी राज्याचे – 'मराठा स्वराज्या'चे – चित्र होते. १८१८ नंतर या समाजातल्या राज्यकर्त्या वर्गाने त्याचा लष्करी-राजकीय पराभवच केवळ स्वीकारला नाही; मराठी राज्य म्हणजे एक अंदाधुंद अराजकाची स्थिती होती, आर्थिक विपन्नावस्थेला लोकांना नेऊन ठेवणारे ते राज्य होते, राज्यकर्ता वर्ग हा भ्रष्ट, नादान, कारस्थानी, अनीतिमान व स्वार्थी होता, या आशयाचा निवाडा, ही स्वतःची प्रतिमा राज्यकर्त्या वर्गातील नवशिक्षित मंडळींनी इतक्या सहजी, चिकित्सा न करता, कशी स्वीकारली हा प्रश्न आहे.

ही इंग्रजांनी प्रविष्ट केलेल्या नव्या इंग्रजी शिक्षणाची करामत म्हणता येईल. खरा प्रश्न असा आहे की, या शिक्षणाला एवढी मोठी करामत कशी साधली?

पेशवाई बुडविल्यानंतर इंग्रजांनी जी घडी बसविली तिने थोडक्याच काळात समाजाची अवस्था पराकोटीची उद्ध्वस्त व परावलंबी करून ठेवली. काही समाजघटकांचे – उदा., भिल्ल, रामोशी इ. – पोटपाणीच धोक्यात आल्याने त्यांनी बंडेही केली. ज्या सामाजिक थरांमधील मुले नव्या शिक्षणाकडे आणि नव्या राज्यात उपलब्ध झालेल्या नोकऱ्या-व्यवसायांकडे वळली त्यांनी, त्यांच्या अवतीभवती एकाएकी अवकळा आलेल्या, गोंधळात सापडलेल्या, कर्तृत्वहीन अवस्थेला आणून ठेवलेल्या समाजाचेच चित्र पाहिले. आधुनिक सर्वंकष केंद्रीभूत राज्यसत्तेचा, विशेषतः ती जेव्हा साम्राज्यसत्तेची 'कोठावळे' (हा टिळकांचा शब्द; 'एजंट' म्हणा) म्हणून 'वसाहती'च्या मुलखात प्रस्थापित होते तेव्हा हा विशेष आढळतो की, जीवनाच्या सर्व क्षेत्रांमधील अभिक्रम, निर्णय, निर्मिती यांचा ती ताबा घेते. वसाहतीतल्या लोकांना ती निःसत्त्व करते. यामुळे लोक ऐदी, आळशी, चुकार, संकुचित, कूपमंडूक वगैरे बनतात. याउलट सर्वशक्तिमान असलेली साम्राज्यसत्ता व तिची एजंट असलेली सत्ता, काही काळ तरी, लोकांना दिपवून टाकते. विशेषतः ती एका उन्नत अधिष्ठानाचा दावा करीत असेल, नैतिक-तात्त्विक श्रेष्ठत्व सांगत असेल, आणि त्या भूमिकेमधून आपल्या सर्व कृतींचे चित्रण जाणीवपूर्वक करीत असेल तर नक्कीच. स्वतःचे राज्य प्रस्थापित होण्या-पूर्वीच्या स्थितीचे काळ्या रंगात तर स्वतःच्या कारभाराचे धवल स्वरूपात चित्रण, आणि त्याला उचलून धरणारे तात्त्विक-नैतिक विचारव्यूह, शिक्षण घेणाऱ्या मुलांच्या मनांवर नव्या इंग्रजी शिक्षणाद्वारे बिंबवले गेले.

नवशिक्षितांच्या मनात त्याला अधिमान्यता उत्पन्न करून इंग्रजी राज्य येथे भक्कमपणे रोवण्यात शिक्षणाने लावलेला हातभार फार मोठा होता. हे एक परिणामकारक साधन/हत्यार ठरले.

१८५७ चा उठाव मूळात 'बंगाल इंडियन आर्मी' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या कंपनीच्या भाडोत्री सैन्यातील शिपायांनी केला. या उठावात आर्थिक-राजकीय हितसंबंध दुखावले गेलेले जमीनदार, संस्थानिक सामील झाले. पण सामील कोण झाले नाहीत? ठळकपणे, नवे शिक्षण घेतलेला आणि नव्या राजवटीत नोकऱ्या-चाकऱ्या, व्यवसाय करणारा पांढरपेशा वर्ग या उठावापासून बाजूला राहिला आणि हाच वर्ग पुढच्या काळातही ब्रिटिश राजवटीचा मुख्य आधारस्तंभ राहिला.*

आता, हीदेखील एक परिचित गोष्ट आहे की, नव्या इंग्रजी राजवटीत अंमलदार म्हणून येणारे बहुसंख्य तरुण इंग्रज हे बौद्धिक क्षमता, जाणतेपण, कर्तृत्व, वृत्ती यांबाबतीत सुमार ते निकृष्ट दर्जाचे होते. पण तो गोऱ्या कातडीचा व अंमलदार आहे, साम्राज्यसत्तेचा कोठावळा आहे म्हणून त्याच्यासमोर नमून वागावयास हवे हे भानच केवळ आढळते, किंवा गोऱ्या कातडीसमोर वाटणारी भीती, लाचारी आढळते, असे नाही; तर, तो गौरवर्णीय आहे, तो 'इंग्लिशमन' आहे म्हणजेच तो श्रेष्ठतर असणार हे सर्वमान्य गृहीत असल्याची छाप उमटते. उदाहरणार्थ, उत्कृष्ट ते निकृष्ट, लोकहितदक्ष ते तद्दन स्वार्थी, सुजाण ते अहंकारी या दोन टोकांमध्ये इंग्रज सनदी नोकरांची जी विखुरणी आढळत असणार त्यासंबंधी

* अभ्यास-संशोधनाचा एक चांगला विषय पुढील होऊ शकेल. मुंबई, कलकत्ता व मद्रास ही कंपनीची तीन मुख्य ठाणी. मद्रासविषयी आपल्याला माहिती नाही; पण भारतभर राज्य प्रस्थापित व्हायच्या आधी कंपनीच्या कारभाराखाली मुंबई व कलकत्ता येथे एक स्वतंत्र व स्वायत्त सार्वजनिक जीवन आकारास आले होते. यामध्ये मातबर व सधन व्यावसायिक हिंदी मंडळींचा सहभाग साम्राज्याच्या वसाहतीतले दुय्यम प्रजाजन या नात्याने नव्हता; बरीचशी समानता असे. या काळातल्या जाणकार कर्तबगार हिंदी व्यक्तींचा प्रतिसाद आणि भारत एक वसाहत झाल्यानंतरच्या नवशिक्षित मंडळींचा प्रतिसाद यात अंतर सापडते का, व असल्यास ते कोणत्या स्वरूपाचे आढळते?


अनुक्रमणिका

विश्लेषण फारसे आढळत नाही. किंबहुना, इंग्रजी राजवटीचेच वेगवेगळ्या कालखंडांमधल्या स्थितिगतीचे सखोल विश्लेषण आढळत नाही. शेतकऱ्यांची करुण, दरिद्री अवस्था चित्रित करताना भ्रष्ट, ऐदी, चैनी इंग्रज अंमलदारांचे भेदक चित्रण महात्मा फुले यांच्या लेखनात जरूर येते. पण व्यापक चौकटीत कालखंडवार विश्लेषण येत नाही. 'इंग्रजी राज्य हे ईश्वरी वरदान' याच आशयाचे सर्वसाधारण मूल्यन राहते.

इंग्रजी राज्याविषयी अप्रीती उत्पन्न करण्याचे उद्दिष्ट बाळगणाऱ्यांच्या ठायीही या नवीन इंग्रजी शिक्षणाचीच प्रतिष्ठा होती. या शिक्षणालाच प्रामाण्य व अधिमान्यता होती. 'निबंधमाला'कार विष्णुशास्त्री, लोकमान्य टिळक व सुधारकाग्रणी आगरकर – तिघेही राजकीय भूमिकेच्या संदर्भात 'जहाल' – यांनी 'न्यू इंग्लिश स्कूल' काढले. नावातले तिन्ही शब्ददेखील इंग्रजी! या शाळेतून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांपैकी अपवादभूत विद्यार्थीच देशभक्त निघाले; डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे अध्वर्यू व शाळा-कॉलेजचे चालक थोड्याच वर्षांमध्ये राजनिष्ठा प्रकट करते झाले, हा इतिहास ध्यानात ठेवण्यासारखा आहे. हे सगळेच नवशिक्षित होते.

याचा अर्थ असा की, या शिक्षणाने – विरळा अपवाद वगळता – साम्राज्यसत्तेला हवे असलेले 'वासाहतिक' मानस उत्पन्न होत राहिले. त्याचवेळी, या शिक्षणाने युटिलिटेरियन-लिबरल मूल्ये व ध्येये रुजविली, राष्ट्रवादाचे तत्त्वज्ञान बिंबविले, वाङ्मयविषयक नवी जाण व अभिरुची उत्पन्न केली, मानवजातीच्या इतिहासाविषयी 'प्रबोधनयुगा'ने उत्पन्न केलेली समज उत्पन्न केली, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र व समाजशास्त्र या आधुनिक सामाजिक शास्त्रांचे प्रामाण्य प्रस्थापित केले, इत्यादी. याचे एकाहून अधिक परिणाम झाले. स्वातंत्र्याचा लढाही पुढे या परिणामांमधूनच उत्पन्न झाला. पण तुरळक अपवाद वगळता, इंग्रजी राजवट जावी हे उद्दिष्ट मनात बाळगणाऱ्यांच्याही मनावर पाश्चात्त्य सभ्यता आदर्श व श्रेष्ठतम, इंग्लिश ही सर्वात प्रगत, उदार, नमुनेदार संस्कृती हा संस्कार या शिक्षणाने झाला. नव्या शिक्षणाने रुजवलेली 'आधुनिकता' ही, खोलवर अर्थाने, आमची मानसिकता अधिक दृढपणे वासाहतिक बनविणारी ठरली असे म्हणता येते. या आधुनिकतेच्या ग्रहणाने आम्हाला स्वावलंबी, स्वायत्त व समर्थ बनविलेले नाही याचा अनुभव स्वातंत्र्योत्तर अर्धशतकाच्या काळात वाढत्या प्रमाणावर येत आहे.

कोहन यांनी त्यांच्या ग्रंथाच्या 'प्रास्ताविका'त, तसेच त्यांच्या ग्रंथाला लिहिलेल्या 'फोरवर्ड' मध्ये निकोलस डर्क्स यांनी म्हटले आहे ते गंभीरतापूर्वक ध्यानात घेण्यासारखे आहे. कोहन लिहितात, "With the growth of public education and its rituals, it fostered official belief in how things are and how they ought to be." (पृ. ३) इंग्लंडमधल्या विद्यापीठांनी व 'पब्लिक स्कूल्स'नी साम्राज्याचा कारभार चालविणाऱ्या नव्या राज्यकर्त्या वर्गाचे शिक्षण केले व मानस घडवले, याचा निर्देश करून कोहन लिहितात, "These models were exported to India and the other colonies to produce loyal governing elites". (पृ. ४) कारकुनांची निर्मिती नव्हे, तर राज्यकर्त्या नव्या अभिजनवर्गाची निर्मिती. हिंदुस्थानचा समाज समजून घेण्यासाठी ज्या कोटी, वर्गीकरणाचे आराखडे वापरले गेले त्याला उद्देशून डर्क्स यांनी 'the distorting influence of colonial history and western social scientific categories' आणि 'epistemological violence of British rule'अशी भाषा वापरली आहे.

याचे उदाहरण म्हणून 'जात' ही संस्था आणि 'गाव' ही रचना यांचा विचार करू. धर्मापेक्षाही जात ही आपल्या येथील अधिक पायाभूत अशी संस्था आहे. रोटीबेटी व्यवहारांवरील निर्बंध हे जातिधिष्ठित व्यवस्थेचे एक व्यवच्छेदक वैशिष्ट्य आहे. चातुर्वर्ण्य आणि अस्पृश्यता (स्पर्शास्पर्शविचार) यांनी या व्यवस्थेची गुंतागुंत वाढलेली आहे. एकेका जातीला एकेक व्यवसाय बांधून दिला आहे अशी छाप उमटते; इतकी की, व्यवसायभेदापोटी जातींची उत्पत्ती झाली वा केली गेली असे वाटावे. जात या संस्थेच्या संदर्भात अनेक प्रश्नांची समाधानकारक उत्तरे आजही मिळालेली नाहीत. पण ब्रिटिशांनी जनगणना आरंभिल्यावर जनगणनेसोबत येथील समाजाचे सर्वांगीण चित्र पक्के करून घेण्याचाही त्यांनी प्रकल्प हाती घेतला. व्यक्तीचा धर्म कोणता, जात कोणती, व्यवसाय कोणता, ती स्पृश्य की अस्पृश्य, ती ज्या जातीची तिंचे जातींच्या 'उतरंडी'त स्थान कोणते, अशी माहिती नोंदवून त्यावरून वर्गवारी करण्याचे, व समाजशास्त्रीय निष्कर्ष

काढण्याचे काम ब्रिटिशांनी केले.* या प्रश्नांच्या उत्तरांची स्थानिकता (लोकॅलिटी स्पेसिफिक) विशेष ठसणारी अशी गोष्ट आहे. भारतभर एकछाप परिस्थिती आढळत नसल्याचेच अधोरेखित होते.

'तुमची जात कोणती?' या प्रश्नाचे उत्तर निःसंदिग्धपणे जिला देता येत नाही अशी व्यक्ती मात्र मिळत नसे. ज्या भागात ती व्यक्ती राहात असे तिथे तिचे इतर जातीयांशी संबंध कसे आहेत, रोटीबेटीव्यवहार व स्पर्शास्पर्श व्यवहार या संदर्भात कोणते निर्बंध आहेत याविषयी ती सांगू शके. स्वतःच्या व्यवसायाविषयी सांगू शके. आपल्या जातीचे स्थान कोणते त्याविषयी तिचे मत, तिची समज ती तिच्या अनुभवाच्या आधारे प्रकट करू शके. पण बहुतेक सर्व प्रश्नांची अशी उत्तरे सर्व व्यक्तींची तीच एक येतील याची खात्री नसे. थोडक्यात, येथील समाज जातपातीवर, स्पर्शास्पर्शावर आधारलेला आहे हे नक्कीच कळे; वेगळेपणा व विषमता इष्ट, आवश्यक व श्रेयस्कर आहेत, ती ईश्वरी योजना आहे ही धारणा खोलवर रुजलेली आढळत असे; जातीचे स्वतःच्या जातीतील व्यक्तींवर कठोर नियंत्रण असे. पण जातीजातींमधील संबंध व उतरंडीतील स्थान, अधिकार-कर्तव्ये, परस्परांची वागणूक यावरून पुष्कळ वाद उपस्थित असल्याचे चित्र समोर येई. या सगळ्यामधून जातिव्यवस्था ही रचना/व्यवस्था कमालीची लवचिक, अनिश्चित, विवाद्य व गतिमान आहे, दर काही अंतरावर तिचे चित्र बदलते, हेही स्पष्ट होई. असे असतानाही, हे तिचे विशेष नाकारीत, ती अपरिवर्तनीय, साचेबंद, घट्ट अशी उतरंडीची रचना आहे ही समजूत निर्माण व्हावी असे गोळा झालेल्या माहितीचे प्रमाणीकरण समाजशास्त्रीय विश्लेषणाच्या नावे होत राहिले. थोडे बारकाईने पाहिले तर, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अस्पृश्य या अमूर्त वर्गीकरणात्मक कोटी आहेत, आणि कोणा कुटुंबाचा, समूहाचा समावेश यापैकी कोणत्या कोटीत केला जातो हे त्या त्या वेळच्या परिस्थितीवरून ठरते, हेही दिसू शकत होते. यासाठी फार प्राचीन काळापर्यंत मागे जाण्याचीही गरज नव्हती. ब्रिटिश राजवटीच्या प्रस्थापनेनंतर आपली जात ही अमुक कोटीत गणली जात आहे हा अन्याय आहे, खरी तिची कोटी ही आहे, असा दावा अनेक जाती करू लागल्या, व त्यांच्या त्यांच्या दाव्यांच्या पुष्ट्यर्थ जातींचे इतिहासही लिहून प्रसिद्ध करू लागल्या, हा तर अनुभवाचा भाग होता. हिंदुस्थानी समाज प्राचीन खरा; पण तो परिवर्तनाशिवाय जसाच्या तसा काही हजार वर्षे राहिलेला जुनाट, मागास वा कालबाह्य समाज आहे हे जात व वर्ण यांच्या आधारे 'सिद्ध' करण्यामधून स्वतःच्या सुधारकी, प्रगत साम्राज्यसत्तेचे समर्थन इंग्रज राज्यकर्ते स्वतःला, येथील नवशिक्षितांना व जगाला देत होते, आणि त्या आधारे येथील नवशिक्षितांच्या ठायी अनुकूल मानस घडवीत होते, असे एक तात्पर्य हाती येते. ही ज्ञानव्यवहाराच्या क्षेत्रातली हिंसा व दडपेगिरी होती. पण त्यांनी प्रमाण व अधिकृत म्हणून प्रसृत केलेले मत सत्य म्हणून आजही येथील बहुसंख्य नवशिक्षित व परिवर्तनवादी आग्रहाने प्रतिपादतात, ही गोष्ट आपण अनुभवतो.

'भारतातील प्रत्येक खेडे हे एक स्वयंपूर्ण प्रजासत्ताक जणू आहे' हे मिथ्यही नव्या राज्यकर्त्यांच्या लेखनामधून ठसवले गेलेले. येथेही, पुन्हा, खेडी ही एका अपरिवर्तनीय व्यवस्थेत प्राचीन काळापासून नांदत आलेली आहेत; राजे येतात, जातात, खेड्यांना त्याचे काही सोयरसुतक नसते; राज्यसत्तेला द्यावयाचा करभार देण्यापुरता त्यांचा विशाल जगाशी संबंध असतो, ही प्रतिमा. अर्थातच, खेडी जुनाट, प्रतिगामी मानसाची, सुधारणांचे वारे न लागलेली, मागास व अडाणी राहिलेली, हे सिद्धांतन. आता, येथे स्थिर अशा लहानमोठ्या राजवटी होत्या; राज्याकडून सारा, जकात हे उत्पन्न गोळा होत असे; येथे वतनदार, देशमुख, देशपांडे, देसाई या वरच्या पातळीवरील संस्था होत्या; वस्त्रोद्योग हा एक मोठा सर्वत्र विखुरलेला उद्योग होता; इतरही औद्योगिक उत्पादने करणाऱ्या पेठा होत्या; खेड्यापाड्यातील शेतकरी कुटुंबांतील व्यक्ती मुलुखगिरीच्या मोहिमांवर जात; – या साऱ्या परिचित गोष्टी असूनही वरील मिथ्य येथे कसे काय प्रतिष्ठित झाले, हे एक आश्चर्यच आहे. येथील खेडी एका व्यामिश्र व प्रगल्भ अशा मोठ्या नागर सभ्यतेची ('अर्बन सिव्हिलायझेशन') सहभागी घटक होती. बाहेरच्या जगातले राजकारण व अर्थकारण त्यांना अपरिचित नव्हते. पण गावाच्या अंतर्गत कारभार हा स्वायत्त व स्वावलंबी असे, आणि प्रमुख जाती, व्यवसाय व कुटुंबे यांचा त्यात सहभाग असे. म्हणजे,

* साम्राज्यांचा उदय, उत्कर्ष व विस्तार आणि समाजशास्त्र, मानववंश व संस्कृतिशास्त्र यांचा उदय व उत्कर्ष यांचा घनिष्ठ संबंध आढळतो, हे जाणून घेणे उपयोगाचे आहे.

अनुक्रमणिका

येथेही ज्ञानव्यवहाराच्या क्षेत्रात 'हिंसा' केली गेली. गावाचे 'कौतुक' अशासाठी की, वरच्या पातळीवर स्थिर राज्य, सुव्यवस्था या गोष्टी इथल्या लोकांना माहीतच नव्हत्या, आणि त्यांचा संस्कार व त्यासाठीचे शिक्षण आमच्यामुळे होत आहे, हा संदेश पोचवावयाचा होता.

नव्या इंग्रजी शिक्षणाने तीन गोष्टी साधल्या. पहिली ही की, नवशिक्षित वर्ग येथील समाजाचा भाग राहूनही मनाने या समाजात परका (एलिनेटेड) झाला; या समाजाची व त्याची नाळ शिक्षणाने तोडली. सामान्यजन आणि हा नवा अभिजनवर्ग यांच्यात दरी पडली. दुसरी गोष्ट, (अपवादभूत काही गोष्टी वगळता) एतद्देशीय समाजव्यवस्था, संस्कृती यांचे मूळ उच्च व विशुद्ध रूप लोप पावले असून त्यांचे भ्रष्ट, अवनत, दळभद्री रूप म्हणजे आपली वर्तमान समाजव्यवस्था व संस्कृती होय; ती बव्हंशी टाकाऊ आहे, हा निवाडा त्याने मनोमन स्वीकारला. तिसरी गोष्ट, वहुतेक नवशिक्षितांच्या आयुष्यात व व्यक्तिमत्वात एक दुभंगलेपण उत्पन्न झाले. नात्यागोत्याची माणसे, कुटुंबातील वडीलधाऱ्या पिढ्या, बायका, भोवतालचा समाज यांच्यामध्ये राहून जगावयाचे तर, बौद्धिकदृष्ट्या आपण जे नाकारतो आहोत तेच व्यवहारात स्वीकारतो आहोत, या दुभंगलेल्या वास्तवाला सामोरे जाणे प्राप्त होते. यामधून एक विशेष प्रकारचे दुबळेपण उत्पन्न झाले. वाङ्मय, सामाजिक शास्त्रे, इतिहास, तत्त्वज्ञान यांच्या बौद्धिक अभ्यासाचा व आस्वादाचा केंद्रबिंदू आपल्या स्वतःच्या समाजाबाहेरच राहिला. यामधून जी जीवनदृष्टी, जे शास्त्रीय ज्ञान, जो तत्त्वविचार आम्हाला प्राप्त झाला त्यासह आम्ही आमच्या समाजस्थितीला भिडलो असे झाले नाही. पढिकपुस्तकीपण हे आपल्या नवशिक्षितवर्गाचे वैशिष्ट्य राहिले. हा नवशिक्षित वर्ग ब्रिटिश राजवटीचे उपांग म्हणून, त्या राजवटीच्या सहकार्यावर व पुष्टीवर विसंबून राहिला. महात्मा फुले यांनी त्यांच्या पद्धतीने व त्यांच्या भाषेत या मर्मावर नेमके बोट ठेवले. नवशिक्षितांची पोच जवळपास सर्वस्वी त्यांच्या वर्गापुरतीच राहिली. महर्षी विठ्ठल रामजी शिंदे यांना या मंडळींची ही मर्यादा अनुभवाला आली.

उपरोधाची गोष्ट अशी की, या इंग्रजी शिक्षणाला विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'वाघिणीचे दूध' म्हटले. या दुधावर पोषण झालेल्यांनी 'भारतीय प्रबोधन' घडवून आणले. आणि या नवशिक्षित मध्यमवर्गानेच भारतीय स्वातंत्र्यलढ्याचे आणि इतरही राजकीय-सामाजिक चळवळींचे पुढारीपण केले. आधुनिक काळातील ललित वाङ्मय, वैचारिक वाङ्मय याच वर्गाने निर्माण केले.

### ८. इंग्रजी राजवटीविषयी आणखी थोडेसे

येथील इंग्रजी वसाहतवादी राजवटीचा विचारही तिचे टप्पे पाडून करावा लागतो. १७५७ पर्यंतचा एक ठळक टप्पा. १७५७ पूर्वी ईस्ट इंडिया कंपनी ही राजकीय उद्दिष्टांचे अंग असलेली पण मुख्यतः व्यापारी कंपनी होती. १७५७ ते १८१८ हा दुसरा टप्पा. या काळात तिचे रूपांतर एका हिंदी राज्यसत्तेमध्ये होत गेले. हे रूपांतर होत असताना तिला इंग्लंडमधील वरिष्ठ (कंपनीचे संचालक), इंग्लिश राज्यकर्ते (पार्लमेंट व तेथील राजकीय पक्ष) यांचा आधी विरोध सहन करावा लागला, आणि पुढे नियंत्रण व हस्तक्षेप. या काळात येथील कंपनीचे मुख्य अधिकारी पुष्कळ स्वायत्त होते, व त्यांनी त्या परिस्थितीचा फायदा उठवला. १८१८ नंतर येथील कंपनीचे राज्य उत्कर्ष पावणाऱ्या ब्रिटिश साम्राज्याचे एक महत्त्वाचे केंद्र व आधार म्हणून मान्यता पावले. या संक्रमणकाळाच्या पूर्वार्धात येथील देशी व्यवस्थेची जाण व तिच्याविषयी आदर असणारे वरिष्ठ राज्यकर्ते – एल्फिन्स्टन, मन्रो, माल्कम इ. – आढळतात. भारताचे स्थित्यंतर 'वसाहती'मध्ये या काळाच्या उत्तरार्धात वेगाने व पद्धतशीरपणे केले गेले. १८५७ नंतर तर सरळच ती एक 'वसाहत' बनली. या काळात कॅनडा, ऑस्ट्रेलिया, द. आफ्रिका या अन्य 'वसाहती' आणि भारत यांच्यातल्या भेदाविषयी स्पष्टता केली गेली. एक दिवस यांच्याप्रमाणेच स्वायत्त 'डोमिनियन स्टेटस'चा दर्जा भारताला देण्याचे आश्वासन होते, पण त्याचे वेळापत्रक वेगळेच राहील ही गोष्टही अधोरेखित केली गेली.

१८५७ नंतर येथे साम्राज्यसत्तेने, एक धोरण म्हणून, साडेपाचशेहून अधिक संस्थाने राखली. ब्रिटिश भारतातील आपले राज्य उखडण्याच्या प्रयत्नांच्या विरोधात कामी यावीत या उद्देशाने. संस्थानिकांच्या हाती खरी सत्ता कोणतीच न ठेवता त्यांना सरंजामशाही व्यवस्था व वातावरण कायम राखण्याची मोकळीक ठेवून. याच उद्देशाने मोठा जमीनदार वर्गही तिने कायम राखला. 'डिव्हाइड अँड रूल' या नीतीचाच हा भाग होता. हिंदू व मुस्लिम समाजांमध्ये अंतर, तणाव व कलह आहे हे ओळखून, पक्षपाती धोरण अंगिकारून या

दोन समाजांमध्ये **ऐक्य निर्माण न होण्याची** खबरदारी साम्राज्य-सत्तेने घेतली हेही आपण जाणतो.

अठराव्या शतकाच्या अंखेरपासूनच्या काळात झालेल्या गव्हर्नर जनरल (व पुढे व्हाइसरॉय) यांच्या नेमणुका, त्यांच्या कारकीर्दी, त्यांची धोरणे यांचाही तपशीलात सखोल अभ्यास झाला आहे. अनेक ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. इंग्लिश राजकारणातले 'टोरी' व 'लिबरल' हे पक्ष आणि येथील व्हाइसरॉयची नेमणूक, त्याने घेतलेले पवित्रे व अंगिकारलेली धोरणे यांचा परस्परसंबंध स्पष्ट दिसतो. उदार ('लिबरल') व अनुदार ('इल्लिबरल') या दोन टोकांमध्ये येथील राजवट हेलकावे खात राहिलेली दिसते. देशभर जागोजागी पक्केपणी रुतलेली जी सनदी नोकरशाही होती तिचे चारित्र्य मुख्यतः एकतंत्री, अनुदार, व स्वातंत्र्य, लोकप्रातिनिधिक राज्यकारभार, समता यांना विरोधी असे सर्वकाळ होते. घटनात्मक सुधारणा-विषयक वाटाघाटींच्या प्रत्येक वेळी या नोकरशाहीने येथे व इंग्लंडमध्ये (भारतमंत्र्याला सल्ला देणाऱ्या 'इंडिया कौन्सिल'च्या यंत्रणेद्वारा) सुधारणांना अटकाव करण्यासाठी, त्या दुबळ्या व पक्षपाती ठेवण्यासाठी वजन खर्ची घातले. थोडक्यात, नवविचारांच्या प्रभावाखाली प्रबुद्ध व जागृत होऊन संघटित चळवळी करणाऱ्या नवशिक्षित, सुधारकी मध्यमवर्गाला दडपण्याची भूमिका घेऊन, आपण या बाबू वर्गाच्या विरोधात येथील जनसामान्यांचा पक्ष घेत आहोत, अशी भूमिका घेतली.

तात्पर्य, नेटिवांचे प्रबोधन घडवून आणून त्यांना प्रगत आधुनिक राज्यकारभार करण्यासाठी सक्षम बनविण्याचे आमचे जागतिक मिशन आहे असा एकीकडे दावा करीत असतानाच, ब्रिटिश साम्राज्यसत्तेचा व्यवहार, मुख्यतः, राजकीय, सामाजिक व आर्थिकदृष्टया हिंदी लोकांना प्रबुद्ध व संघटित करून 'वसाहतीचे स्वराज्य' साकार करू पाहणाऱ्या चळवळींना मोडता घालण्याचा, त्या दडपण्याचा राहिला. व्यापक सखोल परिवर्तनाच्या प्रयत्नांना खीळ घालण्याचीच कृती मुख्यत्वेकरून राहिली.

साम्राज्यसत्ता म्हणून असलेले आर्थिक-औद्योगिक तसेच राजकीय हितसंबंध यांचे रक्षण व संवर्धन याबाबतीत उदार व अनुदार, दोन्ही वृत्तींचे इंग्रज राज्यकर्ते एकाच माळेचे मणी होते. (काही विरळा अपवाद आढळतीलही.) भारताच्या नैसर्गिक व मानवी 'संसाधनां'चा साम्राज्यसत्तेचे हितसंबंध साध्य करण्यासाठी 'कच्चा माल' म्हणून वापर करण्याचीच भूमिका राहिली. येथे जे औद्योगिकरण घडून आले तेही, पुष्कळ वेळा, इंग्लिश भांडवलदार, कारखानदार यांचे आर्थिक-औद्योगिक हितसंबंध साधण्यासाठी ते उपकारक वा अनिवार्य होते म्हणूनच. जेव्हा व जेथे ते ब्रिटिश हितसंबंधांना मारक ठरेल असे वाटले तेव्हा ते रोखले गेले.

ब्रिटिश साम्राज्यसत्तेचे हे चारित्र्य विस्मृतीत लोप पावणार नाही याची दक्षता बाळगली पाहिजे.

### ९. धर्मचिकित्सा व धर्मप्रसार

ज्या एका घडामोडीला आपण आतापावेतो स्पर्श केला नाही त्याची येथे दखल घेतली पाहिजे. ती म्हणजे मिशनऱ्यांनी केलेले धर्मप्रसाराचे कार्य. ख्रिश्चन धर्मप्रसार फार पूर्वीच्या काळीही भारतात झाला. मध्ययुगातही ते कार्य अनेकांनी केले. इंग्रजी राज्याच्या प्रस्थापनेच्या आसपास सुरू झालेल्या ख्रिश्चन, प्राधान्येकरून प्रॉटेस्टंटपंथीय ख्रिश्चन मिशनऱ्यांनी केलेल्या धर्मप्रसार, शिक्षण व सेवाकार्य यांविषयी आपण येथे विचार करीत आहोत. दैनंदिन जीवनात हिंदुधर्माला जे रूप प्राप्त झाले होते त्याकडे प्रॉटेस्टंट ख्रिश्चन कोनामधून पाहिल्यास हा धर्म कसा दिसतो त्याचे, बहुतेक वेळा, आक्रमक खंडनाच्या, निर्भर्त्सनेच्या रूपात चित्रण लोकांसमोर आले. प्रा. सरदार यांनी उपरोक्त लेखात म्हटल्याप्रमाणे, समाजातील उच्चवर्णीयांपैकी फार थोड्यांनी धर्मांतर केले. समाजाने हीन मानलेल्या, वेगवेगळ्या कारणांनी दीन अवस्थेत जगणाऱ्या, अस्पृश्य गणल्या गेलेल्या समाजघटकांचा प्रतिसाद त्यांना मिळाला. यांच्या धर्मांतराने बाकीचा समाज फार दुःखितही झाला नाही वा हादरला नाही. मात्र मिशनऱ्यांच्या प्रखर टीकेने व त्यांच्या समाजोद्धारक कामांमुळे धर्मचिकित्सेची व धर्मसुधारणेची प्रेरणा अनेकानेक नवशिक्षितांना मिळाली. आपले धर्म त्यांच्या मूळ स्वरूपात विशुद्ध, श्रेष्ठ, उन्नत होते ही खात्री बाळगून मूळ रूप शोधण्याची, व जरूर तेथे नव्याने 'मूळ रूप' निर्माण करण्याची प्रेरणा उत्पन्न झाली. वेद, उपनिषदे यांचे प्राचीनत्व, त्यांमधील उदात्त तत्त्वचिंतन, प्रतिभेचा स्पर्श असलेले काव्य यांचे कौतुक युरोपियन पंडितांनी केल्यामुळे, ख्रिश्चन धर्म न स्वीकारता, हिंदू धर्माला प्रॉटेस्टंट नमुन्या-बरहुकूम रूप देणे हा मार्ग खुला झाला. संतकाव्याचे वळण बहुजनसमाजात होतेच. वारकरी चळवळीमुळे महाराष्ट्रात ब्राह्मण कुटुंबांमध्येही संतांचा प्रभाव होता. धर्मचिकित्सेचीही

प्रदीर्घ परंपरा या देशात होती. महावीर-गौतम बुद्धांच्या काळापासून. पण इंग्रजी राजाच्या प्रस्थापनेनंतर, ख्रिस्ती मिशनरी प्रभावाने जी चिकित्सा सुरू झाली आणि पारंपरिक धार्मिकताच क्षीण होण्याच्या स्वरूपात जी 'सामाजिक-धार्मिक सुधारणा' झाली ती या देशी परंपरेशी एकजीव होऊ शकली नाही. आर्यसमाज, ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज हा अभिजन-वर्गीय प्रतिसाद राहिला. हीच गोष्ट महात्मा फुले यांच्या सार्वजनिक सत्यधर्माची राहिली. ती एक वैचारिक मांडणीच राहिली. ख्रिश्चन मिशनऱ्यांच्या प्रभावामधून उत्पन्न झालेल्या या चळवळी पारंपरिक समाजाचा अधिक्षेप करणाऱ्या, त्यांचे अनेक धार्मिक आचार-विचार, भावना, परंपरा यांच्याविषयी सम्यक् समज न बाळगणाऱ्या होत्या, हे याचे कारण तर नव्हते?

या धर्मचिकित्सेमधून धार्मिक सुधारणेची तसेच सामाजिक सुधारणेची चळवळ उत्पन्न झाली. राजकीय हक्कांसाठी लायक वनावयाचे असले तर आधी तुम्ही सामाजिकदृष्ट्या सुधारलेले वनले पाहिजे हे म्हणणेही नवशिक्षितांच्या अग्रणींना बरोबरच वाटले. लोकमान्य टिळकांनी न्यायमूर्ती तेलंगांच्या म्हणण्याचा विपर्यास करून वाद घातला; 'आधी सामाजिक सुधारणा व नंतर राजकीय सुधारणा' ही भूमिका त्यांनी अमान्य केली. पण ते सामाजिक सुधारणांचा पक्ष उचलून धरणारेच होते. इंग्रज राज्यकर्त्यांनी प्रसृत केलेल्या शिक्षणापासून, इंग्लिश राज्यकर्त्या वर्गाचे येथले व इंग्लंडमधील प्रगत आधुनिक जीवन पाहून, तसेच इंग्लिश कथा-कादंबऱ्यांच्या वाचनामधून नवशिक्षित वर्गांनी सामाजिक सुधारणांची प्रेरणा घेतली. पण हा सुधारणेचा कार्यक्रम फार मर्यादित होता, आणि सुधारणांच्या कक्षेत येणारा समाजातील वर्गही 'शिक्षित मध्यमवर्ग' हाच प्रामुख्याने होता. जातपात व स्पृश्यास्पृश्यता मोडणे हा जो मुख्य कार्यक्रम तो नेटाने राबविला गेलाच नाही. साऱ्या समाजाला सुधारण्याची गोष्ट ही मंडळी करू इच्छितही किती होती, हा प्रश्नच आहे. त्यांच्या पलीकडच्या वहुजनसमाजामध्ये व त्यांच्यामध्ये नव्या शिक्षणामुळे अंतर पडले होते. त्यामुळे, तशी इच्छा होती असे गृहीत धरले तरी, ती त्यांची क्षमता उरली नव्हती. हा वर्ग इंग्रजी राज्याचे उपांग म्हणूनच कार्य करीत होता. तो परकीय शास्त्या वर्गाचा दुय्यम सहायक होता, आणि या अर्थाने शासितांपासून अंतर राखण्यावद्दल जागरूकपण होता. उच्चवर्णीय पार्श्वभूमीही अंतरामध्ये भरच घालणारी होती.

### १०. राष्ट्रवादाचा अंगीकार

इंग्रजी राज्याच्या प्रस्थापनेने आम्हांला आधुनिक राष्ट्र-राज्यांच्या विश्वात प्रविष्ट केले. आपण एक वसाहत असलो तरी संपूर्ण हिंदुस्थान एका केंद्रीय राज्यसत्तेखाली आला. ही साम्राज्यसत्ता तिच्या मूळ भूमीत राष्ट्रवादाच्या बैठकीवर उभारलेली होती. आसेतुहिमाचल आमची एक वेगळी, ओळखता येण्यासारखी समाजव्यवस्था व संस्कृती होती. तिच्या गाभ्याशी जातिव्यवस्था होती, आणि तिच्यावर आधारलेला शहरे-गावे यातला सामाजिक-सांस्कृतिक व्यवहार होता. धर्मांतर केलेले समुदायही या जातिव्यवस्थाधिष्ठित समाजाचे व संस्कृतीचे तेवढेच घटक होते. 'सिव्हिलायझेशन' या कसोटीवर आमचा एकत्र, सलग व एकात्म नागर समाज ('सिव्हिल सोसायटी') होता, पण आमची एक 'राष्ट्रीय' राज्यसत्ता नव्हती. इंग्रजी राज्यापासून आधुनिक राष्ट्रवाद ही विचारप्रणाली, सर्व हिंदुस्थानला व्यापणारी एकराष्ट्रीयत्वाची संकल्पना या गोष्टी आम्ही प्राप्त केल्या.

आपल्या नवशिक्षित वर्गाच्या अग्रणींनी राष्ट्रवादाची विचारप्रणाली उत्साहाने आपलीशी केली. राष्ट्रीय स्वयं-निर्णयाचा हक्क राष्ट्रवादाच्या विचारसरणीनुसारच प्राप्त होत असल्याने, त्यांनी राजकीय अधिकारांची, प्रतिनिधित्वाची मागणी पुढे रेटली. कारण राष्ट्रवादावरोवरच 'लोकनियुक्त प्रातिनिधिक राज्यसत्ते'ची लिबरल विचारप्रणालीही राज्य-कर्त्यांनी येथे आणली होती. तेव्हा, राष्ट्रवादाच्या स्वीकाराने सर्व हिंदुस्थानचे, हिंदुस्थानातील सर्व लोकांचे एक राष्ट्र घडविण्याचे विधायक आव्हान आमच्या नवशिक्षितांपुढे उभे ठाकले. पण ही विचारप्रणाली स्वभावतः विभाजन पण घडवून आणणारी, कलह उत्पन्न करणारी पण आहे. कारण ती भाषा, धर्म, वंश इत्यादी वास्तव वा मिथ्य स्वरूपाच्या मुद्यावरून प्रदेशावर काहींचा हक्क सांगणारी, इतरांना हक्क नाकारणारी विचारप्रणाली म्हणून युरोपात आकाराला आली. 'राष्ट्रा'तल्या सर्वांना तिने घट्टपणे एक केले, केंद्रीभूत सर्वंकष सत्तेच्या प्रस्थापनेला मोठी चालना दिली व त्या राज्यसत्तेची पुष्टी केली; ऊर्जास्फोट घडवून एकमेकांच्या स्पर्धेत व संघर्षात कर्तृत्व प्रकट करण्यास प्रेरणा दिली, हे खरे. पण आक्रमक विस्तारवादी, हिंस्र, सत्तापिपासू हे रूप तिला फार सहजी प्राप्त होऊ शकते. साम्राज्यवादी विस्तारही सत्तापिपासेमधून घडून येतो. दोन महायुद्धे ही या विचारप्रणालीची आधुनिक

अनुक्रमणिका

युगाला देणगी आहे. आणि भारताची फाळणी हेही तिचेच फलित आहे. भारताचे विघटन घडवून आणू पाहणाऱ्या शक्तींपैकी एका प्रकारच्या शक्ती (वेगळे होऊ पाहणाऱ्या) राष्ट्रवादामधून उत्पन्न झालेल्या आहेत.

ज्यांनी इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना केली, तिच्या एकराष्ट्रीयत्वाच्या भूमिकेची मांडणी केली त्यांनी मात्र भारतीय राष्ट्रवादाला सर्वसमावेशक, सहिष्णु व अनाक्रमक रूप दिले. विभिन्न वांशिक, भाषिक, धार्मिक व सांस्कृतिक लोकांचा मिळून, वैविध्याचा आदर व सन्मान करणारा एक समाज व राज्यसत्ता उभारण्याची गोष्ट आज जगभर केली जात आहे. भारताला हे बाळकडू प्राचीन काळापासून आत्मसात करावे लागले आहे. 'मल्टिकल्चरॅलिझम' आपण जगत आलो. त्याला वैशिष्ट्यपूर्ण राष्ट्रवादाचे रूप राष्ट्रसभेच्या संस्थापकांनी दिले.

'राष्ट्र' आणि 'राष्ट्रवाद' या आधुनिक पाश्चात्त्य गोष्टींमध्ये अंगभूत असलेल्या विध्वंसक प्रकृतीविरुद्ध कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर यांनी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीसच आवाज उठविला. हिंदू-मुस्लिम ऐक्याच्या आधारावर येथे अखंड एकात्म भारताची जडणघडण करण्याची गांधींनी शर्थ केली. येथील लिबरल मंडळींचीही याला पूर्ण साथ होती. दुर्दैवाने, या प्रयत्नात आपणांस ठळक अपयश आले. हे अपयश येण्यामध्ये इंग्रजी राज्याने आपला वाटा उचलला; सक्रिय योगदान केले. आजही (हिंदू-मुस्लिम व हिंदू-ईसाई) ऐक्य प्रस्थापित करणे हे सर्वात मोठे, तातडीचे व गंभीर आव्हान आपणासमोर उभे ठाकलेले आहे.

**११. ब्रिटिश अंमलाखालील परिवर्तन**

इंग्रजी राजवटीच्या आघाताने, त्यातही मुख्यत्वेकरून नव्या शिक्षणामुळे एकोणिसाव्या शतकामध्ये भारतात वैचारिक प्रबोधन घडून आले ही सर्वसाधारण शिष्टमान्य मांडणी आहे. पारंपरिक ते आधुनिक, सनातनी ते सुधारक, सरंजामशाही ते लोकशाही, अंधश्रद्धावादी ते बुद्धिप्रामाण्यवादी, विज्ञानपूर्व ते विज्ञाननिष्ठ, शेतकीप्रधान ते औद्योगिक समाज, निरक्षर ते साक्षर, खेडवळ ते शहरी – या स्वरूपाची आपली वाटचाल इंग्रजी राजवटीच्या संपर्कात आल्याने, तिच्या आघाताखाली व प्रभावामुळे घडून येण्यास चालना मिळाली, असे या प्रबोधनाचे व परिवर्तनाचे वर्णन केले जाते. हे परिवर्तन मूळापासून बदल घडवून आणणारे या अर्थाने क्रांतिकारक आहे, पण ते अपूर्ण राहिले आहे. या प्रवासाच्या आरंभी उत्साह, निर्धार, व त्या वाटचालीसाठी कठोर व चोख परिश्रम घेण्याची तयारी, यांचा आढळ होत होता. पण नंतर वाटचाल अडखळली, अवरुद्ध झाली. क्रांती अपूर्णच राहिली. भरीला भर म्हणून, ही वाटचाल श्रेयस्कर नाही असे मत अलीकडे बलिष्ठ ठरत गेले आहे, आधुनिक-पूर्व समाज-व्यवस्थेची, अवस्थेची भलावण केली जाऊन तिचे पुनरुज्जीवन करण्याचा पक्ष उचलून धरला जाऊ लागला आहे, असे प्रा. रा.भा. पाटणकर यांनी त्यांच्या *अपूर्ण क्रांती* या ग्रंथात प्रतिपादन केले आहे.

एकेकाळी साम्राज्यसत्तेची वसाहत हा आमचा दर्जा होता. वसाहतीतल्या लोकांचा सर्वांगीण नकारात्मक निवाडा करण्याच्या बुद्धीनेच त्या समाजाचा अभ्यास करावयाचा, ज्ञान रचावयाचे आणि अशा ज्ञानाचा कुशलतापूर्वक उपयोग करून वसाहतीतल्या लोकांना, समाजव्यवस्थेला व संस्कृतीला अडाणी, मागास, निकृष्ट ठरवावयाचे; इतिहासलेखन, धर्म व समाज-जीवन यांची समीक्षा, वाङ्मयीन कृती याद्वारा ह्याला आधारभूत ठरेल असे चित्रण करावयाचे, असा एक सर्वंकष डावच साम्राज्यसत्तांमधील धुरीणांचा, विद्वानांचा, साहित्यिकांचा, इतिहासकारांचा असतो अशी मांडणी अलीकडे विद्वत्‌जगात मान्यता व प्रतिष्ठा पावली आहे. साम्राज्यसत्तेच्या अंमलापूर्वी जे काही होते त्याचा स्मृतिलोप घडवून आणला जातो (वा घडून येतो), अशीही उपपत्ती मांडली गेली आहे. ती काही वर्तुळांमध्ये लोकप्रियही झाली आहे. यामधून मग जे जे देशी ते श्रेयस्कर, चांगले व पुनरुज्जीवित करण्यासारखे, अशा प्रकारची भूमिका घेतली जाते. विचारविमर्शाला ('डिस्कोर्स') हे जे वळण लागत आहे, नव्हे दिले गेले आहे त्यामुळे प्रा. पाटणकर अतिशय अस्वस्थ झाले असे म्हटले तर वावगे ठरू नये. *अपूर्ण क्रांती* या ग्रंथाच्या लेखनामागे अलीकडील या भूमिकांचा ठोस प्रतिवाद करण्याची तीव्र प्रेरणा असल्याचे जाणवते.

एडवर्ड सैद, मिशेल फुको, (भारतातील) गणेश देवी यांचे नावाजलेले, अभ्यासकांवर मोठा प्रभाव टाकलेले ग्रंथ मी वाचलेले नाहीत. प्रा. भालचंद्र नेमाडे यांचे देशीवाद/देशीयता या विषयावरील काही लेखन वाचलेय; धर्मपाल यांचे बरेच लेखन वाचले आहे. 'इंग्रजी राज्याची प्रस्थापना व त्याचा आघात' यासंबंधी प्रस्तुत लेखात केलेली मांडणी

या कोणाचे लेखन वाचून केवळ बनलेली नाही. ती इतर अनेक अभ्यासकांचे ग्रंथ व लेख वाचून, त्यावर स्वतंत्र विचार केल्यावर बनली आहेत. यातले कोणीच 'देशीवादी' भूमिकेमधून लिहीत नव्हते.

'ओरिएंटॅलिझम' देखील एकच एक प्रकारचा होता असे दिसत नाही. 'पाश्चात्त्य' विरुद्ध 'पौर्वात्य' असे द्वैत कल्पिले गेले; पाश्चात्त्य = भौतिकवादी ('मटिरिॲलिस्ट') आणि म्हणून हिणकस, पौर्वात्य = आध्यात्मिक ('स्पिरिच्युअल') आणि म्हणून उन्नत, अशी मांडणी केली गेली. आधुनिककालीन रॅशनॅलिझम ('बुद्धिप्रामाण्यवाद'), औद्योगिक संस्कृती ('इंडस्ट्रिॲलिझम'), व्यक्तिवाद आणि साम्राज्यवाद यांच्या प्रकर्षाबरोबर जीवन रूक्ष, वैराण, कर्कश व हिंस्र बनल्याचा प्रत्यय अनेकानेक पाश्चिमात्य व्यक्तींना आलेला दिसतो. यावर उतारा म्हणून यांच्यापैकी अनेक जण 'पौर्वात्य' गोष्टींच्या खोलवर प्रभावाखाली आल्याचेही आढळते. यामधून पौर्वात्य व आधुनिकपूर्व – विशेषतः 'रानटी'/आदिम – माणसांचे आंतरिक व्यक्तित्व, त्यांची जीवनदृष्टी व वर्तन, त्यांची जीवनशैली व संस्कृती, धर्म व तत्त्वज्ञान यांच्याविषयी गूढगुंजनात्मक चित्रणही केले गेले. अनेक पाश्चात्त्य व्यक्ती 'हरपल्या श्रेया'च्या शोधात 'पूर्वे'कडे वळल्या. यांनी 'पौर्वात्य'चे जे चित्रण केले, जी प्रतिमा निर्माण केली, जो प्रभाव उत्पन्न केला तोही 'ओरिएंटॅलिझम'चा एक भाग होता. याने सुशिक्षित भारतीयांच्या काही पिढ्यांचे भावनात्मक व बौद्धिक पोषण केल्याचे आपल्या परिचयाचे आहे.

स्वामी विवेकानंदांच्या द्वारा वेदांताचा पश्चिमेमध्ये झालेला प्रभावी प्रचार, मादाम ब्लॅव्हट्स्की व ॲनी बेझंट यांनी प्रवर्तित केलेला 'थिऑसफी' संप्रदाय, एडविन अर्नोल्ड यांची *दि साँग सिलेस्शियल* (भगवद्‌गीतेचा इंग्लिश अनुवाद) व *दि लाइट ऑफ एशिया* (भगवान गौतम बुद्धांचे चरित्र) ही लोकप्रिय पुस्तके, आणि १९१३ साली रवींद्रनाथांना *गीतांजली*तील कवितांसाठी मिळालेला नोबेल पुरस्कार व त्यांचे झालेले कौतुक हा सारा 'ओरिएंटॅलिझम'चाच एक भाग होता.

प्रा. मार्टिन ग्रीन या वाङ्मयीन समीक्षकांचे म्हणणे या दृष्टीने विचारात घेण्यासारखे आहे. ते लिहितात, "It was perhaps from men like Arnold that Gandhi learned to believe in British imperialism as a reaching out to other lands (in both senses of reaching out) on the part of an inordinately energetic people, supremely gifted to organise, control and administrate, who turned, in the overflow of their energy, to ask other cultures to teach them the ultimate meanings of life. That, after all, is the message of *Kim* : the Lama, with all his unwordliness, has the secret of life, and the players of the Great Game, with all their worldly responsibilities, will always turn to him in the end. Published in 1901, *Kim* is one of the most vivid expressions of this kind of Orientalism"*

म्हणजे, एकं प्रकारचा 'ओरिएंटॅलिझम' स्मृतिलोप घडवून आणीत नाही; तो एक विशिष्ट आशयाची स्मृती जागवतो, रुजवतो. यात त्या पौर्वात्य संस्कृतीचे, समाजाचे कौतुक असते, महत्त्व प्रतिपादित केलेले असते. पण, त्याच वेळी, यामधूनही साम्राज्यसत्तेविषयी निष्ठा पक्की केली जाते आणि 'वासाहतिक मानसा'ला आणखी एक वळसा दिला जातो. ग्रीन यांनी गांधींचे उदाहरण दिले तेही मोठे उद्‌बोधक आहे. प्रा. पाटणकरांनी या जातकुळीच्या ओरिएंटॅलिझमची दखल घ्यायला हवी होती. भारताच्या संदर्भात ते जास्त प्रस्तुत व महत्त्वाचे ठरले असते.

'भारतीय प्रबोधन' ही एक बहुपेडी, गुंतागुंतीची घडामोड आहे हे अर्थात विसरता कामा नये. तिचे चार घटक आपण वेगळे करावयास हवेत. तत्कालीन युटिलिटेरियन-लिबरल विचार-प्रवाह, आधुनिक अर्थशास्त्र व त्यासोबत आलेला 'पोलिटिकल इकॉनॉमी'चा विचार; मानवजातीच्या ऐतिहासिक वाटचालीचे, तिच्यातील प्रगतीचे-आरोहणाचे टप्पे, 'प्रगती'ची संकल्पना; रॅशनॅलिझम ('बुद्धिप्रामाण्यवाद'), प्रातिनिधिक

* The Origins of Non-violence : Tolstoy and Gandhi in their Historical Setting, Harper - Collins, New Delhi, 1998, p. 68.

जबाबदार राज्यपद्धती (लोकशाही) या गोष्टी; ब्रिटिश साम्राज्याचे वास्तव व त्या साम्राज्याविषयीची प्रतिमा, आणि इंग्लंडचे वाढते औद्योगिक बळ, या गोष्टींनी मिळून बनलेला एक घटक. दुसरा, इंग्रजी राजवट व अनेक अभ्यासक (विशेषतः मॅक्सम्युलर) यांनी आणून दिलेले हिंदुस्थानच्या इतिहासाचे, त्याच्या प्राचीन संस्कृतीचे, समाजव्यवस्थेचे वैशिष्ट्यपूर्ण भान, त्याविषयी उत्पन्न केलेला अभिमान हा दुसरा घटक. ख्रिश्चन मिशनरी व इंग्रज प्रशासक यांनी चालविलेली, विशेषतः हिंदु धर्माची धर्मचिकित्सा आणि धर्मप्रसाराचे कार्य हा तिसरा घटक. चौथा महत्त्वाचा घटक इंग्रजी वाङ्मयाच्या प्रभावाचा आहे.

हे सारे प्रभाव येथील सर्व नवशिक्षित व्यक्तींनी एकाच पद्धतीने, एकाच स्वरूपात आत्मसात केले नाहीत, ही गोष्टपण ध्यानात येते. एकोणिसाव्या-विसाव्या शतकातील काही थोर व्यक्तींची व संस्थांची नामावली जरी आपण उच्चारली तरी प्रतिसाद किती वैविध्यपूर्ण व वैशिष्ट्यपूर्ण होता याचे भान आपणांस येईल. राजा राममोहन रॉय, देवेंद्रनाथ टागोर, ब्राह्मोसमाज, केशवचंद्र सेन, रवींद्रनाथ टागोर, रामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, योगी श्रीअरविंद, अनुशीलन व युगांतर हे सशस्त्र क्रांतिवादी गट; सनातन आर्यसभा, स्वामी दयानंद सरस्वती, आर्यसमाज, परमहंस सभा, दादाभाई नौरोजी, महात्मा जोतिबा फुले, लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, न्यायमूर्ती रानडे, प्रार्थना समाज, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, सुधारकाग्रणी आगरकर, पंडिता रमाबाई, नामदार गोखले, स्वातंत्र्यवीर सावरकर, लिबरल पक्ष; महात्मा गांधी, विठ्ठल रामजी शिंदे, नारायण वामन टिळक, जवाहरलाल नेहरू, मानवेंद्रनाथ रॉय, डॉ. बाबासाहेब आंबेडकर – इतकी नावे पुरेशी आहेत. सर सय्यद अहमद खान, अलिगढ मुस्लिम विद्यापीठ, बॅ. मोहंमदअली जीना ही तीन नावेपण त्यात समाविष्ट करता येतील.

'भारतीय प्रबोधना'चे विविध प्रवाह वेगळे करून पाहायला हवेत. तसा हा फार मोठा विषय आहे, आणि तो पुरेशा तपशीलात व खोलात जाऊनच हाताळण्याची गरज आहे.

येथे आपण एकच प्रश्न विचारासाठी घेऊ. प्रा. पाटणकर यांचीच परिभाषा वापरावयाची तर, सुरू झालेली क्रांती 'अपूर्ण' का राहिली? १९४७ नंतर भारताने आर्थिक-औद्योगिक व्यवस्था, राज्यव्यवस्था व सामाजिक रचना यांच्या बाबतीत, पं. नेहरूंच्या नेतृत्वाला अनुसरून, पाश्चात्त्य सभ्यतेचाच ('सिव्हिलायझेशन') नमुना अंगिकारला. आजवर शासन व प्रशासनाचे धुरीणत्व आधुनिक प्रागतिकांच्याच हाती राहिले आहे. शासनाबाहेरही समाजाची ('सिव्हिल सोसायटी'ची) सूत्रेही सुशिक्षित पांढरपेशांच्या हातीच आहेत. ग्रामीण भागातही नवा आधुनिक शेतकरी व उद्योजकवर्ग उत्कर्ष पावला आहे. ज्यांना देशीवादी म्हणता येईल त्यांच्या हाती कोठेच सत्ता नाही. (हिंदुत्ववादीही, मुस्लिम व ख्रिश्चन यांच्या विरोधी असले तरी, सावरकरवादी – म्हणजे आधुनिकतावादी – आहेत.) तरीपण आधुनिक मूल्ये, कार्यपद्धती, सामाजिक संस्था येथे धड रुजली नाहीत. असे विपरीत का व कसे घडले?

ज्यांना आपण भारतीय प्रबोधनाचे प्रवर्तक व वारसदार म्हणतो असा आधुनिक, प्रागतिक व प्रबुद्ध मंडळींचा जो वरचढ मुख्य प्रवाह आहे – लिबरल-युटिलिटेरियन, समाजवादी, साम्यवादी, इहवादी, पुरोगामी – तो जनसामान्य भारतीयांच्यापासून तुटलेला, उपरा आणि दुरावा राखण्याचीच इच्छा बाळगणारा राहिला आहे याचा तर हा एक परिणाम नाही? व्यक्तिस्वातंत्र्य, समता, न्याय इत्यादी मूल्यांवर आधारित संपूर्ण भारतीय समाजाचे पुनरुत्थान घडवून आणण्याचे या वर्गाचे लक्ष्य नव्हतेच; त्याचे लक्ष्य साम्राज्यसत्ता-वसाहत ही चौकट मोडणे हे नव्हतेच; त्याचे लक्ष्य साम्राज्यसत्तेच्या 'कोठावळ्या'ची जागा स्वतःकडे घेणे व जास्तीत जास्त विशेषाधिकार व सुखोपभोग पदरात पाडून घेणे हे होते, असे तर नाही?

यापेक्षाही खोलवर जाणारा मुद्दा पुढीलप्रमाणे मांडता येईल : वासाहतिक असण्याचा एक अंगभूत भाग हा असतो की, आपण स्वतःची ओळखही साम्राज्यसत्तेच्या चष्म्यामधून करून घेतो; नव्हे ती तशी करून देणे हा साम्राज्यसत्तेच्या धोरणाचा एक भाग असतो. नेल्सन मंडेलांच्या आत्मचरित्रात, शाळेत पाऊल टाकल्याक्षणी नाव पण नवे दिले जाण्यापासून, स्वतःची भाषा त्यागावी लागण्यापासून या प्रक्रियेची सुरुवात कशी झाली त्याची हकीकत येते. प्राचीन, मध्ययुगीन व आधुनिककालीन भारतीय समाजवास्तव, ज्ञानी असण्याचा दावा करणाऱ्या परकीय साम्राज्यसत्तावादी अभ्यासकांच्या चष्म्यामधून जर आपण जाणून घेतले असेल तर आपण खऱ्या

अर्थाने प्रबुद्ध होतच नाही. जे विचारधन (मूल्ये, शास्त्रे इ.) आपण आत्मसात करतो ते पढिक-पुस्तकीपणाच्या चौकटीतले, उसनवारीच्या/अनुकरणाच्या मर्यादेतले राहते. तसे जर असेल तर मग समाजवास्तवाला अर्थपूर्णरीत्या भिडण्याची शक्ती अशा प्रबोधनात मूळात असतच नाही. या तथाकथित प्रबोधनामधून स्वतःच्याच समाजावर साम्राज्यसत्ता गाजविणारा एक नवा, परकीय बनावटीचा सत्ताधारीवर्ग तेवढा अस्तित्वात येतो.

आता, ज्या प्रमाणात वरील म्हणणे खरे असेल त्या प्रमाणात, या तथाकथित आधुनिक, प्रबुद्ध वर्गाला आमूलाग्र समाजक्रांती घडवावयाची नसतेच. त्याला सत्ताधारी व्हावयाचे असते. त्याच प्रकारची व त्याच मर्यादेत त्याला क्रांती करावयाची असते. भारतात या अर्थाने क्रांती १९४७ च्या 'सत्तांतरा'ने घडून आली.

अलीकडच्या काही वर्षांमध्ये ग्लोबलायझेशन, मॉडर्नायझेशन, लिबरलायझेशन, विकास, समृद्धी या नावे ज्या प्रक्रियांना वेग आलेला आहे व ज्या घडामोडी घडून येत आहेत त्यांचाही आशय व आकार पाहिला तर, जागतिक साम्राज्यसत्तेचेच उपांग म्हणून काम करण्यात धन्यता मानणारा सत्ताधारीवर्ग येथे वसाहतवादी अंमल प्रस्थापित करीत असल्याचे आढळते. क्रांतीच्या 'अपूर्ण' राहिलेल्या प्रक्रियेला पूर्णत्व आणणारी ही प्रक्रिया आहे असे आपण म्हणणार आहोत का?

भारतीय प्रबोधनाचे काही प्रवाह पहिल्यापासून वेगळ्या वळणाचे राहिले आहेत. आपल्या येथील समाजवास्तव, इतिहास-परंपरा, संस्कृती यांच्याशी नाळ कायम ठेवून नवी मूल्ये, नवा विचार आत्मसात करून समाजाचे उत्थान घडवून आणण्याचे उद्दिष्ट बाळगणारा एक प्रवाह राहिला. (उदा. राजा राममोहन रॉय, ब्राह्मोसमाज, प्रार्थनासमाज, न्या. रानडे.) इतिहास-परंपरा, संस्कृती यांची बैठक कायम ठेवून, वेचक आधुनिक गोष्टींचा स्वीकार करून तोच परंपरानिष्ठ पाया मजबूत करण्याचे उद्दिष्ट बाळगणारा एक प्रवाह राहिला आहे (उदा. दयानंद सरस्वती, स्वामी विवेकानंद). रवींद्रनाथ टागोर, महात्मा गांधी ज्या प्रवाहाचे प्रतिनिधित्व करतात असे म्हणता येईल तो आणखी एक प्रवाह म्हणायला हवा. या प्रवाहाचे वैशिष्ट्य असे सांगता येईल की, काही महत्त्वपूर्ण अंगांच्या बाबतीत पाश्चात्त्य सभ्यतेला नकार देणारा हा प्रवाह आहे. तसेच काही बाबतीत हा प्रवाह देशी गोष्टींवर भर देतो. रवींद्रनाथांनी एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीसच पाश्चात्त्य राष्ट्रवादी विचारप्रणालीचे खंडन करणारी भूमिका घेतली. १९०५ च्या आसपास त्यांनी 'स्वदेशी समाज' हा मौलिक निबंध लिहिला. पुढील काळातील 'स्वावलंबी गावसमाज', 'ग्राम स्वराज्य' या गांधीप्रणीत संकल्पनांची बीजरूपाने मांडणी रवींद्रनाथांनी केलेली आढळते. शिक्षणाच्या विषयातही रवींद्रनाथांनी मूलतः वेगळा विचार मांडलेला आहे. ही वैशिष्ट्ये आपणांस गांधींचे विचार व त्यांनी दिलेले कार्यक्रम यांच्यातही आढळतात.

पण भारतीय प्रबोधनाच्या मांडणीमध्ये रवींद्रनाथांना सामान्यतः कोणी अग्रेसर स्थान देत नाही. आणि अनेकानेक आधुनिक, पुरोगामी-इहवादी, प्रबुद्ध व्यक्ती गांधींना व त्यांच्या वैचारिक भूमिकेला उद्देशून 'ऑब्सक्युरँटिस्ट', 'बॅकवर्ड लुकिंग', प्रगति व विकास विरोधी, विज्ञान-तंत्रविज्ञानविरोधी वगैरे शब्द वापरीत आले आहेत. आता, उपरोधाची गोष्ट अशी की, सामाजिक नवनिर्माणाच्या विषयातील जातिभेद व अस्पृश्यता यांचे उच्चाटन, स्त्रीमुक्ती, आणि धर्मश्रद्धेचे परिष्करण या तीन महत्त्वाच्या बाबींचा विचार केला तर, गांधींचे लढे व गांधींचे नेतृत्व यांच्या प्रभावाखाली व्यापक प्रमाणावर प्रबोधन घडून आले, परिवर्तनाला चालना मिळाली, याविषयी अभ्यासकांमध्ये बऱ्यापैकी एकमत आहे.

लोकमानस व रीती यांचा अधिक्षेप न करता, त्यांच्याशी संवाद साधत, प्रबोधनाची एक मांडणी स्वतःची म्हणून करीत (ज्या मांडणीत पाश्चात्त्य प्रभाव पचवून घेतले होते) प्रबोधनाची चळवळ म. गांधींनी प्रवर्तित केली. पण या कार्याकडे वासाहतिक मानसाच्या प्रबुद्ध मंडळींनी अविश्वासाने, अधिक्षेपाच्या भूमिकेतूनच पाहिले.

खरी अडचण या वासाहतिक मानसाची आहे असे म्हणायला लागते. हे मानस इंग्रजांनी वा पाश्चात्त्यांनी 'लादले' असे म्हणणे योग्य नाही. ते निर्माण व्हावे या दृष्टीने सहाय्यभूत अशी एक ज्ञाननिर्मितीप्रक्रिया त्यांनी जरूर चालविली. पण ती त्यांनी स्वतःसाठीही चालविली; आपण वस्तुनिष्ठ ज्ञानाची निर्मिती तटस्थ अभ्यासकाच्या भूमिकेमधून करीत आहोत ही त्यांची प्रामाणिक धारणा होती. राजकीयदृष्ट्या स्वतंत्र झाल्यावरही, या अर्थाने वासाहतिक मानसाची जडणघडण होतच राहिली आहे.

**१२. समारोप**

येथे देशीयतेचा मुद्दा महत्त्वाचा ठरतो. देशीयता याचा अर्थ जे जे देशी ते ते श्रेष्ठ, ते ते पुनरुज्जीवित करण्यायोग्य, 'जुने ते सोने' असा घ्यावयाचा नाही. तर आपण काय होतो, आपली समाज व संस्कृती या अंगाने जडणघडण कशी होत गेली, आपले 'मूलस्रोत' कोणते आणि आपला वारसा काय, हे चिकित्सक डोळसपणे, सहृदयतेने जाणून घेणे, ही प्राथमिक आवश्यकता. या उपक्रमात आपले गुणच तेवढे उगाळत बसावयाचे असे अभिप्रेत नाही, तर आपले दोषही स्वच्छपणे बघावयाचे. दुबळ्या जागा हेरावयाच्या. सामर्थ्यस्थळेही नोंदवायची.

याची सुरुवात मोठ्या प्रमाणावर इंग्रजी राजवटीच्या प्रस्थापनेने, त्या धक्क्याने झाली. या शोधासाठी ब्रिटिशांनी व परदेशी अभ्यासकांनी आपल्याला चालना दिली, आणि पुष्कळ सामग्री पुरविली. 'ईश्वरी कृपा' म्हणावयाची तर ती ही. दुसरे त्यांचे योगदान, अभ्यासाच्या चिकित्सक पद्धतीच्या रूपात आहे. तिसरे योगदान, आपल्या बुद्धीची क्षितिजे त्यांनी जगड्व्याळ केली. एक तौलनिक आलोक उपलब्ध करून दिला.

पाश्चात्त्यांनी, विशेषतः इंग्रजांनी, त्यांच्या चष्म्यामधून-आलोकामधून – आमचे इतिहास लिहिले, आमचे समाजशास्त्र रचले, आमच्या धर्माची चिकित्सा केली; आमच्याविषयी 'ज्ञान' संपादन करताना त्यांचे काही व्यावहारिक हेतू होते, त्यांचे काही हितसंबंध गुंतलेले होते, या दोन्ही गोष्टी खऱ्या. पण ही गोष्ट काहीशी अटळ व स्वाभाविक आहे. आम्ही आमचा स्वतंत्र, आमचा असा आलोक निश्चित करावा, त्याची विवेकनिष्ठेने ('रीझन'च्या आधारे) स्पष्टता करावी, तो अधिक योग्य कसा आहे, अधिक वास्तवदर्शी कसा आहे हे वादसंवादाद्वारे पटवून द्यावे ही आमची जबाबदारी आहे. छत्रपती शिवाजीमहाराजांच्या व्यक्तित्वाचे व कार्याचे मूल्यन या प्रक्रियेमधून कालांतराने मूलतः वेगळे झाल्याचे आपणांस परिचित आहे. तटस्थ, निर्लेप भूमिकेमधून ज्ञान प्राप्तच होऊ शकत नाही, सत्याप्रत पोचताच येत नाही ही भूमिका कोणालाच उपकारक ठरत नाही.

वासाहतिक अवस्थेमधून बाहेर पडणाऱ्या जवळपास सर्वच समाजांना स्वतःच्या 'अस्मिते'ची पुनर्‌ओळख करून घ्यावी लागत आहे. ज्यांना म्हणण्यासारखा इतिहास नाही, जे कालपरवापर्यंत 'रानटी' टोळी समाज होते, ज्यांना स्वतःच्या भाषापण नव्हत्या, असे ज्या समाजांविषयी सर्रास म्हटले जात होते त्यांचाही आज स्वतःच्या मूल स्रोतांचा, इतिहासाचा व अस्मितेचा शोध जारी आहे. या शोधामधून सत्याप्रत आपण जाऊन पोचू. त्या सत्याच्या पायावरच आपल्या समाजाच्या पुनरुत्थानाची उभारणी व्हावयाची आहे.

एक प्रकारे यासाठी आज भारतात समुद्रमंथनच चालले आहे. या घुसळणीमधून प्रथम हलाहल बाहेर पडावे ही गोष्टही स्वाभाविक व अटळ आहे. हे हलाहल पचविल्याखेरीज अमृताचा कुंभ हाती यावयाचा नाही. येथील सर्व लोकांना, त्यांच्या इतिहास-परंपरांना, अस्मितांना, वारशांना एकरस करू शकणारी देशीयता आरेखित करण्याचे आव्हान आपण पेलावयाचे आहे. ते न पेलता येत असल्याने आज आपली अवस्था छिन्नविच्छिन्न झाल्याचे अनुभवाला येत आहे.

आपल्यापुढील दुसरे आव्हान आर्थिक-राजकीय पुनर्रचनेचे आहे. गांधींच्याही कितीतरी आधी रवींद्रनाथ टागोरांनी पाश्चात्त्य धाटणीच्या राष्ट्रवादाची विध्वंसकता आरेखित केली होती. खेड्यांच्या दुरवस्थेचे दर्शन घेतल्यावर त्यांनी 'स्वदेशी समाज' हा आपला निबंध लिहिला होता. आणि 'विश्वमानवा'ची (Universal Man) ही गोष्ट केली होती. भारताचा आध्यात्मिक वारसा त्यांच्या रोमरोमात मुरलेला होता. आधुनिक पाश्चात्त्य संस्कृती, प्रबोधनयुग व विवेकवादी युग ('एनलायटनमेंट', 'एज ऑफ रीझन'), पाश्चात्त्य वाङ्मय यांचा वारसा त्यांना समृद्ध स्वरूपात लाभला होता. हे सगळे पचवून रवींद्रनाथ पक्के देशी राहिले. इतके देशी की, जगन्मान्य झाले, नोबेल पारितोषिक मिळाले पण इंग्रजी भाषेची भुरळ त्यांना पडली नाही. रवींद्रनाथ क्रांतदर्शी कवी होते, तत्त्वज्ञ-दार्शनिक ('व्हिजनरी') होते. शांतिनिकेतन, श्रीनिकेतन, विश्वभारती ही शिक्षण व सामाजिक पुनर्रचनेच्या विषयांतील त्यांच्या प्रतिभेमधून स्फुरलेली स्वप्ने होती. गांधींचा प्रवास अगदी वेगळा झाला. आधुनिक पश्चिमी सभ्यता (ब्रिटिश सभ्यता हे तिचे श्रेष्ठतम रूप) आत्मसात करण्याच्या निकराच्या उत्कट प्रयत्नाचे वांझपण गांधींना टप्प्याटप्प्याने प्रतीत होत गेले. १९व्या शतकाच्या अखेरच्या काळात जागतिक राजधानीच असलेल्या लंडनमध्ये राहात असताना तेथील बंडखोर ('रॅडिकल') प्रवाहांच्या, 'नव्या युगा'चे उद्गान करणाऱ्यांच्या सहवासात आल्यावर प्रथमतः; नंतर दक्षिण आफ्रिकेत साम्राज्य-

वादाचे नागडे, हिंस्र, अमानुष रूप साक्षात अनुभवल्यावर; आणि, अखेरीस, भारतातील व ब्रिटनमधील साम्राज्यसत्तेने धारण केलेला सुसंस्कृत उद्धारकर्त्यांचा मुखवटा जालियनवाला बाग हत्याकांडाच्या प्रसंगी दूर झाला तेव्हा. रवींद्रनाथ मूळातच वासाहतिक मानसाच्या सापळ्यात कधी सापडले नाहीत. गांधी 'वासाहतिक मानस' पुरते ग्रहण केलेले. हे ग्रहण सुटायलाही बराच काळ व अनुभव लागला. आधुनिक पाश्चात्त्य सभ्यतेवरील त्यांची मूलग्राही टीकाटिप्पणी आणि देशी दृष्टी *हिंद स्वराज्य* मध्ये प्रथम त्यांनी ठळकपणे मांडली. पुढील काळात जीवनाच्या सर्व महत्त्वाच्या क्षेत्रांमध्ये त्यांनी व्यावहारिक विधायक पुनर्रचना सुचविली व त्यासाठीचे कार्यक्रमही दिले. त्यांनी जी तत्त्वे विशद केली त्यांचा अंगीकार करूनच 'साम्राज्यसत्ता-वसाहत' ही वर्तमान विध्वंसक चौकट तोडता येणार आहे, ही गोष्ट जगभर मान्यता पावत आहे.

आपल्यापुढचे तिसरे आव्हान सामाजिक-सांस्कृतिक पुनर्रचनेचे आहे. व्यक्तिस्वातंत्र्य, समता, न्याय, बंधुभाव या तत्त्वांवर समाजाची पुनर्रचना करावयाची आहे. याच्या वाटेतला एक मोठा अडसर जातिभेदाधारित उच्चनीचभाव व अस्पृश्यता हा आहे. आदिवासी जनसमूह, भटके-विमुक्त जन यांच्या विषयीचा हीन भाव हापण अडसर आहे. दुसरा मोठा अडसर स्त्रीला दिले गेलेले स्थान व वागणूक हा आहे. तिसरा अडसर धर्माच्या हिणकस रूपाचा आहे.

या साऱ्याच विषयांत आपला समाज, इतिहास-परंपरा आणि धार्मिक-सांस्कृतिक व्यूह यांची सम्यक् ओळख करून घेण्याची विशेषच गरज आहे.

कोण्या इतिहासकाराने असे म्हटले आहे की, सम्राट अशोकाचे साम्राज्य भारताच्या इतिहासातले सर्वांत मोठे, जवळपास संपूर्ण भारत उपखंड व्यापणारे साम्राज्य होते. यावरून दोन गोष्टी सूचित होतात. एक, भारत उपखंडाच्या विस्तीर्ण भूप्रदेशाची राजकीय व सामाजिक एकात्मता अडीच हजार वर्षांपूर्वीपासून सलग टिकून आहे. राज्य एक असो वा अनेक, त्यांची राजकीय बांधणी व त्या राज्यांतील समाजाची रचना एकाच प्रकारची राहिली आहे. दोन, वैदिक व अ-वैदिक दोन्ही विचारप्रवाह यांची झटापट व सरमिसळ सर्व उपखंडभर या काळापासूनच, किंबहुना आधीपासूनच होत आली. आणखी एक-दोन गोष्टी सूचित होतात. नगररचनाशास्त्र जसे हराप्पा-मोहंजोदडो या नगरांच्या बांधणीत प्रतिबिंबित होते तसे चातुर्वर्ण्याची व्यूहरचना ही एका समाजरचनाशास्त्राचे उपयोजन अधोरेखित करते. अशा एका व्यूहात येथील शेकडो जनजातींना बसवून समाजाचा एक कार्यक्षम आराखडा सिद्ध करता येण्यासाठी मूळात समाज तेवढा मोठा, व्यामिश्र व प्रगत असणे गरजेचे होते. आणि हा समाज नागर समाज असणार. चातुर्वर्ण्यव्यूह हा नागरपूर्व आदिवासी वा अनेक जनांचे संमिश्रण नसलेल्या एकजिनसी समाजात निर्माण करण्याची गरजच नाही. ब्राह्मण व क्षत्रिय यांची कामे पुरेशी विशेषीकृत झाली व त्यांनी ती पिढीजाद करावीत ही कार्यक्षमतेच्या दृष्टीने गरज उत्पन्न झाली. असेही दिसते की, भारत उपखंडभर मिळून हजारो लहान-मोठे लोकसमूह होते. प्रगत शेतीच्या पायावर नागर समाजाची बांधणी उपखंडभर होत जाण्याच्या ओघात हे समूह 'जातीं'च्या स्वरूपात एका बृहद्‌रचनेत गुंफले गेले. म्हणजे, भारतात, कुटुंबांचा मिळून बनणारा गोतावळा हा प्राथमिक, पायाभूत मानवी समुदाय संमिश्र व बृहत् व्यामिश्र नागर समाजाची बांधणी केली जात असतानाही, या नव्या रचनेतही राखला गेला. भारतातील माणसाला स्वतःची ओळख कुल-गोतावळा-जात, गाव-पंचक्रोशी-प्रदेश, भाषा-दैवते-कुलाचार-सणउत्सव या अंगांनी आजही होते याचे रहस्य यामध्ये असण्याची शक्यता आहे.

सांगण्याचा मतलब असा की, इंग्रजी राजवटीने जे विचारव्यूह आमच्या मनावर बिंबवले, जे ज्ञान प्रमाण म्हणून सादर केले, जी सामाजिक शास्त्रे 'वैज्ञानिक सत्य' म्हणून प्रमाणित केली, आमचा जो इतिहास सांगितला त्याची सत्यता आमच्या स्वतःच्या स्वतंत्र देशी आलोकामधून आम्ही पडताळून घ्यावयास हवी आहे, आणि त्यांच्या राजवटीने रुजवलेल्या 'वासाहतिक मानसिकते'मधून स्वतःला मुक्त करायला हवे आहे. गेल्या दोन शतकांमध्ये अनेकानेक भारतीयांनी हे काम चालवले आहेच. असा सर्जक प्रतिसाद देण्यासाठी यांच्यापैकी कोणास अलीकडेपर्यंत एडवर्ड सैद, मिशेल फुको वा गणेश देवी यांची वाट पाहावी लागली नाही. पण त्यांनीही काही मुद्दे प्रकाशात आणलेले आहेत; दृष्टीच्या एका कोनामधून बघितल्यास काय दिसते, तिकडे लक्ष वेधले आहे.

प्रा. रा.भा. पाटणकर व प्रा. बर्नार्ड कोहून यांची या लेखात उल्लेख केलेली दोन पुस्तके *अपूर्ण क्रांती* आणि Colonialism and Its Forms of Knowledge एकत्र विचारात घेतली तर, पाटणकरांच्या म्हणण्याप्रमाणे










अपूर्ण राहिलेली क्रांती पूर्णत्वाला नेण्याच्या कामी कोहून यांचे पुस्तक आपल्याला अधिक उपयोगी ठरणारे आहे, कारण ते आपल्याला डोळस व चिकित्सक दृष्टी देते, आणि इतरही अनेक विषयांमधील रूढ शिष्टमान्य समजुती/ज्ञान तपासून घेण्याची पद्धती समोर ठेवते. कोहून अमेरिकन अभ्यासक आहेत, पण त्यांच्या भूमिकेत देशीयतेचा आढळ होतो. साम्राज्यसत्तेचे आधुनिक रूप, या साम्राज्यसत्तांच्या वसाहतींकडे सोपविलेली भूमिका, राज्यकारभाराचे नैतिक समर्थन देण्याची आंतरिक बाध्यता ('इनर कंपल्शन'), हस्तक्षेप व नियंत्रण ज्ञानाधिष्ठित असले पाहिजे ही आधुनिक युगाची मागणी या सगळ्याची दखल पाटणकरांनी का घेतली नाही, हे कळत नाही. बौद्धिक-सांस्कृतिकदृष्ट्या आम्हाला मनाने व बुद्धीने पांगळे करणाऱ्या वासाहतिक मानसाची येथे जडणघडण झाली हेच पाटणकरांच्या नजरेतून पूर्णपणे निसटलेले असावे याचे आश्चर्य वाटते. 'कल्चरल-इंटलेक्च्युअल हेगेमनी' प्रस्थापित करण्यात इंग्रजी राजवट किती यशस्वी झाली आहे याचे एक बोलके उदाहरण म्हणून पाटणकरांच्या *अपूर्ण क्रांती*चाच दाखला देता येईल.



---

**लेखक परिचय**

❖ **श्री.मा. भावे** : प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच.डी. व पदवीउत्तर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध. **पत्ता** : ३३/२०, ४थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.

❖ **हरिश्चंद्र थोरात** : एम.ए. (मराठी), पीएच.डी. (मराठी); कीर्ती महाविद्यालय, दादर, मुंबई येथे कनिष्ठ महाविद्यालयीन पातळीवरील मराठीचे शिक्षक. **पत्ता** : बी ५०२, ॲटलांटा, मीठागर पथ, कांदरपाडा, दहिसर (प.), मुंबई ४०० ०६८.

❖ **अशोक जोशी** : गोवा विद्यापीठात प्राध्यापक **पत्ता** : १२ सिंगबाळ बिल्डिंग, टोंक पो. करंझाळे, गोवा ४०३ ००२.










# इंग्रजी शिक्षणाची खुंटलेली वाट

श्री.मा. भावे

**उपोद्घात**

प्रा. पाटणकरांचा मुख्य हेतू देशीवाद व निर्वसाहतीकरण या दोन विचारसरणींचा प्रतिकार करणे, हा आहे' (१०४, १०५). इंग्रजीतून लेखन करणाऱ्या भारतीयांनी व त्या लेखनाची समीक्षा करणाऱ्या प्राध्यापकांनी या दोन विचारधारांना उचलून धरले आहे. प्रा. पाटणकर ज्या क्षेत्रात काम करतात त्या क्षेत्राच्या संदर्भात देशीवाद व निर्वसाहतीकरण या संकल्पनांना महत्त्व असेलही. पण एकोणिसाव्या शतकात इंग्रज राज्यकर्त्यांनी येथे जी शिक्षणपद्धती स्थापन केली तिच्या गुणावगुणांची आणि चांगल्या-वाईट परिणामांची परीक्षा करण्यासाठी हा संदर्भ फारच तोकडा पडतो. त्यामुळे इथे जे विवेचन केले आहे, त्यात देशीवाद व निर्वसाहतीकरण या संकल्पनांचा संबंध आणलेला नाही.

प्रा. पाटणकरांच्या लिखाणाचा रोख असा आहे की, इंग्रजांनी येथे राज्य केले त्यातून भारतीय संपत्तीचे शोषण झाले हे खरे आहे. पण इंग्रजांनी येथे जो राज्यकारभार केला तो सर्वच्या सर्व शोषणाच्या एकमेव उद्देशाने झाला हे म्हणणे खरे नाही. इंग्रजांनी जेथे जी शिक्षणपद्धती निर्माण केली तिचा सर्वस्वी संबंध साम्राज्यवादाशी लावता येणार नाही. इंग्रजांचा मूळ हेतू येथील राज्यकारभाराला लागणारा नोकरवर्ग निर्माण करणे, हा होताच. पण त्या अनुषंगाने अनेक चांगल्या गोष्टीही घडून आल्या. या शिक्षणामुळे भारतात व महाराष्ट्रात व्यक्तिवाद, भांडवली अर्थव्यवस्था, आधुनिक तंत्रज्ञान व विज्ञान यांचे बीजारोपण झाले. एका सनातन व निश्चेष्ट समाजात आधुनिकता हे मूल्य रुजविले. या शिक्षणातून ज्या पहिल्या तीन-चार पिढ्या निर्माण झाल्या त्यात मोठ्या कर्तृत्वाची, विशाल विचारसरणीची, समाजाच्या उन्नतीविषयी कळकळ बाळगणारी माणसे निघाली. हे पटवून देण्यासाठी प्रा. पाटणकरांनी न्यायमूर्ती रानडे, दादाभाई नौरोजी व जमशेटजी टाटा यांच्या कार्याचा आढावा घेतला आहे.

त्यानंतर मात्र ही प्रगती कुंठित झाली. नवा, स्वतंत्र विचार मांडला गेला नाही; केवळ परकी विचार उधार घेतले जाऊ लागले (१७९). शिक्षणाचा विस्तार झाला नाही. अभ्यासक्रमात वैविध्य आले नाही. सुरुवातीच्या काळात उत्कर्षाविषयी ज्या अपेक्षा निर्माण झाल्या होत्या, त्या फोल ठरल्या (१८१). तिसरे असे की, महाराष्ट्रातील अर्थव्यवस्था आखडलेलीच राहिली. पैसा फिरता राहिला नाही. नवीन उद्योग-धंदे स्थापन झाले नाहीत. सुशिक्षित माणसे फक्त नोकरीच्या मागे लागली. या परिस्थितीचा खरा दोष ते पदवी व नोकरी यांच्या मागे लागलेल्या परीक्षार्थी विद्यार्थ्यांवर टाकतात (१३८).

**इंग्रजांना झुकते माप**

प्रा. पाटणकरांनी सुरुवातच इंग्रजांना झुकते माप देऊन केली आहे. दुसऱ्या बाजीरावाची सत्ता गेली तेव्हा बहुसंख्य लोकांना बरेच वाटले, असे ते म्हणतात (९९). पण हे म्हणणे खरे नाही. *'पेशवाईची अखेरची अखबार'* नावाची एक हकीकत आहे. तीवरून ध्यानात येते की, बाजीरावाने पुणे सोडल्यावर ४-६ दिवसांतच इंग्रजांच्या सैन्यात फितुरी माजविण्याचा कट झाला आणि कटवाल्यांना एल्फिन्स्टनने तोफेच्या तोंडी दिले. बाजीराव इंग्रजांची जी दमछाक करीत होता तिच्या बातम्या ऐकून पुण्यातील लोकांना हुरुप येई. पुढे इंग्रजांचा अंमल स्थिरावल्यानंतरही इंग्रजांविरुद्ध वारंवार लहान मोठे उठाव झाले. दंगेधोपे झाले. त्या काळच्या लावण्या-पोवाड्यांवरूनही (उदा. "जुने कायदे अगदी मोडले जधिपुन आली इंग्रजी") सामान्य जनतेच्या मनातली इंग्रजी राज्याविषयीची नापसंती व्यक्त होत होती. इंग्रजी राज्यात शांतता होती; लोक सोने काठीला बांधून हिंडत होते (९९) या केवल सांगोवांगी गोष्टी आहेत. माझे मित्र प्रा. अभंग यांनी पुण्याच्या मॅजिस्ट्रेटने १८३९ साली काढलेला एक जाहीरनामा मला दाखविला. त्यात म्हटले आहे की, मुलांच्या अंगावर दागिने घालून त्यांना रस्त्यावर खेळू देऊ नका. त्यांचे खून होऊन दागिने पळवले जातात. इंग्रजी अंमलात शेतकरी नागवले गेले. त्यांच्या जमिनी सावकारांच्या घशात






गेल्या. त्यामुळे शेतकरी टोळ्या करून सावकरांच्या घरावर धाडी घालून गहाणाचे कागद जाळू लागले, हे सर्वांना माहीत आहे.

असे असताही इंग्रजांनी महाराष्ट्रात शांतता स्थापन केली, व लोकांची इंग्रजी राज्याकडे पहाण्याची दृष्टी स्वागताची व आशावादी होती, असा समज झाला आहे तो लोकहितवादींसारख्या इंग्रजी शिक्षणातून बाहेर पडलेल्या व इंग्रजी नोकऱ्यांमुळे उत्कर्ष पावलेल्या लोकांच्या लिखाणामुळे. प्रा. पाटणकरांनी आपल्या शिक्षणविषयक प्रकरणाची सुरुवात लोकहितवादींचे एक अवतरण घेऊन केली आहे, हे नोंद घेण्यासारखे आहे. इथे आम्हास असे मुळीच सुचवावयाचे नाही की, लोकहितवादी हे अप्रामाणिक, मतलबी आणि इंग्रजांचे हस्तक होते. तथापि मनुष्य ज्या प्रकारे वाढतो व नांदतो त्यामुळे त्याच्या मनाला व विचाराला विशिष्ट वळण मिळते व वस्तुस्थितीचे त्याचे आकलन तसे बनत जाते. अनेक प्रामाणिक साम्यवादी सोव्हिएट युनियनमध्ये सर्व काही आलबेल आहे, असे ठासून सांगत, त्यातलाच लोकहितवादींचा मामला होता. हा मुद्दा इथे विस्ताराने सांगण्याचे कारण की, लोकहितवादींसारखी इंग्रजी राजवटीचा लळा लागलेली माणसे निर्माण करावी हा इंग्रजांच्या शिक्षणपद्धतीचा हेतू होता, हे आपण पुढे मांडणार आहोत.

### नागरी समाज

इंग्रजी शिक्षणाची स्थापना करण्यामागे इंग्रजांचा काय हेतू होता, याची बरीच चर्चा पाटणकरांनी केली आहे. येथील कारभार चालवण्यासाठी सुशिक्षित नोकर हवेत व त्यांना शिक्षण द्यावे लागणार हा इंग्रजांचा प्राथमिक हेतू होता, हे त्यांना मान्य आहे (११६). पण याच्या पुढे जाऊन 'विशाल दृष्टिकोन व स्वतः निवडलेली तत्त्वे असणारा नवा माणूस घडविणे' हा या शिक्षणाचा हेतू होता, असे ते सांगतात (११७). 'एक दिवस येथील लोकांच्या हाती राज्यकारभार सोपवून परत जाणे श्रेयस्कर आहे; तो सांभाळण्याची क्षमता त्यांच्यात निर्माण व्हायला हवी; नाहीतर भलतेच लोक तो हिसकावून घेतील' (तत्रैव) अशा पोक्त विचाराने इंग्रजांनी येथे शिक्षणाची व्यवस्था केली, असे एल्फिन्स्टनचा हवाला देऊन प्रा. पाटणकर सांगतात. एल्फिन्स्टनच्या या कथित उदार दृष्टिकोणाचे एवढे मोल प्रा. पाटणकरांना वाटते की, त्याचा निरनिराळ्या संदर्भात तीनदा उल्लेख त्यांनी केला आहे (११४, ११७, १२५).

एल्फिन्स्टनच्या या साळसूद वचनाचा मतलबी अर्थ असा की, येथील नवशिक्षित समाज राज्यकारभार सांभाळण्यास लायक होईपर्यंत आम्ही राज्य सोडणार नाही. या नवशिक्षितांनी इंग्रजांना अपेक्षित असणाऱ्या सुधारणा घडवून आणून आपण राज्यकर्ते होण्यास पात्र आहोत हे सिद्ध करून दाखवले पाहिजे, मगच स्वातंत्र्याचा विचार होवू शकतो. पुढे सुशिक्षितांत 'आधी राजकीय की सामाजिक', 'इंग्रजांचा व आमचा संबंध हा दैवी संकेत आहे' इत्यादी वाद निर्माण झाले त्याचे बीज एल्फिन्स्टनने दाखवलेल्या या गाजरात आहे.

प्रा. पाटणकरांनी असे कसून प्रतिपादन केले आहे की, व्यक्तिवाद, खाजगी मालमत्तेचा हक्क, भांडवलशाही, स्वतंत्र निर्णय घेण्याची व तीप्रमाणे वर्तन करण्याची क्षमता यांची मिळून जी ध्येयवत्ता (आयडियॉलॉजी) तयार होते – तिला आपण आधुनिकता असे म्हणू – तिच्यावर आधारलेला किंवा त्या ध्येयवत्तेचे अनुयायित्व स्वीकारलेला असा नागरी समाज इंग्रजांना येथे तयार करावयाचा होता (१६५). त्यांनी येथे जे शिक्षण दिले ते हेतुतः कमी दर्जाचे दिले असे नाही. खुद्द इंग्लंडमध्ये जे चांगले शिक्षण म्हणून समजले जाई, तेच त्यांनी दिले (१४८ ते १५२). याला पुरावा म्हणून डॉ. भांडारकरांचे एक वचन प्रा. पाटणकरांनी उद्धृत केले आहे. त्यात भांडारकरांनी म्हटले आहे की, पुढच्या आयुष्यात विद्यार्थ्याला अनेक प्रश्नांबाबत मते बनवावी लागतात. पदवीपर्यंतचे शिक्षण असे असले पाहिजे की, त्यालाही मते बनवता आली पाहिजेत. या म्हणण्याचा रोख असा की, इंग्रजांनी स्थापलेल्या विद्यापीठातून असे शिक्षण मिळत होते (१३८).

या म्हणण्याचे विस्तृत पर्यालोचन आपण पुढे करू. तूर्त या स्वतंत्र विचाराला जी मर्यादा होती तिचा उल्लेख करू. ती मर्यादा हीच की, ही स्वतंत्र मते इंग्रजी राज्याला अनुकूल अशीच असली पाहिजेत. याचे ढळढळीत उदाहरण न्या. मू. रानडे यांच्या चरित्रात मिळते. "शिवाजीची राज्यपद्धती व इंग्रजी राज्यपद्धती यांची तुलना करण्याच्या भरात स्वराज्याभिमानाला बळी पडून माधवरावांनी इंग्रजी राज्यपद्धतीला नावे ठेविली. हा अपराध त्यांच्या हातून घडताच ग्रँट साहेबांनी त्यांची कानउघाडणी तर केलीच, शिवाय सहा महिनेपर्यंत छात्रवृत्ति जप्त करून त्यांस सदैव लक्षात राहण्याजोगे अधिक प्रायश्चित भोगावयास भाग पाडले. माधवरावांनी या प्रकरणापासून आत्मसंयमाचा चिरस्थायी बोध हृदपट्टिकेवर कोरून टाकला."[२]

अनुक्रमणिका






नवीन शिक्षणाकडे विद्यार्थ्यांना आकर्षित करण्यासाठी सुरुवातीच्या काळात सरकारने संख्येने पुष्कळ व रकमेने घसघशीत अशा छात्रवृत्त्या (फेलोशिप्स) ठेवल्या होत्या. रानड्यांबरोबर एल्फिन्स्टन कॉलेजात शिकणाऱ्या बहुतेकांना शिष्यवृत्त्या मिळत होत्या.[३] रानडे १८६२ साली बी.ए. होऊन एल्फिन्स्टनचे फेलो झाले तेव्हा त्यांना द.म. १२५ रु. छात्रवृत्ती मिळत होती.[४] त्यावेळी बाजरी रुपयास १८ शेर, तांदूळ १४ शेर, डाळ २२ शेर व ज्वारी २० शेर या भावाने मिळत होती[५] हे ध्यानात घेतले, तर ही शिष्यवृत्ती किती उदंड होती, ते लक्षात येते.

इंग्रजी शिक्षण सुरू होऊन ३०-३५ वर्षे जाईपर्यंत पदवीधरालाच काय पण मॅट्रिक मनुष्याला देखील सरकारी नोकरी ठेवलेलीच होती. नोकरी व तिच्यापासून मिळणारे एकंदर उत्पन्न यांच्या योगाने सामाजिक प्रतिष्ठा व दबदबा यांचा लाभ होई.[६] नोकरी नंतर निवृत्तीवेतन मिळे. अशा रीतीने सरकारवर सर्वस्वी अवलंबून असणारा आणि सरकारच्या आश्रयाने सामाजिक प्रतिष्ठा व वर्चस्व यांचा लाभ झालेला नवा वर्ग तयार झाला. यालाच पाटणकर 'नागरी समाज' असे गौरवयुक्त नाव देत आहेत. हा समाज इंग्रजांनी बुद्धिपुरस्सर निर्माण केला हे आपण आता पाहू.

### इंग्रजांचा लळा

शिक्षण सुरू करताना शिक्षित नोकरवर्ग मिळावा, हा इंग्रजांचा हेतू होता हे पाटणकरांना मान्य आहे. इतिहासाचार्य राजवाडे यांनीही म्हटले आहे की, "येणे प्रमाणे उच्च, मध्यम व कनिष्ठ शिक्षणांच्या पाठशाळा व शाळा काढण्यात नोकर तयार करण्याचा तेवढा एक हेतू सरकारचा होता."[७] पाटणकर म्हणतात की, आधुनिकतेचे बाळकडू प्यालेला नागरी समाज इंग्रजांनी निर्माण केला. राजवाडे ही गोष्ट सांगताना म्हणतात, "या सर्व साधनांचा मुख्य उपयोग लहान मोठ्या परीक्षा घेऊन उमेदवारांना शिक्का देण्याचा आहे; आणि याचा मुख्य हेतू इंग्रज लोकांविषयी, इंग्लिश संस्कृतीविषयी व इंग्लिश आचारविचारांविषयी उमेदवारांच्या मनात पूज्यबुद्धी उत्पन्न करण्याचा आहे."[८]

इंग्रजी साहित्य, पाश्चात्त्य विज्ञान, ब्रिटिशांचे राज्यशास्त्र व अर्थशास्त्र, युरोपीय तत्त्वज्ञान आणि तंत्रविद्या इत्यादींचे शिक्षण इंग्रजी भाषेतून व इंग्रज शिक्षकांनी संस्कारक्षम वयातील मुलांना देण्यामागे त्यांना इंग्रजी विद्येचा लळा लागावा हा इंग्रजांचा हेतू होता हे सांगणारे सडकून पुरावे देता येतील. ज्याने नवीन शिक्षणाची पाया भरणी केली त्या मेकॉलेचा मेव्हणा व कंपनीच्या नोकरीतील एक उच्चपदस्थ अधिकारी ट्रिव्हेल्यान याने म्हटले आहे की, "ज्यांचा इंग्रजी वाङ्मयांशी परिचय झाला आहे असे भारतीय आपणास (इंग्रजांना) परकीय मानेनासे होतात. आपल्यातील थोर पुरुषांविषयी आपण जितक्या उत्साहाने बोलतो, तितक्याच उत्साहाने ते बोलतात. आपल्यांच सारखे शिक्षण मिळाल्यामुळे आपल्याला ज्या गोष्टींत रस वाटतो त्यांच गोष्टींत ते रस घेतात. आपल्याला ज्याचा हव्यास वाटतो त्याचा त्यांनाही हव्यास असतो. ते हिंदू असण्यापेक्षा इंग्रजच जास्त झालेले असतात. आपल्या शाळांतून तयार झालेल्या विद्यार्थ्यांची दारुण इच्छा आपल्या (हिंदी) संस्थांची बांधणी इंग्रजी धर्तीवर व्हावी, अशी असते. सुधारणां-विषयीच्या त्यांच्या सर्व अपेक्षा त्यांचा इंग्रजांशी संबंध आहे त्याच्याशी निगडित आहेत. इंग्रजांपासून मिळणारे संरक्षण व शिक्षण यांच्यावर त्या सुधारणा अवलंबून आहेत."[९] थोडक्यात, आमच्या समाजात सुधारणा व्हायची तर इंग्रजी शिक्षण हवे. इंग्रजी शिक्षण हवे तर इंग्रजी राज्य हवे. इंग्रजी राज्य आमच्यात सुधारणा झाल्याखेरीज घालवणे आमच्या हिताचे नाही. पाटणकरांना प्रिय असणाऱ्या एल्फिन्स्टनच्या उदार मताचा इंग्रजांना अभिप्रेत असणारा खुलासा हा असा आहे.

इंग्रजांविषयी वाटणाऱ्या ममत्वाची परिणती म्हणजे येथील लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारणे ही होय. १९व्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्लंडमध्ये धर्मविषयक नव जागृती निर्माण झाली होती. त्या जागरणाचा प्रभाव कंपनीतील अधिकारी व राजकारणी यांच्यावरही पडला होता. नवीन शिक्षणाने येथील विद्यार्थी बाटून ख्रिस्ती होतील ही आशा इंग्रज प्रशासकांना वाटत होती. मेकॉलेने आपल्या वडलांना १८३६ साली लिहिले होते की, शिक्षणाविषयीच्या आमच्या योजना राबवल्या तर आणखी तीस वर्षांनी बंगालमधील उच्चवर्णियांत एकही मूर्तिपूजक आढळायचा नाही.[१०] पाटणकरांना प्रिय असणाऱ्या एल्फिन्स्टनलाही शिक्षण व धर्मप्रसार यांच्यातील नाते माहीत होते व ते एतद्देशियांच्या लक्षात येऊ नये, अशी इच्छा होती.[११]

इंग्रजांचे राज्य इथे स्थापन झाले व लागलीच इंग्रजी शिक्षणाला सुरुवात झाली, असे घडले नाही. या दोहोंच्यामध्ये

अनुक्रमणिका

महाराष्ट्रात सुमारे ४० वर्षांचा व बंगाल्यात सुमारे ८० वर्षांचा काळ गेला. या काळात येथील परंपरागत शिक्षणव्यवस्थेतून आणि देशभाषांतून इंग्रजी भाषा व पाश्चात्य विज्ञाने यांचा. अभ्यास व्हावा असा प्रयोग करण्यात आला. "कलकत्त्याला १८१६ साली व पुण्याला १८२१ साली हिंदू कॉलेजेस स्थापन झाली ती याच प्रकारच्या शिक्षणासाठी. तथापि १८३० नंतर कंपनीने असे ठरविले की पाश्चात्त्य विज्ञाने व साहित्य यांचेच शिक्षण व तेही इंग्रजीतून दिले गेले पाहिजे."[१२]

इंग्रजी ही शिक्षणाचे माध्यम बनून विद्यार्थ्यांच्या अशी मानगुटीवर बसली की, त्यांना स्वप्नेही इंग्रजीत पडू लागली.[१३] राजवाड्यांनी म्हटले आहे, "शाळेत व कॉलेजात प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथांशी शिक्षकांनी व परीक्षकांनी माझी क्षणभरही ओळख करून दिली नाही. कॉलेजात तर बहुतेक विद्यार्थी इंग्रजीच बोलत. अशा स्थितीत मीही बहुतेक सर्व व्यवहार इंग्रजीतच करू लागलो. सारांश सतत पंधरा वर्षे बारा न् बारा चोवीस तास सर्व कामे मी इंग्रजीत करू लागलो. ह्या एवढ्या अवधीत मी मराठी बहुतेक विसरूनच जावयाचा."[१४] पाटणकरांनी १८६२ साली मॅट्रिकच्या परीक्षेसाठी निघालेली मराठीची प्रश्नपत्रिका छापली आहे (१४०-१४१). ही प्रश्नपत्रिका इंग्रजीत काढली आहे, ही गोष्ट त्यांना खटकलेली दिसत नाही. इंग्रजी माध्यमाचा अपरिहार्य परिणाम असा झाला की, शिक्षण व शिक्षित हे दोघेही सर्वसामान्य समाजापासून दुरावत गेले.

पौर्वात्य पाठशाळांतून पाश्चात्त्य विज्ञाने व साहित्य यांचे शिक्षण देण्यात एक गोष्ट काहीशी साधत होती ती अशी की, विद्यार्थ्याला दोन्हींची तुलना करण्याची संधी मिळत होती आणि येथील समाजातील विचारपरंपरा आणि ज्ञानसंचित यांच्यापासून तो तुटत नव्हता. परंतु शिक्षणाचे पूर्ण पाश्चात्यीकरण झाल्यावर शाळा-महाविद्यालयांतून येणारा ज्ञानानुभव व दैनंदिन जीवनपद्धती यांचा मेळच बसेनासा झाला. याचे एक उदाहरण असे की, समाजात जो ज्ञानव्यापार चाले तो मौखिक होता. कीर्तने, प्रवचने, वेदपठण, पोथीश्रवण ही ज्ञानसाधने होती. शाळेतील अभ्यास छापील इंग्रजी क्रमिक पुस्तकांवरून होत होता. छापील पुस्तकाचा मुख्य उपयोग म्हणजे मनन-चिंतनातून विषय आत्मसात करणे. पण मौखिक-परंपरेतून आलेल्या विद्यार्थ्याला छापील पुस्तक म्हणजे पाठांतराचेच एक साधन होऊन बसले.[१५] "चक्कू ताड्या घोट्या अभ्यासाचे प्रकार हे तीन" ही जुन्या शाळातील अभ्यासाची पद्धत पाठांतराचे महत्त्वच सांगून जाते.

सारांश, इंग्रजी शिक्षणाने विद्यार्थ्याला केवळ इंग्रजी विद्येचा व अंमलाचा लळा लागत होता इतकेच नव्हे तर तो आपल्या समाजापासून तुटून पडत होता. वेगळा होत होता. आपल्या समाजाविषयी वा कुटुंबाविषयी त्याला आस्था वाटणे दूरच राहिले पण एक प्रकारची तुच्छता बुद्धीही वाटत होती. इंग्रज राज्यकर्त्यांना याचीं जाणीव नव्हती, असे नव्हे. मुंबईचा गव्हर्नर फ्रियर साहेब याने विद्यापीठाच्या पदवीदान समारंभात म्हटले होते, "तुम्हास जे शिक्षण मिळाले आहे त्या शिक्षणाने सामाजिक नीतिमत्ता लयाला जाते, तुम्ही वडील मंडळीची अवज्ञा करू लागता, गर्विष्ठ व स्वयंमन्य बनता, असा या शिक्षणावर आक्षेप आहे.[१६]

न्यायमूर्ती रानडे, दादाभाई नौरोजी आणि जमशेटजी टाटा यांच्या विचारांचा व कर्तृत्वाचा आढावा घेऊन पाटणकरांनी असे सुचविण्याचा प्रयत्न केला आहे की, इंग्रजी शिक्षणाच्या संस्कारातून बाहेर पडणारा स्नातक हा पाश्चात्त्य ज्ञान आत्मसात् केलेला होताच पण त्याच्या ठिकाणी स्वदेशाविषयी कळकळ, स्वतंत्र विचार करण्याची क्षमता आणि मोठा आवाका असणारे कर्तृत्व हे गुणही बाणलेले असत. निदान पहिल्या एक-दोन पिढ्यात तरी ज्यांचा अभिमान बाळगावा असे विद्यार्थी तयार झाले, असे ते म्हणतात. तथापि तत्कालीन समाजाला नवीन शिक्षण घेतलेले विद्यार्थी, एक वर्ग म्हणून, फारसे स्पृहणीय वाटत नव्हते, असे टिळकांच्या एका लेखावरून स्पष्ट दिसते. "इंग्रजी शाळातून पहिल्याने जी मंडळी बाहेर पडली त्यांच्या मनाची स्थिती एक प्रकारे फारच भयंकर किंवा शोचनीय झालेली होती. स्वधर्माचे व त्यातील नीतितत्त्वांचे शिक्षण बिलकूल नाही आणि परधर्माचेही नाही. समाजाच्या परंपरागत बंधनाबाबत आदर असावयाचा तोही नाहीसा झालेला, आणि दोनचार बुके झाल्याबरोबर मोठ्या पगाराची जागा त्या वेळी मिळत असल्याने अधिकारपदाचाही अंमल यांच्या मनावर झालेला होता... समाजास यांचे आचार व विचार बिलकूल ग्राह्य नव्हते. इतकेच नव्हे तर समाजास कोणत्याही प्रकारे व्यवस्थित रूप देण्यास जे पुढाऱ्यांचे अंगी गुण पाहिजेत ते यांच्यात नाहीत अशी समाजाची पक्की खात्री झाली होती."[१७]

**आधुनिकता कोठे गाभटली?**

"इंग्रज काही तरी देऊ इच्छित होते; आपण काही तरी घेऊ पाहत होतो" (११९) या वाक्यातील पूर्वार्धाची वासलात काय लागली, ते आपण पाहिले. इंग्रजांना इथे सुशिक्षित नोकरवर्ग हवा होता; त्याला आपला लळा लागावा अशी त्यांची अपेक्षा होती व त्याचे येथील समाजात वर्चस्व राहील याची काळजी ते घेत होते. पाटणकरांची अशी समजूत झाली आहे की, येथील समाज इंग्रजी शिक्षण घेण्यास फार उत्सुक होता. ही त्यांची समजूत होण्याचे कारण म्हणजे १८५२ साली मुंबईत एक सभा भरली व त्या सभेत जमलेल्या 'धुरीणां'नी कंपनीकडे शिक्षणाविषयी एक अर्ज केला ही त्यांना मिळालेली माहिती (११७). या सभेतील लोक धुरीण होते, समाजहितैषी होते, प्रामाणिक होते, त्यांची मागणी स्वार्थप्रेरित नसून परमार्थलक्षी होती, हे सारे मान्य केले तरी ती समाजाची प्रातिनिधिक मागणी होती असे म्हणणे अवघड आहे. ही सर्व मंडळी इंग्रजांच्या हितसंबंधांच्या घेऱ्यात पूर्वीपासून आलेली असून त्यांना इंग्रजांचा लळा लागलेला होता.

ज्या ब्राह्मणादी पांढरपेशा जातींनी इंग्रजी शिक्षणाकडे प्रथम धाव घेतली त्यांची इच्छा दरमहा ठरीव रक्कम निर्बाध आणून देणारी सरकारी नोकरी मिळवावी, इतकीच होती. ज्ञानाची जी परंपरेने चालत आलेली संकल्पना होती तीत शाळा-महाविद्यालयांतून मिळणारी माहिती कोठेच बसत नव्हती. वेद-वेदांगे, षड्शास्त्रे, प्राचीन काव्ये आणि व्यवहारोपयोगी विषय म्हणजे आयुर्वेद व शिल्पशास्त्र यांचा अभ्यास म्हणजेच व्यासंग व या विषयांवर प्रभुत्व म्हणजेच पांडित्य ही ब्राह्मण समाजाची दृढ समजूत होती. "न वदेत् यावनीं भाषां प्राणैः कंठगतैरपि", हे ज्यांचे ध्येयवाक्य त्या ब्राह्मणांना इंग्रजी भाषेतून मिळणारे व केवळ व्यवहाराला उपयोगी असे हे नवे शिक्षण पूर्णपणे त्याज्यच वाटले असणार व त्यांनी आपली मुले या शाळांतून अगदी नाइलाजाने पाठवली असणार.

सर्व हिंदूंना व त्याहीपेक्षा ब्राह्मणांना धास्ती होती ती ही की, आपली मुले ख्रिस्ती होतील.[१८] ही भीती अनाठायीही नव्हती. रानड्यांच्या वडिलांना कर्नल रीव्हज्ने असा सल्ला दिला होता की, रानड्यांना डॉ. विल्सनच्या शाळेत पाठवावे कारण तेथे उत्कृष्ट धर्मतत्वे मुलांच्या मनावर बिंबतील.[१९] हा सल्ला ऐकूनच बहुधा रानड्यांना त्यांच्या वडिलांनी एल्फिन्स्टन या सरकारी हायस्कुलात पाठविले. याच धास्तीचा एक पोटभाग म्हणजे अनोळखी अशा शिक्षकांच्या हातून शिक्षण मिळणार. जातपात व सोवळे-ओवळे पाळणाऱ्या समाजात सबगोलंकार करणाऱ्या शाळेत आपली मुले पाठवणे पालकांच्या जिवावरच येत असणार.[२०] सारांश, भारतीय लोक परक्या शिक्षण पद्धतीच्या स्वागताला उत्सुक होते ही पाटणकरांची समजूत भाबडेपणाची आहे.[२१]

इंग्रजी शिक्षणाची सरकारी नोकरीशी तंगडजोड झालेली असल्यामुळे शिक्षणाच्या प्रसाराला आळा घालणे सरकारला भाग पडे. नाही तर बेकारांच्या झुंडी सरकारी कचेऱ्यांच्या दारावर धडका देऊ लागल्या असत्या. त्यासाठी तीन उपायांचा वापर सरकार करी. पहिला म्हणजे नवीन शाळा व महाविद्यालये काढण्यावर बंधने आणणे. कर्झनने १९०४ साली विद्यापीठाचा कायदा बदलून हा उपाय वापरला. अभ्यासक्रम अवघड करणे, हा दुसरा उपाय. टिळकांनी १८९६ साली म्हटले आहे की, "हल्लीच्या अभ्यासाचे दडपण एवढे काही मोठे आहे की, चांगला विद्यार्थी देखील त्या खाली दडपून जातो. नवीन नियमाप्रमाणे बी.ए.च्या परीक्षेस जी पुस्तके नेमली आहेत त्यांची पाने चाळून मोजून पाहिली असता पाच हजार भरली."[२२] अभ्यासक्रमाहून अवघड परीक्षा असत. मॅट्रिकच्या परीक्षेला बसलेला परंतु ज्याच्या परीक्षेचा निकाल लागलेला नाही असा एक विद्यार्थी लिहितो. "मला मधूनच हुंदके येत व मी विव्हळू लागे... एक्या बाजूला बसून आपल्या परीक्षेतील अपयशाविषयी शोक करावा असे मला वाटे. मी गप्प गप्पच असे व मधूनच ओरडे 'मीच तो! मॅट्रिक नापास झालेला."[२३]

सरकारी शिक्षण ही गोष्ट हिंदी जनतेला अपरिचित होती. पूर्वी जे काही बरेवाईट शिक्षण चालत असे, ते स्थानिक समाज आपल्या मिळकतीतून, आपल्या देखरेखीखाली व आपण नेमलेल्या शिक्षकाकरवी करून घेत असे. सरकारी शिक्षण व्यवस्थेत शिक्षक दुरून कोठून नेमला जाई. त्याच्या बदल्या होत. शिक्षक सरकारी नोकर झाला व समाजापासून दुरावला. या शिक्षकाने शिकवायचा अभ्यासक्रमही असाच वर कुठेतरी ठरे. तो ठरवण्यात शिक्षकाचा किंवा स्थानिक जनतेचा काहीच सहभाग नसे. क्रमिक पुस्तके सरकारकडूनच येत. शिक्षक व विद्यार्थी यांच्या लेखी अभ्यासक्रम म्हणजे क्रमिक पुस्तक. बरे, मुले शिकली की नाही, हे ठरवण्याचे काम कोण्या अदृश्य परीक्षामंडलाचे.[२४] या परीक्षेतून विद्यार्थ्याने विषय आत्मसात केला आहे की नाही हे तपासण्याची तरतूद

अगदीच कच्ची. या सर्वामुळे शिक्षणाचा अर्थ क्रमिक पुस्तके पाठ करणे व ती उत्तरपत्रिकेत ओकणे, इतकाच होऊन बसला. इंग्रजी माध्यम, सरकारी नियंत्रण, अधिकाराचे केंद्रीकरण, परीक्षानुवर्ती अध्ययन व अध्यापन हे इंग्रजांच्या शिक्षणपद्धतीचे अंगभूत दोष होते. त्यामुळे ज्ञानार्जन हे शिक्षणाचे ध्येय न राहता परीक्षा घेणे व निकाल लावणे या उपचारापुरते शिक्षण उरले.

इंग्रजी शिक्षण घेतलेल्या ब्राह्मणांना त्या शिक्षणापासून विद्वान झाल्याचे समाधान लाभणार नव्हतेच व ते त्यांना अपेक्षितही नसावे. पण पहिल्या दोन-तीन पिढ्या उलटल्यानंतर त्यांच्या हे ध्यानात येऊ लागले की, आपला व्यावहारिक उत्कर्षही यातून साधत नाही. नोकरीतील महत्त्वाच्या स्थानांपासून आपल्याला डावलण्यात येते. लो. टिळकांनी *ब्राह्मण आणि त्यांची विद्या* या पुस्तकावर अभिप्राय देताना लिहिले होते, "पण एकोणिसाव्या शतकातील सुधारलेल्या ह्या परकी प्रभूची राज्यपद्धती अशी काही विलक्षण आहे की, त्यांनी हिंमतीची, शौर्याची, बुद्धीची, कल्पनेची, कारागिरीची अथवा कर्तबगारीची सर्व कामे आपल्याच हातात ठेविली आहेत. ही त्यांची राज्यपद्धती त्यांनी इतक्या जारीने सुरू ठेविली आहे की, नेटिव्ह हुषार असला तरी त्यास मोठ्या कर्तबगारीचे काम करण्याची संधी कधीच येत नाही. फार लांब कशाला? खुद्द शिवाजी महाराज या काळात जन्मले असते तर त्यांनाही सुभेदार-मेजरपेक्षा वरची जागा मिळाली नसती."[२५]

**रयतेचा आवाज**

परंपरागत समाजात शूद्रातिशूद्रांचा समाज ज्ञानप्रक्रियेपासून वंचित राहिला होता. समाजाचे प्रबोधन विचारांचे अभिसरण झाल्या खेरीज होत नाही. विचारांच्या देवाण-घेवाणीत जितक्या मोठ्या प्रमाणावर माणसे सामील होतील तितक्या प्रमाणात विचारांना ठोस रूप येऊ लागले. युरोपीय समाजात छपाईचा शोध लागला. त्यामुळे ज्ञान समाजातल्या मोठ्या भागापर्यंत पोचू लागले. युरोपात प्रबोधनाचे युग अवतरले त्याचे छपाई हे महत्त्वाचे कारण आहे, तथापि भारतीय समाजाने छपाई स्वीकारली नाही. सोवळ्याओवळ्याच्या कल्पना त्याला कारणीभूत होत्याच पण कदाचित वेदातील ज्ञान शूद्रांना प्राप्त होईल, ही भीतीही त्यात असेल.

इंग्रजांचे राज्य इथे आल्यावर समाजातील जातींच्या उतरंडीला एका धक्का पोचला. इंग्रजी शाळा व महाविद्यालये यांची दारे तत्त्वतः तरी सर्व जातींना उघडी झाली. छपाई लादली गेल्यामुळे विचार व माहिती यांचे अभिसरण शक्य झाले. अशा स्थितीत खरे तर शूद्रातिशूद्रांची फार मोठी उन्नती व्हायला हवी होती, व केवळ मिशनऱ्यांच्याच हातात शिक्षण राहिले असते तर ती बऱ्याच प्रमाणात झालीही असती. तथापि इंग्रजी राजकारणाचा खोडा शिक्षणाच्या पायात बांधला गेला आणि पाटणकरांना अभिप्रेत असलेल्या क्रांतीची चाहूल देखील शूद्रातिशूद्रांपर्यंत पोचली नाही. महात्मा फुल्यांनी हंटर आयोगापुढे केलेल्या निवेदनात बहुजनसमाजाची ही परवड संयत भाषेत पण परिणामकारक रीतीने व्यक्त केली आहे.[२६]

महात्मा फुल्यांची पहिली तक्रार अशी आहे की, सरकार उच्च शिक्षणावर बराच पैसा खर्च करते. पण उच्च शिक्षण फक्त ब्राह्मण व तत्सम जातींपुरते मर्यादित राहिले आहे. हे शिक्षण घेतलेल्या ब्राह्मणांनी निदान प्राथमिक व माध्यमिक शिक्षण रयतेपर्यंत पोचवायला हवे होते. पण ते त्यांनी केले नाही. त्यामुळे रयत ही शिक्षणापासून वंचितच राहिली आहे. त्यातून दुसरी तक्रार पुढे येते ती अशी की, सरकारने साक्षरता व प्राथमिक शिक्षण यांच्यावरही भर दिला पाहिजे. प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक केले पाहिजे. प्राथमिक शाळांतून नेमलेले शिक्षक स्थानिक जनतेच्या इच्छा-आकांक्षाशी व गरजांशी समरस होतील असे हवेत. अभ्यासक्रमात शेती व आरोग्य अशा मूलभूत विषयांचा समावेश केला पाहिजे. प्राथमिक शिक्षकांना पगार फार कमी मिळतो. तो दरमहा किमान १२ रुपये झाला पाहिजे.

पाटणकर म्हणतात त्याप्रमाणे इंग्रज सरकारचा उद्देश केवळ नोकर तयार करावेत इतकाच नसून येथील समाजात आधुनिकतेचा प्रसार व्हावा हाही असता तर त्यांनी साक्षरता आणि प्राथमिक शिक्षण यांचा विस्तार केला असता. पण तसा विस्तार झाला असता तर माध्यमिक व उच्च शिक्षणाचीही वाढ झाली असती. त्याचा परिणाम म्हणजे सरकारी नोकऱ्या मागणाऱ्यांची संख्या वाढली असती. इंग्रजांना येथील अर्थव्यवस्था इंग्लंडच्या अर्थव्यवस्थेच्या वर्चस्वाखाली ठेवायची असल्याने सरकारी नोकऱ्यांखेरीज इतर उद्योगांना वावच नव्हता व सरकारी नोकऱ्यांची संख्या वाढवणे शक्य नव्हते.

त्यामुळे केवळ उच्च शिक्षणच नव्हे तर प्राथमिक शिक्षण सुद्धा संकुचित राहिले होते.

**एक चिंतन-प्रयोग**

'इंग्रजपूर्व महाराष्ट्रीय अडाणी, रानटी नव्हते यात अजिबात शंका नाही' (११९), असे भले उदार प्रमाणपत्र पाटणकरांनी दिले आहे. तथापि मराठी राज्यातली शिक्षणपद्धती नवीन भांडवलशाही अर्थव्यवस्था व राज्यव्यवस्था यांचे आकलन करून घ्यायला व त्या व्यवस्थेत सामील होण्यासाठी लागणारी बौद्धिक कौशल्ये पुरवायला असमर्थ होती, असे ते म्हणतात (१२१).. सारांश प्रजाहितैपी इंग्रज प्रभूने आधुनिक शिक्षण पद्धती येथे आणल्याने आपल्या समाजात आधुनिकतेचा जो काही शिरकाव झाला तो झाला, असे त्यांना सचवावयाचे आहे.

आता आपण एक चिंतन-प्रयोग करू. समजा की, महाराष्ट्रात इंग्रजांचे राज्य आलेच नाही; पण येथील उच्चवर्गाला ही मात्र जाणीव झाली की, या इंग्रजांच्या ठिकाणी काही खुब्या अशा आहेत, की ज्यामुळे ते फार सामर्थ्यशाली झाले आहेत. अशा स्थितीत इंग्रजी समाजातील ही इंगिते त्यांनी कशी आत्मसात केली असती? या चिंतनप्रयोगाला मदत करण्यासाठी एक प्रारूप आपल्याला उपलब्ध आहे. ते म्हणजे जपानचे. १८५३ साली अमेरिकेचा कमोडोर पेरी याने नागासाकी बंदरात जबरदस्तीने प्रवेश करून घेतला. त्यामुळे जपानी राष्ट्र, विशेषतः त्यातील सामुराई हा वर्ग, खडबडून जागा झाला आणि आपल्या सनातन समाजाचे आधुनिकीकरण करण्याचा दृढ निश्चय त्यांनी केला. त्यानंतर अवघ्या पन्नास वर्षांत जपान हे राष्ट्र रशियाच्या आधुनिक आरमाराचा पराभव करण्याइतके प्रबळ झाले.

इंग्रजांच्या कवायती फौजांचा फटका खाल्ल्यानंतर मराठी सरदारांनी फ्रेंच सेनापती आणून आपल्या कवायती फौजा तयार केल्या हा इतिहास आहे. जरूर लागेल त्याप्रमाणे व फायदा दिसेल तितक्या अंदाजाने सनातन समाज आधुनिकता शिकत जातो. या फ्रेंच शिक्षकांकडून आपल्यातले कसबी कारागीर तोफा, तोफगोळे, तोफांची दारू यांची शास्त्रे शिकले असते. जपानी ज्ञानक्षेत्रात पाश्चात्त्य गणिताचा शिरकाव डच शिक्षकांच्या करवी आणि जपानी आरमारी शाळांच्या वाटे झाला[२७] काही काळाने या लष्करी शाळांचे संशोधन संस्थांत व विद्यापीठांत रूपांतर झाले असते.[२८] विकसनशील समाजाला जशी गरज असेल त्याप्रमाणे नवीन ज्ञान आत्मसात करावे लागते. इंग्रजांनी येथील गरजा ध्यानात न घेता ते लादण्याचा प्रयत्न केला.

१९व्या शतकात ज्यांची विज्ञाने झाली होती असे अनेक विषय आपल्या समाजात कला किंवा कौशल्ये या स्वरूपात उपस्थित होते. लोखंडाच्या भट्ट्या घालणे, चुना बनवणे, कागद तयार करणे, देवीची लस टोचणे ही कौशल्ये फार चांगल्या स्वरूपात लोकांना माहीत होती, हे धरमपालांनी दाखवून दिले आहे. त्या कौशल्यांची विज्ञाने झाली नव्हती, कारण त्या कौशल्यांचे भाषेतून विश्लेषण झाले नव्हते. तशी गरजच भासली नव्हती कारण कौशल्य एकाकडून दुसऱ्याकडे प्रत्यक्ष अनुभवातून संक्रांत होत आले होते. युरोपात देखील कौशल्यांचे विज्ञानांत रूपांतर व्हायला १८व्या शतकाचा शेवट उजाडायला लागला. आपल्या संस्कृतीने छापखाना स्वीकारल्यानंतर ही कौशल्ये देशभाषांतून सांगितली गेली असती व मुळात ज्या जाती ही कसबे वापरीत होत्या त्या जाती सुयोग्य मार्गाने ज्ञानाच्या क्षेत्रात आल्या असत्या. इंग्रजी शिक्षणात ही कौशल्ये इंग्रजी भाषेतून ब्राह्मणादी उच्च जातींनी विज्ञानाच्या रूपात हस्तगत केली व जे उद्योग इतर जाती करत होत्या त्यातही ब्राह्मण घुसले!

१९व्या शतकाच्या सुरुवातीला मराठी समाजाला छापखान्याचे महत्त्व कळू लागले होते. १८०५ साली लाकडी ठोकळ्यांच्या सहाय्याने मिरजेला भगवद्‌गीता छापण्यात आली.[२९] तंजावरला मराठी राजाच्या हुकुमाने १८०६ साली 'बालबोध मुक्तावली' हे इसापनीतीचे भाषांतर छापले गेले. यावरून हे स्पष्ट होते की, इंग्रजी राज्य आले नसते तरी छपाईने मराठी समाजात मूळ धरले असते.

इंग्रजांचे राज्य येथे आल्याने आपल्या शिक्षणव्यवहाराचे स्वरूपही इंग्लंडच्या शिक्षणव्यवहाराचे मांडलिक असे झाले. जपानचे तसे झाले नाही. जपानने सुरुवातीला आपले विद्यार्थी इंग्लंडमध्ये शिकायला पाठवले. पण नंतर नवे विद्यार्थी जर्मनीतून शिकून आले व त्यांना विद्यापीठातून प्राध्यापकांच्या नोकऱ्या मिळाल्या. त्यांनी जर्मन विद्यापीठांच्या धर्तीवर संशोधनानुरूप शिक्षण सुरू केले. त्यामुळे १८५७ साली जाग्या झालेल्या जपानातील ताकागी (१८७५-१९६०) या विद्यार्थ्याने १९०३ साली गणितातला नावाजलेला शोधनिबंध



अनुक्रमणिका

प्रसिद्ध केला.[३०] तेथून जपानमध्ये संशोधनाची परंपरा सुरू झाली. आपल्याकडे विद्यापीठातून शिक्षण-संशोधन चालावे अशी व्यवस्थाच नव्हती. पहिला आधुनिक नामांकित गणिती रामानुजनच्या रूपाने १९१९ साली अवतरला. पण त्याला काही इंग्रजी शिक्षणपद्धतीतून तयार झालेला गणिती म्हणता आले नसते व त्याच्या पासून गणित संशोधनाची परंपरा सुरू झाली, असेही म्हणता येत नाही. आपण स्वतंत्र असतो तर आपणही आपल्या स्वभावाशी सुसंगत अशी शिक्षणप्रणाली आपल्या सोईच्या ठिकाणाहून आणली असती व आपल्याला किफायतशीर ठरेल अशा पद्धतीने तिचा विकास घडवला असता.

सरकारी नियंत्रण, अधिकाराचे केंद्रीकरण, एकसाची अभ्यासक्रम, मध्यवर्ती परीक्षा आणि साचेबंद आकृतिबंध या सर्व अंगभूत दोषांनी ग्रस्त अशी परकी शिक्षणपद्धती आपण स्वातंत्र्यानंतरही चालू ठेवली आहे. या शिक्षणपद्धतीच्या संरक्षक कवचात दडून अनेक खाजगी संस्थाचालक विद्यार्थ्यांची व शिक्षकांची पिळवणूक करून दुय्यम दर्जाचे शिक्षण समाजाच्या माथी मारत आहेत. या संस्थाचालकांना रोजगाराच्या बाजारपेठेत उभे केल्याखेरीज त्यांचा भ्रष्टाचार चव्हाट्यावर येणार नाही. माहिती-तंत्रज्ञानाच्या अवतरणानंतर शिक्षणक्षेत्रात पायाभूत बदल करायची निकड भासत आहे. आजवर जे ज्ञान म्हणून समजले गेले ते आता माहिती या स्वरूपात सर्वांना सहज उपलब्ध झाले आहे. त्यामुळे शिक्षण म्हणजे ज्ञाननिर्मिती असे नवीन समीकरण स्थापन होत आहे. अशा मोक्यावर शिक्षणक्षेत्रात प्रतिभेला मुक्त विहार करण्याची परवानगी दिली पाहिजे. त्यासाठी वरील अंगभूत दोषांचे निर्दय शस्त्रक्रिया करून विच्छेदन केले पाहिजे.

**टीपा व आधार**

१. कंसात आलेले आकडे 'अपूर्ण क्रांती' मधील पानांचे आहेत.
२. फाटक, पान २३.
३. फाटक, पान ४५.
४. फाटक, पान ८७.
५. दीक्षित, पान १४.
६. कृष्णकुमार, पान ४३.
७. राजवाडे, पान २६०.
इथे हे नमूद केले पाहिजे की, पाटणकरांनी राजवाड्यांच्या पुस्तकातील मात्र 'कादंबरी' या लेखाचा उल्लेख आपल्या पुस्तकात केला आहे. पण शिक्षणाविषयी राजवाड्यांचा जो महत्त्वाचा लेख आहे त्याची कोणतीच दखल घेतलेली नाही.
८. राजवाडे, पान २६२.
९. प्यारेलाल, पान ४६.
१०. प्यारेलाल, पान ४५.
११. कृष्णकुमार, पान ३४.
१२. याची सविस्तर माहिती कॉप्फ, पान १६० पासून पुढे, इथे मिळेल.
१३. कॉप्फ, पान २४८.
१४. प्यारेलाल, पान ४७.
१५. राजवाडे, पान २९५.
१६. कृष्णकुमार, पान ५४.
१७. फाटक, पान ३७.
१८. टिळक, पान २८८-३०३.
१९. कृष्णकुमार, पान ६०.
२०. फाटक, पान १६.
२१. न्या. मू. रानड्यांच्या आईला आपल्या मुलाला मुंबई शिकविण्यासाठी पाठवण्यात हीच धास्ती वाटत असावी फाटक, पान १४.
२२. कृष्णकुमार, पान ५०.
इथे अर्नोल्डच्या अहवालाचा उल्लेख आहे. त्यात अर्नोल्ड सांगतो की, भारतीयांना आपले नवे शिक्षण पूर्णपणे नापसंत आहे.
२३. टिळक, पान १९९-२००.
२४. कृष्णकुमार, पान ६६.
२५. टिळक, पान २१३-१४.
२६. म. फुले, परिशिष्ट २.
२७. सासाकी, पान १३.
२८. सासाकी, पान २०.
२९. दीक्षित, पान ५, या छापखान्याची मूळ योजना नाना फडणीसाची होती.
३०. सासाकी, पान २२-२३.

अनुक्रमणिका








**आधारग्रंथ**

फाटक - फाटक न.र. : *न्या. मू. रानडे यांचे चरित्र,* सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती, १९६६, नीलकंठ प्रकाशन, पुणे.

दीक्षित - दीक्षित म.श्री. : *एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्र*, टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे.

कृष्णकुमार- कृष्णकुमार : *पोलिटिकल अजेण्डा ऑफ एज्युकेशन*, सेज पब्लिकेशन्स, दिल्ली.

राजवाडे - राजवाडे वि.का : *संकीर्ण लेखसंग्रह*, वरदा बुक्स, पुणे.

प्यारेलाल - प्यारेलाल : *महात्मा गांधी, अर्ली फेज*, खंड १, नवजीवन पब्लिशिंग हाऊस, अहमदाबाद.

कॉप्फ - कॉप्फ : *ब्रिटिश ओरिएंटॅलिझम अॅन्ड बेंगॉल रेनेसान्स*, फर्मा के.एल्. मुखोपाध्याय, कलकत्ता.

टिळक - *लोकमान्य टिळकांचे केसरीतील लेख, भाग ४था*, केसरी-मराठी संस्था, पुणे.

म. फुले - *म. फुले समग्र वाङ्मय*, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृत मंडळ, मुंबई.

सासाकी - सासाकी चिकारा : *दि इंन्ट्रोडक्शन ऑफ वेस्टर्न मथेमॅटिक्स इन मॉडर्न जापान*, युनिव्हर्सिटी ऑफ टोकयो.

धरमपाल - धरमपाल : *सायन्स अॅन्ड टेक्नॉलॉजी इन एटीन्थ सेंचरी इंडिया*, इंपेक्स इंडिया, दिल्ली.




## पत्रव्यवहार

### नर्मदाखोऱ्यातील लढ्याचे पुढचे पाऊल

आपले ऑक्टोबरच्या अंकातील 'नर्मदा खोरे' संदर्भातील लेखन नुकतेच वाचले.

आपल्या मांडणीशी मी सामान्यपणे सहमत आहे. मेधाताईंच्या मुंबईतील उपोषणाच्या वेळी सर्वोदयी नेते श्री. गोविंदराव देशपांडे यांच्यासह मी काही धडपड केली होती. त्यावेळी मेधाताईंना मी एक पत्र तेथेच लिहून प्रत्यक्ष दिले होते. त्याची प्रत माझ्याकडे नाही. त्यांच्याकडे तर नसेलच. त्यात याच स्वरूपाचे मी लिहिले होते. आपली मांडणी अधिक सखोल साक्षेपी आहे.

आपल्या परिशिष्टातील शेवटचे वाक्य 'या कसोटीत त्या शुद्ध सोन्याच्या कसाला उतराव्यात हीच मनोमन प्रार्थना' असे आहे. ही तुमची प्रार्थना 'निर्मिका'ने ऐकली आहे. आताच्या लेखातील शेवटचे वाक्य : 'हे आव्हान अर्थपूर्णरीत्या झेलण्याची क्रांतदर्शी प्रतिभा त्या प्रकट करतील अशी आशा करू या' असे आहे. हे केवळ 'पर्यायीनीती'च्या पुरस्काराचे व नेतृत्वाचे आव्हान नाही. पर्यायी विकासनीतीचेही अनेक पर्याय आहेत व त्याविषयी प्रामाणिक मतभेद होऊ शकतात. हे महामंथन आज जगात सर्वत्र चालू आहे व भारताच्या संदर्भात त्यांची अन्य काही विशिष्ट अंगेही आहेत. या मन्थनातून प्रारंभी कदाचित् विषही निघू शकेल. परंतु तरीही अमृताच्या आशेने ते चालू ठेवणे एवढेच आपण करू शकतो व केले पाहिजे असे मी मानतो. मेधाताईंचे योगदान या मंथनाची एक महत्त्वाची प्रेरक शक्ती आहे. त्यांच्याशी काही मतभेद राखणाऱ्या माझ्यासारख्या अनेक जणांची हीच भावना आहे. तिला आकार यावा.


आपला
**देवदत्त दाभोलकर**

'शांतिनिकेतन',
४३, गुरूकृपा हाऊसिंग सोसायटी,
गोडोली, सातारा.

# शिक्षण, साहित्य आणि वसाहतवाद

हरिश्चंद्र थोरात

– १ –

भिन्न संस्कृती असलेले दोन मानवी समूह एकमेकांच्या निकटच्या संपर्कात आले की त्यांच्या संस्कृतीमध्ये बदल होऊ लागतात. सांस्कृतिक मानववंशशास्त्राच्या परिभाषेत या प्रकारच्या बदलांना 'संस्कृतिसंपर्कामुळे घडून येणारे बदल' (ॲकल्चरेशन')[१] असे म्हणतात. वासाहतिक कालखंडात ब्रिटिश आणि भारतीयांचा निकटचा संपर्क आला. या संपर्कामधून जी परिवर्तने घडून आली त्यांपैकी काहींचा विचार आपल्याला येथे करायचा आहे.

काही गोष्टींची अगोदर नीट मांडणी करून घेण्याची आवश्यकता वाटते.

ब्रिटिश आणि भारतीय यांचा संपर्क दोन्ही पक्षांनी गोडीगुलाबीने स्वीकारलेला, परस्परसामंजस्यातून आकाराला आलेला नव्हता. ब्रिटिश संस्कृतीने आपले अस्तित्व भारतीयांवर लादले होते. या प्रकारच्या संपर्कसंबंधातून भारतीयांच्या सापेक्षतेने होणारा बदल फार मोठ्या प्रमाणात 'लादलेला सांस्कृतिक बदल' होता. भारतीयांच्या संस्कृतीमध्ये ब्रिटिश हेतुपूर्वक हस्तक्षेप करीत होते. या प्रकारच्या हस्तक्षेपामागील हेतू आपले वर्चस्व अबाधित ठेवण्याचे असू शकतात. मात्र ते याच मर्यादेत थांबतात, असे म्हणता येत नाही. ते अधिक गुंतागुंतीचे असू शकतात.

संस्कृतीमध्ये होणारे बदल केवळ संस्कृतिसंपर्कामुळे घडून येतात असे म्हणता येत नाही. परसंस्कृतीचा किंचितसाही संपर्क न येता संस्कृतीमध्ये बदल होत असतात. असे असले तरी, परसंस्कृतीच्या प्रभावापासून पूर्णपणे मुक्त असलेली संस्कृती दाखविणे कठीण जाते. प्राचीन काळापासून विविध संस्कृतींचा एकमेकांवर प्रभाव पडत आहे, त्यामुळे त्यांच्यात बदल होत आहेत. नीट सीमारेषा आखून घेतलेली, विशिष्ट मातीतल्या गुणधर्मांनी जन्माला घातलेली संस्कृती ही जवळजवळ कल्पितकथाच म्हणावी लागेल.

संस्कृतिसंपर्कामधून घडून येणारी बदलाची प्रक्रिया अत्यंत गुंतागुंतीची असते. देणारी संस्कृती आणि घेणारी संस्कृती असे दोन पक्ष कल्पिले तर देणारी संस्कृती देताना द्यायच्या संस्कृतिघटकांची निवड करीत असते ही गोष्ट लक्षात घ्यावी लागते. मात्र निकटच्या संपर्कात या निवडीवर नियंत्रण ठेवणे कठीण जाते आणि देणाऱ्या संस्कृतीच्या, देण्याची इच्छा नसलेल्या गोष्टीही घेणाऱ्या संस्कृतीकडे संक्रमित होऊ शकतात. घेणारी संस्कृती अनेकदा देणाऱ्या संस्कृतीच्या संस्कृतिघटकांचा रूपबंध तेवढा घेते, आशय घेत नाही. विशिष्ट सांस्कृतिक घटकाची उपयुक्तता, त्या संस्कृतिघटकाचे घेणाऱ्या संस्कृतीच्या पर्यावरणाशी जमवून घेणे शक्य असणे, त्या संस्कृतिघटकाला प्राप्त केल्यामुळे मिळणारी प्रतिष्ठा अशा एकमेकांना शह-काटशह देणाऱ्या प्रवृत्ती घेण्याच्या प्रक्रियेमध्ये कार्यरत असतात. यामध्ये उभय संस्कृतींमध्ये असलेले प्रेमाचे-द्वेषाचे संबंध मिसळतात आणि संस्कृतीसंपर्काची प्रक्रिया अधिकच गुंतागुंतीची होते. देणाऱ्या आणि घेणाऱ्या संस्कृतीच्या हेतुपूर्ण निवडीला ती अर्थशून्य करू शकते.

देणारी आणि घेणारी संस्कृती असे दोन पक्ष आपण कल्पिले असले तरी संस्कृती ही गोष्ट आंतरिक सुसंगतीने युक्त असलेली गोष्ट असते असेच केवळ म्हणता येत नाही. ती अनेक अंतर्विरोधांनी, ताणतणावांनी, विविध स्तरांनी आकाराला आलेली गोष्टही असते. संस्कृतीची ही परस्पर-विरोधी दोन रूपे एकत्र उपस्थित असतात. संस्कृतिसंपर्कातून होणाऱ्या बदलाच्या प्रक्रियेमध्ये सहभागी होणारे संस्कृतीचे हे विशिष्ट रूप लक्षात घेतले की, या प्रक्रियेचे स्वरूप समजून घेताना अभिनिवेश बाजूला ठेवण्याची गरज महत्त्वाची ठरते. आक्रमण, वसाहतवाद, साम्राज्यवाद, स्वातंत्र्यलढा यांसारख्या राजकीय संदर्भांचे महत्त्व समजून घेऊन, तथापि, त्या संदर्भांच्या मर्यादेत न राहता, त्यांच्या पलीकडे जात 'संस्कृतिसंपर्कातून होणाऱ्या बदलांचा' विचार करणे आवश्यक आहे.

– २ –

डॉ. रा.भा. पाटणकरांचा *अपूर्ण क्रांती* हा ग्रंथ वाचणे म्हणजे निर्वसाहतीकरणाच्या चर्चेत भाग घेणे होय, असे डॉ.









अनुक्रमणिका

पाटणकरांनीच म्हटले आहे. या चर्चेचे स्वरूप कसे आहे याचे विवेचनही त्यांनी केले आहे. त्याच्याशी मी बव्हंशी सहमत आहे. यामुळेच काही गोष्टींची अगोदर मांडणी करून घेतली आहे. डॉ. पाटणकरांनी या संदर्भातली आपली भूमिका 'आर्थिक परिवर्तन' हा आपल्या ग्रंथाचा पहिला भाग संपवून 'शैक्षणिक स्थित्यंतर' या दुसऱ्या भागाची सुरुवात करताना मांडली आहे. ही वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट आहे. निर्वसाहतीकरणाच्या चर्चेचा रोख समाजाच्या सांस्कृतिक अंगाकडे मोठ्या प्रमाणात असतो, हे यावरून स्पष्ट होते. प्रस्तुतच्या टिपणामध्ये शिक्षण आणि साहित्य ही दोन केंद्रे घेऊन 'संस्कृतिसंपर्कातून होणाऱ्या वदला'चा परामर्श थोडक्यात घ्यायचा आहे. या टिपणाच्या संदर्भात प्राज्ञपाठशाळामंडळाकडून पाठवल्या गेलेल्या पत्रात एक महत्त्वाचे वाक्य आहे. ते असे : "विशेषतः भारतात ब्रिटिशपूर्व काळात येथे दीर्घकाळ सुदृढ स्वरूपात एक समाजव्यवस्था राजकीय-आर्थिक परिमाणांसह कार्यरत होती." ब्रिटिशपूर्व समाजव्यवस्थेबद्दलच्या मूल्यमापनात्मक विश्लेषणाकडे आपल्याला काही काळ तरी दुर्लक्ष करायला हवे. इंग्रजांचे राज्य महाराष्ट्रात प्रस्थापित होण्याअगोदर, म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी किंवा अठराव्या शतकाच्या शेवटी जी शिक्षणव्यवस्था प्रचलित होती ती सुदृढ होतीच असे गृहीत न धरता तिचे स्वरूप काय होते याचा थोडक्यात परिचय आपण करून घेणार आहोत. दुर्दैवाने, याबद्दलचे खास देशी पुरावे उपलब्ध नाहीत. एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी इंग्रजी सत्ता दृढमूल झाल्यावर इंग्रजांनी केलेल्या विविध पाहण्यांच्या आधारावरच आपल्याला ब्रिटिशपूर्व शिक्षणव्यवस्थेचे स्वरूप समजून घ्यावे लागते. शिक्षण या गोष्टीला ब्रिटिशपूर्व देशी शासकांच्या दृष्टिकोणातून कितपत महत्त्व होते, हे यावरून स्पष्ट होते.

माऊंटस्टुअर्ट एल्फिन्स्टनने १८२३ साली पारंपरिक शिक्षणव्यवस्थेची पाहणी करून मुंबई प्रांतातील देशी शाळांची आकडेवारी तयार केली होती. तिच्या आधारावर एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभी देशी शाळांचे जाळे मुंबई राज्यात पसरलेले होते असे म्हणता येते. एल्फिन्स्टनच्या अहवालानुसार मुंबई राज्यात एकूण १५०० शाळा होत्या व त्यांमध्ये ३१००० विद्यार्थी शिकत होते.[२] देशी शाळा या शीर्षकाखाली खरे म्हणजे दोन प्रकारच्या शाळांचा समावेश होतो. त्यातील पहिला प्रकार संस्कृत पाठशाळांचा आहे. संस्कृत, काव्यशास्त्र, तत्त्वज्ञान इत्यादिकांचे उच्च पातळीवरील शिक्षण या शाळांमधून दिले जाई. मात्र या शाळांमध्ये ब्राह्मणांशिवाय इतरांना प्रवेश मिळत नसे. या शाळांची आकडेवारी नीट उपलब्ध नाही. वर उल्लेखिलेल्या १५०० शाळांमध्ये या शाळांची आकडेवारी समाविष्ट नाही. देशी शाळांचा दुसरा प्रकार 'प्राथमिक शाळां'चा होय. या शाळांमध्ये लेखनवाचन, हिशोबठिशोबापुरते अंकगणित, पाढे, पाठांतर असा अभ्यासक्रम असे. मुली आणि अस्पृश्य वगळता जे कोणी फी देऊ शकतील आणि ज्यांना वरील शिक्षण घेणे गरजेचे वाटे ते शाळेत प्रवेश घेऊ शकत. या शाळांना स्वतःच्या इमारती नसत. चावडी, देऊळ, गावातील एखाद्या भल्या माणसांची ओसरी अशा ठिकाणी या शाळा भरत. सरकारचे पाठबळ या शाळांमागे नसे. त्यांचे स्वरूप खाजगी असे. या शाळांमध्ये शिकवला जाणारा अभ्यासक्रम, त्यांमधील शिक्षण याबद्दलची, म्हणजे ब्रिटिशपूर्व शिक्षणव्यवस्थेच्या वर उल्लेखिलेल्या घटकाच्या आशयाची चर्चा डॉ. पाटणकरांनी केली आहे. त्यांनी विशेष चर्चा केली नाही तो भाग शिक्षणाच्या, व वरील 'प्राथमिक शाळां'च्या, विस्ताराचा आहे. आपल्या शैक्षणिक इतिहासामध्ये हा भाग तसा वादग्रस्त ठरलेला आहे.

१८२३ साली एल्फिन्स्टनने या शाळांची पाहणी करून घेतल्याचा उल्लेख वर आला आहे. १८२३ पासून १८८२ पर्यंतची या शाळांची आणि या शाळांमधून शिकणाऱ्या मुलांची संख्या पुढीलप्रमाणे आहे :[३]

| वर्ष | शाळांची संख्या | विद्यार्थ्यांची संख्या |
|---|---|---|
| १८२३ | १,५०० | ३१,००० |
| १८२८ | १,६८० | ३३,००० |
| १८४२ | १,४२० | ३०,००० |
| १८४७ | १,७५१ | ३३,२६७ |
| १८५५ | २,३८६ | ७०,३१४ |
| १८६३ | २,९२१ | ७७,१३७ |
| १८७५ | ३,३३० | ७८,९५२ |
| १८८२ | ३,९५४ | ७८,२०५ |

वरील तक्त्यावरून १८२३ ते १८८२ या काळात देशी प्राथमिक शाळा चांगल्याच लोकप्रिय असाव्यात असे दिसते. सरकारी व सरकारी मदत मिळणाऱ्या शाळांच्या स्पर्धेला तोंड देत त्या टिकून राहिल्या होत्या, या गोष्टीवरून लोकांना त्या उपयुक्त वाटत असाव्यात आणि टिकून राहण्यासारखे त्यांच्यामध्ये काहीतरी असावे, असा अंदाज आपल्याला करता येईल.

काही लोकांच्या मते या देशी शाळांची संख्या पूर्वीपासूनच जास्त असावी. पाहणी करण्याची साधने आणि तंत्रे जसजशी विकसित होत गेली तसतशी त्या शाळांची संख्या वाढल्यासारखी दिसते, एवढेच. १८८२ नंतर शिक्षणखात्याच्या अहवालांमध्ये या शाळांचा वेगळा उल्लेख केला जात नाही. अनधिकृत शाळांच्या संख्येवरून देशी शाळांच्या संख्येचा अंदाज करता येतो, तो असा आहे :[४]

| वर्ष | शाळांची संख्या | विद्यार्थ्यांची संख्या |
|---|---|---|
| १८८१-८२ | ३९५४ | ७८२०५ |
| १८९१-९२ | २४८७ | ५८६०८ |
| १९०१-०२ | २४७० | ६३१९६ |
| १९२१-२२ | ११३९ | २९५०१ |
| १९३६-३७ | ५४२ | २५०१७ |

१८८२ नंतर देशी शाळांची संख्या कमी होत गेलेली दिसते. १९२१-२२ मध्ये ती अत्यंत कमी झालेली दिसते. १९३६-३७च्या आकडेवारीमध्ये सरकारी प्रेरणेने निघालेल्या 'स्पेशल स्कूल्स'चा समावेश आहे. ही गोष्ट लक्षात घेतली तर १९३६-३७ मध्ये देशी शाळा पूर्णपणे नाहिशा झाल्या होत्या असे म्हणायला हरकत नाही.

या शाळांमध्ये दिले जाणारे शिक्षण कसेही असले तरी ब्रिटिशपूर्व महाराष्ट्रामध्ये परंपरेने विकसित झालेली, सर्वसामान्यांच्या उपयोगाची एक शिक्षणव्यवस्था होती हे नाकारता येत नाही. तिच्यामधून शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सरासरीचे प्रमाण त्यावेळच्या इंग्लंडपेक्षा कमी असले तरी अनेक युरोपीय देशांपेक्षा जास्त होते, असे म्हटले गेले आहे.[५] सर्वसामान्यांच्या शिक्षणासाठी या पारंपरिक व्यवस्थेच्या पायावर नवी व्यवस्था उभारली गेली असती तर सर्वसामान्यांमध्ये वेगाने शिक्षणप्रसार झाला असता, असेही मत मांडले गेले आहे. ब्रिटिशप्रणीत शिक्षणव्यवस्थेने या देशी शाळांकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले आणि नवी पर्यायी व्यवस्था उभी करण्याचा प्रयत्न केला. यामुळे काळ, पैसा, श्रम या तिन्ही गोष्टी फार मोठ्या प्रमाणात वाया गेल्या. नुरुल्ला-नाईकांसारख्या शिक्षणेतिहासकारांना याबद्दल खेद वाटतो.[६] निर्वसाहतीकरणाच्या समर्थकांना यामध्ये ब्रिटिश साम्राज्यवाद्यांची कूटनीती दिसणे शक्य आहे.

महत्त्वाचा प्रश्न हा आहे की, या देशी शाळा जगाव्यात, वाढाव्यात, त्यामुळे सर्वसामान्यांमध्ये शिक्षणाचा प्रसार वेगाने होईल, मात्र या शाळांमध्ये योग्य त्या सुधारणा करायला हव्यात, अशी इच्छा असणारे आणि त्या दिशेने प्रयत्न करणारे लोक कोण होते?

या संदर्भात प्रथम एल्फिन्स्टनचे नाव घ्यावे लागते. देशी प्राथमिक शाळांचा सर्वसामान्यांच्या शिक्षणासाठी अत्यंत चांगला उपयोग होईल असे त्याला वाटत होते. या शाळांमध्ये सुधारणा व्हायला हव्यात, त्यांची संख्या अजून वाढवायला हवी अशीही त्याची सूचना होती. देशी शाळा त्याला दोन दृष्टिकोनांतून महत्त्वाच्या वाटत होत्या. एक म्हणजे या शाळांमधून लोकभाषेतून शिक्षण दिले जात होते, दुसरे म्हणजे या शाळा सर्वसामान्यांच्या गरजेतून निर्माण झाल्या होत्या व त्यांच्या उपयोगाच्या होत्या.

१८२४ सालच्या आपल्या 'मिनिट्स'मध्ये एल्फिन्स्टनने हा विचार मांडला होता.[७] त्याला खूप विरोध झाला. त्याच्या सूचना फक्त कागदावर राहिल्या. बॉम्बे नेटिव एज्युकेशन सोसायटीने (१८२०-१८४०) हे काम हातात घ्यायला हवे असे एल्फिन्स्टनला वाटत होते. सोसायटीला ते शक्य झाले नाही.

सर्वसामान्यांच्या शिक्षणाच्या दृष्टिकोणातून देशी शाळांचा कैवार घेणारा एल्फिन्स्टन हा काही अपवादात्मक इंग्रज नव्हता. मद्रास प्रांतात सर टॉमस मन्रो, बंगालमध्ये विल्यम ॲडम्स, वायव्य प्रांताचा लेफ्टनंट गव्हर्नर टोमॅसन आपापल्या प्रांतात एल्फिन्स्टनसारखाच विचार करीत देशी शाळांच्या संवर्धनाचा मुद्दा पुढे रेटण्याचा प्रयत्न करीत होते. झिरप पद्धतीचा पुरस्कार करणाऱ्या आणि सार्वत्रिक शिक्षणाऐवजी वरच्या मोजक्या लोकांना विद्यापीठीय शिक्षण देण्याचे धोरण मांडणाऱ्या अधिकाऱ्यांसमोर वरील लोक पराभूत झाले असले तरी त्यांच्या प्रयत्नाचे मूल्य कमी होत नाही. साम्राज्यशाहीचे आंग्ल हस्तक असूनही ही मंडळी देशी शाळांच्या आणि सार्वत्रिक शिक्षणाच्या बाजूने बोलत होती, ही विशेष महत्त्वाची गोष्ट आहे.

१८५४चा वुडचा खलिताही या दृष्टीने महत्त्वाचा आहे.[८] या खलित्यामध्ये टोमॅसनने देशी शाळांच्या संदर्भात केलेल्या प्रयोगाचा विशेष उल्लेख केला गेला होता. अनुदाने देऊन टोमॅसनच्या पद्धतीने देशी शाळांचा विकास करण्याचे काम सर्वत्र हाती घ्यायला हवे अशी शिफारसही त्यामध्ये केली गेली होती. देशी प्राथमिक शाळा हा राष्ट्रीय शिक्षणाचा पाया ठरायला हवा असे वुडच्या खलित्याला अभिप्रेत होते. असे







अनुक्रमणिका

असूनही शिक्षणखात्याने या शिफारशींकडे आणि या शाळांकडे दुर्लक्ष केले व त्यांना मरू दिले.

एल्फिन्स्टनच्या मिनिट्सपासून ते वुडच्या खलित्यामधल्या शिफारशींपर्यंतचे हे प्रयत्न फक्त कागदावर राहिले असले तरी १८३६ ते १८६५ या कालखंडात देशी प्राथमिक शाळांच्या संदर्भात एक महत्त्वपूर्ण प्रयोग प्रत्यक्षात केला गेला होता. हा प्रयोग लेफ्टनंट रॉबर्ट शॉर्ट्रिड या महसूल खात्यातील अधिकाऱ्यांने केला. शॉर्ट्रिडने देशी पद्धतीच्या शाळा शिक्षण खात्याच्या अखत्यारीत चालू करण्याची योजना तयार केली होती. संपूर्ण मराठी भाषक क्षेत्रात या शाळा सुरू कराव्यात असे त्याचे मत होते.

योजनेचे स्वरूप असे होते : देशी पद्धतीच्या शाळा सरकारने खेड्यापाड्यांतून सुरू कराव्यात. महिन्याला एक आणा फी देणारी मुले जेथे पुरेशा प्रमाणात उपलब्ध होतील तेथे तेथे या शाळा सुरू व्हाव्यात. जमा झालेल्या फीशिवाय सरकारकडून शिक्षकाला रु. ४ ते रु. ८ पर्यंत पगार मिळावा. देशी शाळांची कार्यपद्धती आणि अभ्यासक्रम स्वीकारला जावा. मात्र या शाळांमध्ये मुलींना तसेच खालच्या जाती-जमातींच्या मुलांना प्रवेश घेण्याची मुभा असावी. पारंपरिक देशी शाळांपेक्षा या शाळा एवढ्या बाबतीत वेगळ्या असाव्यात. शॉर्ट्रिडच्या मते सरकारी साहाय्याने उभ्या राहणाऱ्या या शाळा पारंपरिक देशी शाळांच्या तुलनेने स्वस्त होतील. यामुळे शेतकरी, श्रमकरी, खालच्या जातीजमातींना या शिक्षणाचा लाभ घेता येईल.

सरकारने या योजनेला प्रायोगिक तत्त्वावर मान्यता दिली. प्रयोग म्हणून पुणे जिल्ह्यातील पुरंदर तालुक्यात अशा शाळा सुरू करायचे ठरले. हा प्रयोग अत्यंत यशस्वी ठरला. कितीतरी कमी पैशांत तुलनेने बऱ्याच जास्त मुलांना शिक्षण देता येते हे प्रयोगामुळे सिद्ध झाले. खालच्या जातीजमातींच्या मुलांनी या शाळांचा विशेष फायदा घेतल्याचेही लक्षात आले.

हा प्रयोग नीट विकसित झाला असता तर सर्वसामान्यांच्या शिक्षणाच्या दृष्टीने ती चांगली गोष्ट ठरली असती. पण या शाळांच्या वैशिष्ट्यपूर्णतेकडे दुर्लक्ष करण्यात आले. त्या १८६१-६२ नंतर बऱ्याच मोठ्या प्रमाणात बंद करण्यात आल्या. थोड्याफार उरलेल्यांचे नव्या पद्धतीच्या सरकारप्रणीत शाळांमध्ये रूपांतर करण्यात आले.[९]

देशी शाळांचा हा इतिहास पाहिला की, त्यामधील गुंतागुंतीचे भान येऊ लागते. ज्यांना सर्वसामान्य लोकांच्या शिक्षणाची कळवळ होती त्यांनी देशी शाळा तगविण्याचा प्रयत्न केला. झिरप पद्धती नजरेसमोर ठेवून मोजक्याच लोकांना शिकवायला हवे असे वाटणाऱ्या लोकांनी देशी शाळांना विरोध केला. देशी शाळा तगविण्याची भूमिका घेणारे सर्व लोक इंग्रज होते. एतद्देशीय लोकांनी या दिशेने प्रयत्न केल्याचे दिसत नाही. त्यांचा ओढा सरकारप्रणीत शाळांमध्ये प्रवेश घेऊन शिक्षण घेण्याकडे आणि सरकारी प्रारूपावर आधारलेल्या शिक्षणसंस्था स्थापन करण्याकडे होता असेच म्हणावे लागते. सर्वसामान्यांच्या सार्वत्रिक आणि सक्तीच्या शिक्षणाची अस्सल पोटतिडीक असलेले जोतिराव फुलेही देशी शाळांना विशेष अनुकूल होते असे दिसत नाही. त्यांचा देशी शाळांमधील शिक्षकांवर विशेष कटाक्ष दिसतो. ते म्हणतात, "हे शिक्षक प्रायः ब्राह्मणवर्गातील कुचकामी नि टाकाऊ ठरलेले लोक असतात.... उदरनिर्वाहाचा अखेरचा उपाय म्हणून त्यांनी शिक्षकाचा पेशा पत्करलेला असतो. इतर कोणताही उद्योग करण्यात अपेशी ठरल्यामुळे किंवा तेवढी मुळातच पात्रता नसल्यामुळे नाइलाजास्तव त्यांनी शाळा उघडलेल्या असतात."[१०] देशी शाळांमध्ये प्रमाणपत्रित शिक्षकाची नेमणूक झाली नसेल तर त्यांना मुळीच अनुदान देऊ नये, परंतु प्रमाणपत्र मिळवलेले आणि लायक शिक्षक नेमलेले असतील त्यांनाच अनुदान देण्यात यावे अशी विनंती जोतिरावांनी १८८२ च्या हंटर कमिशनला केली होती.

ज्या अर्थी एतद्देशीय लोकांनी देशी शाळांच्या तुलनेत इंग्रजी विद्या देणाऱ्या सरकारप्रणीत शाळांना अधिक प्रतिसाद दिला त्याअर्थी येथील लोकांना अनेकविध कारणांमुळे या शाळा स्वीकारार्ह वाटत होत्या, हे उघड आहे. इंग्रजी पद्धतीचे शिक्षण घेतल्यामुळे सरकारदरबारी नोकऱ्या मिळतात हे त्यांपैकी एक कारण म्हणता येईल. स्वसंस्कृतीतील उणिवा दूर करण्यासाठी तिच्याबद्दल टीकात्मक भूमिका घेण्यासाठी आवश्यक असलेल्या नव्या ज्ञानाची गरज भासणे हे आणखी एक कारण म्हणता येईल. देशी शाळा ज्या परिस्थितीमुळे उपयुक्त वाटत होत्या ती परिस्थितीच वेगाने बदलू लागल्याने त्यांची उपयुक्तता मर्यादित झाली होती हे कारणही विचार करण्यासारखे आहे. मात्र यातील कोठल्यातरी एकाच कारणामुळे वरील गोष्ट घडत होती असे म्हणता येणार नाही.





देशी शाळा या पूर्णपणे व्यावहारिक ज्ञान देणाऱ्या शाळा होत्या. व्यक्तिमत्त्वाच्या उन्नयनाचा आणि व्यापक अर्थाच्या ज्ञानसाधनेचा या शाळांशी काहीच संबंध नव्हता. उच्च शिक्षण देण्याच्या व्यवस्थेशी त्या जोडलेल्या नव्हत्या. व्यवहारापुरते शिक्षण घेऊ पाहणाऱ्या सर्वसामान्यांमध्ये त्या लोकप्रिय असल्या तरी नव्या राजवटीत वरच्या पातळीवर जाण्याची इच्छा असलेल्या अभिजनांच्या दृष्टिकोणातून, तसेच युरोपीय विद्या आणि ज्ञान उपकारक असल्यामुळे शिक्षणाच्या माध्यमातून त्यांचा प्रसार व्हावा असे गंभीरपणे वाटणाऱ्या लोकांच्या दृष्टिकोणातून देशी शाळांपेक्षा नव्या सरकारप्रणीत शाळा अधिक चांगल्या होत्या.

– ३ –

इंग्रजी विद्येचा प्रसार करणाऱ्या नव्या शाळा मोठ्या, मध्यम व लहान शहरांच्या क्षेत्रात वाढत होत्या ही गोष्टही लक्षात घेणे गरजेचे आहे. बॉम्बे नेटिव एज्युकेशन सोसायटीच्या १८२६ सालच्या २४ शाळांपासून निर्माण झालेला प्राथमिक शिक्षणाचा प्रवाह ग्रामीण भागाच्या, खेड्यापाड्यांच्या सीमारेषांबाहेरच थांबत होता. शहरातील मुलांनाच कसावसा झेपणारा महत्त्वाकांक्षी अभ्यासक्रम खेड्यांतील मुलांना नाहीतरी झेपण्यासारखा नव्हता. १८६९-७० साली एका एज्युकेशन इन्स्पेक्टरने लिहिलेला त्याच्या अहवालाचा काही भाग अत्यंत बोलका आहे. त्याचे मराठीतील स्वैर रूपांतर असे : माझ्या यापूर्वीच्या अहवालात मी एका घटनेचे निवेदन केले होते. एका मोठ्या खेड्यातील प्रमुख गृहस्थ शाळेची परीक्षा कशी घेतली जाते हे बराच रस घेऊन पाहत होता. त्याने मला विनंती केली की, शाळेतील शिक्षकांना शाळेत फक्त लेखन-वाचन शिकवण्याचा हुकूम द्या. छापलेली पुस्तके आणि नकाशे वापरू नयेत असे सांगा. या वर्षी एका चांगली कसदार जमीन असलेल्या व भरपूर महसूल भरणाऱ्या खेड्यातील कुलकर्ण्याने मला सांगितले की, जर मी शिक्षकांना केवळ लिहिणे-वाचणेच शिकवण्यास सांगितले तर शाळेतील उपस्थिती तिप्पट होईल. लोकांना 'सरकारी विद्या' नको आहे. 'गावठी विद्या' त्यांना व त्यांच्या मुलाबाळांना पुरेशी आहे. दुसऱ्या एका ठिकाणी खेड्यातील एका जुन्याजाणत्या गृहस्थाने या विषयावर प्रक्षोभक भाषण केले. तो शिक्षणाच्या विरोधात होता. लोकांना आपल्या वाडवडिलांप्रमाणे अशिक्षित राहण्याचे स्वातंत्र्य मिळायला हवे असे त्याचे मत होते. तो म्हणाला की, सरकारच्या मनामध्ये लोकांना शहाणे करण्याची इच्छा निर्माण झाली आहे. युरोप आणि युरोपीयनांच्या बाबतीत हे ठीक आहे. पण आमच्या लोकांची जसे आहोत तसेच राहण्याची इच्छा आहे.[११]

अहवालाच्या वरील उताऱ्यावरून खेड्यापाड्यांतील लोकांची गतानुगतिकता काही प्रमाणात दिसते, असे म्हणता येईल. तथापि, ही प्रतिक्रिया न झेपणाऱ्या अभ्यासक्रमातूनही निर्माण झाली होती हेसुद्धा लक्षात घ्यायला हवे. इंग्रजी विद्या आणि शास्त्र यांच्या प्रसाराच्या प्रेरणेने निघालेल्या नव्या शाळांचा अभ्यासक्रम लहान मुलांना न पेलवणारा व बोजड होता; विशेषतः शिक्षणाची परंपरा नसलेल्या खेड्यापाड्यांतल्या शेतकरी-श्रमकरी लोकांच्या मुलांचा शिकण्याचा आत्मविश्वास खच्ची करणारा होता, यात शंका नाही. प्रा. वासुदेव बळवंत पटवर्धनांनी १९०५ साली लिहिलेल्या पुस्तकात येथील अभ्यासक्रमाची जर्मनीतील अभ्यासक्रमाशी तुलना करीत हीच तक्रार केली आहे.[१२] त्यांना केवळ ग्रामीण भागातीलच नव्हे तर नागर परिसरातील मुलेही अभिप्रेत आहेत.

१८७७-७८ पासून खास ग्रामीण भागासाठी सोपा अभ्यासक्रम तयार करण्यात आला.[१३] काही वर्षे तो लोकप्रियही ठरला. पण हा अभ्यासक्रम स्वीकारणाऱ्या विद्यार्थ्याला 'प्रायमरी स्कूल सर्टिफिकेट परीक्षे'ला बसता येत नसे. ही परीक्षा उत्तीर्ण झाल्याशिवाय मुले सरकारी नोकरी मिळविण्यास पात्र ठरत नसत. त्यांना इंग्रजी शाळेत प्रवेश घेता येत नसल्याने उच्च शिक्षणाच्या दिशेने वाटचालही करता येत नसे. आपण कमी दर्जाचे आहोत अशी भावनाही विद्यार्थ्यांच्या मनात निर्माण होई. ग्रामीण विद्यार्थ्यांसाठी केलेली ही खास सोय शेवटी १९१६-१७ साली काढून घेण्यात आली आणि ग्रामीण आणि शहरी भागांसाठी पुन्हा समान अभ्यासक्रम ठेवण्यात आला. लोकल फंडाचा करभार गोळा होई खेड्यांमधून पण त्याचा विनियोग होई शहरांतील मुलांसाठी, या परिस्थितीत फारसा फरक पडला नाही. १८५४ नंतर इंग्रज सत्ताधाऱ्यांनी फक्त वरच्या मोजक्याच लोकांना शिकवण्याचे व उच्च शिक्षण देण्याचे, झिरप पद्धतीला अभिप्रेत असलेले धोरण सोडून देऊन शिक्षणप्रसाराच्या दिशेने अधिक उदार होत पावले टाकली असली तरी प्रत्यक्षात जे काही घडत होते, ते झिरप पद्धतीला साजेसेच होते.

शिक्षणाच्या माध्यमविषयक परिस्थितीनेही या गोष्टीस हातभार लावला होता. शिक्षणाचे माध्यम कोणते असावे याबद्दलचा वाद येथील शिक्षणाला एकोणिसाव्या शतकापासून वेढून राहिला आहे. १८५५ च्या अगोदर युरोपीय विद्या आणि शास्त्रे यांचा प्रसार करण्याच्या हेतूने दोन प्रकारच्या शाळा निघाल्या होत्या. इंग्लिश शाळा आणि व्हर्नाक्युलर शाळा हे ते दोन प्रकार होत. दोन्ही प्रकारांमध्ये भेद फक्त माध्यमाचा असे. इंग्रजी आणि मराठी माध्यमावरचा हा समान भर पुढे टिकला नाही व एकंदर माध्यमिक आणि उच्च अभ्यासक्रमात इंग्रजीचे प्रभुत्व प्रस्थापित झाले. मराठी, संस्कृत यांसारख्या एतद्देशीय भाषा अभ्यासक्रमात थोड्याफार प्रमाणात राहिल्या ही गोष्ट खरी असली तरी त्यांचे स्थान नगण्य राहिले. इंग्रजीला एवढे महत्त्व प्राप्त झाले की देशी भाषाच नव्हे, तर इतर राहिलेले विषयदेखील तिच्या सावलीखाली झाकोळून गेले. विद्यार्थ्यांच्या अभ्यासाचा एक-तृतीयांश वेळ केवळ इंग्रजीच्या अभ्यासात जाई. इतर विषयांकडे मात्र अक्षम्य दुर्लक्ष होई. एवढा प्रयत्न करूनही महाविद्यालयामध्ये मॅट्रिक्युलेशनची परीक्षा उत्तीर्ण होऊन प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांचे इंग्रजी कच्चे असे व तेथे होणारी व्याख्याने त्यांना नीट समजत नसत, अशी तक्रार उच्चपदस्थांनी केलेली ऐकू येई.[१४] मॅट्रिक्युलेशन किंवा पुढे महाविद्यालयाच्या परीक्षा यांमध्ये नापासांची संख्या खूप जास्त असे याचे महत्त्वाचे कारण इंग्रजी हा विषय आणि इंग्रजी माध्यम हे असे. इंग्रजीवर द्याव्या लागणाऱ्या अवास्तव भरामुळे या काळातील समतोल पूर्णपणे बिघडला होता, तो अजूनही सावरला गेला आहे असे म्हणता येणार नाही. शिकण्याची इच्छा असलेले आणि चांगली बुद्धिमत्ता असलेले विद्यार्थी इंग्रजीच्या कसोटीला उतरले तरच पुढे सरकू शकत असत.

१८५४ साली शिक्षणखात्याची स्थापना झाल्यावर 'परीक्षा' या गोष्टीला अतीव महत्त्व प्राप्त झाले. मॅट्रिक्युलेशन, स्कूल फायनल, पब्लिक सर्व्हिस, स्कूल लिव्हिंग सर्टिफिकेट, लोकशाळा परीक्षा अशा अनेक परीक्षांनी शिक्षणाचे क्षेत्र व्यापले होते. पदवी-परीक्षेचा तर आणखीच मोठा डौल असे. विद्यार्थ्यांना नापास करण्यासाठी वेगवेगळी कारणे शोधली जात, असे वाटण्याइतपत परिस्थिती असे. मॅट्रिक्युलेशनची परीक्षा तर विद्यार्थ्यांचा अंत पाहणारी असे, असे दिसते. ही परीक्षा पास होणे म्हणजे इंग्लिश खाडी पोहून जाणेच होय असा एक करुण विनोदही त्या काळी प्रचारात होता. प्रा. वा.ब. पटवर्धनांनी म्हटले आहे, "आमच्या मुलांची शरीरे वठून आणि डोकी पिकून गेलेली आम्ही आमच्या डोळ्यांनी पाहतो. जिवापाड मेहनत करून परीक्षेत आमची मुले शेकडा सासष्टांनी नापास झालेली आम्ही पाहतो. जर्मनीत, इंग्लडात, अमेरिकेत जेवढी ज्ञानाची पुंजी मिळवावयाला पाच किंवा सहा वर्षांपेक्षा अधिक काळ लागत नाही तेवढी ज्ञानाची तर नाहीच, पण ज्ञानहीन शब्दांची पुंजी मिळवावयाला आमच्या मुलांची निदान अकरा वर्षे वेचलेली आम्हांस दिसतात; आम्ही याचा विचार करीत नाही!"[१५] परीक्षेसाठी जी वेठबिगार करावी लागे त्यात विद्यार्थ्यांचे व्यक्तिमत्त्व, स्वतंत्रपणे विचार करण्याची क्षमता कितपत वहरत असेल याची कल्पनाच केलेली बरी. आणि या सर्वांच्या मागे उद्देश कोणता होता हे १८७९ च्या पदवीदान समारंभप्रसंगी दिलेल्या कुलगुरूंच्या अभिभाषणामधून सुस्पष्टपणे व्यक्त झाले आहे. कुलगुरू म्हणाले होते, 'It will be seen that while in the first ten years the ratio of successful students was about one-fourth, the same proportion has been maintained during the succeeding eight years. Our great object has been to prevent in the first place matriculation and afterwards the attainment of degrees being made too easy. We have preferred comparatively a few highly trained men to a multitude of an inferior quality."[१६] पदवी मिळवणे सोपे ठेवायचे नाही याचे कारण आपल्याला उत्तम बुद्धीचे व प्रशिक्षित असे थोडेच लोक हवे आहेत. खरे म्हणजे आपली गरज जास्त नाही म्हणून गरजेपेक्षा जास्त लोकांना रांगेबाहेर ढकलून देण्याचाच हा प्रकार होता. डॉ. पाटणकरांनी म्हटल्याप्रमाणे, शिक्षणाविषयी विशेष आच असलेले विद्यार्थीच फक्त उच्च शिक्षणसंस्थांत प्रवेश घेत, असे दिसत नाही. शिक्षणाविषयी विशेष आच असलेल्या विद्यार्थ्यांनाही उच्च शिक्षणाच्या क्षेत्रात प्रवेश मिळू नये यासाठीची व्यवस्था कार्यरत होती, असे एकूण चित्रावरून वाटते.

सरकारी नोकऱ्या मिळवणे आणि त्या क्षेत्रातील विविध पातळ्यांवरील नोकऱ्यांसाठी उमेदवार तयार करणे हादेखील या काळच्या शिक्षणव्यवस्थेचा एक महत्त्वाचा विशेष होता.

प्राथमिक शालान्त परीक्षेच्या नावाचा केवळ इतिहास पाहिला तरी ही गोष्ट लक्षात येते. १८६६ साली या परीक्षेचे नाव 'पब्लिक सर्व्हिस सर्टिफिकेट एक्झामिनेशन (सेकन्ड क्लास)' असे होते. १८८७ मध्ये तिचे नाव 'पब्लिक सर्व्हिस सर्टिफिकेट एक्झामिनेशन (थर्ड ग्रेड)' असे झाले. १९०४-०५ मध्ये तिचे नाव 'पब्लिक सर्व्हिस सर्टिफिकेट (व्हर्नाक्युलर एक्झामिनेशन)' असे बदलण्यात आले. सरकारी नोकरीमध्ये विशेष पदे रिकामी नाहीत अशी परिस्थिती निर्माण झाल्यावर विद्यार्थ्यांची संख्या रोडावल्याचेही या कालखंडात दिसून येते. असे होऊ नये म्हणून सरकार अतिरिक्त पदांची निर्मितीही करताना दिसते.[१७] या उद्दिष्टांचा आणि युरोपीय विद्या व शास्त्रे यांच्या प्रसाराचा काहीही संबंध नाही हे उघड आहे.

– ४ –

ब्रिटिश कालखंडातील शिक्षणविषयक चित्रामधून कोणकोणत्या गोष्टी स्पष्ट होतात याचा आता आढावा घेऊया.

अ) प्रजेला शिक्षण देणे ही सरकारची जबाबदारी आहे ही गोष्ट इंग्रजांना मान्य होती. त्यांनी अनेकदा अंगचोरपणा केला असेल, टाचकी उद्दिष्टे नजरेसमोर ठेवली असतील, स्वतःच्या सोयीकडे अधिक लक्ष दिले असेल; पण 'शिक्षण देण्याची जबाबदारी सरकारची नाही' असे म्हटलेले नाही. ब्रिटिशपूर्व देशी शासकांच्या तुलनेत इंग्रजांचा हा वेगळेपणा उठून दिसतो. त्यांनी सरकार म्हणून प्रजेच्या शिक्षणाची जबाबदारी स्वीकारली नव्हती.

आ) येथील पारंपरिक शिक्षणव्यवस्था इंग्रजी पद्धतीच्या नव्या शिक्षणामुळे नष्ट झाली. तिच्या पायावर सार्वत्रिक शिक्षणाचा इमला उभारता आला असता, असे अनेकांचे मत आहे. बदललेल्या परिस्थितीत या इमल्यात पायामधले नेमके काय येऊ शकले असते? बहुधा काहीही नाही. काहीही असो. देशी शाळांबद्दलचे मूल्यमापन हा वादग्रस्त प्रश्न आहे. त्या शाळा जपण्याचा प्रयत्न फक्त इंग्रजांनीच केला होता ही गोष्ट मात्र वादातीत आहे.

इ) नवीन पद्धतीचे शिक्षण येथील समाजधुरिणांना आणि बव्हंश सर्वसामान्यांना स्वीकारार्ह वाटले. ग्रामीण भागात या शिक्षणाविषयी प्रारंभी रोष असला तरी नंतरच्या काळात तो क्रमाक्रमाने नाहिसा झालेला दिसतो. बाळशास्त्री जांभेकर, लोकहितवादी, जोतिराव फुले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, न्या. रानडे, गोपाळराव गोखले, लोकमान्य टिळक, गोपाळराव आगरकर यांसारख्या विविध प्रवृत्तींच्या विचारवंतांनी या शिक्षणाचे स्वागत केले. यांपैकी बहुतेक या पद्धतीच्या शिक्षणव्यवस्थेमधूनच तयार झाले होते. याला अपवाद करायचा झाल्यास प्रामुख्याने महात्मा गांधींचा करायला हवा. महात्मा गांधींनी स्वतः इंग्रजी पद्धतीचे शिक्षण घेतलेले असले तरी या पद्धतीच्या शिक्षणाला आणि त्यामागे असलेल्या 'आधुनिकते'च्या विश्वभानाला त्यांनी १९०९-१० साली लिहिलेल्या *हिंद स्वराज्य* मध्ये ठामपणे विरोध केला आहे.[१८] हे शिक्षण त्यांना खोटे शिक्षण वाटत असे. मन, संकल्पशक्ती आणि इच्छा या गोष्टींना वळण लावते ते खरे शिक्षण असे त्यांचे मत होते. इंग्रजी शिक्षणामुळे हे साधत नाही अशी त्यांची धारणा होती. महात्मा गांधींचे *हिंद स्वराज्य* मधील विचार वाचून १८६९-७० साली वर उल्लेखिलेल्या एज्युकेशनल इन्स्पेक्टरला भेटलेल्या खेड्यांमधील पाटील-कुलकर्ण्यांची आठवण येते. *हिंद स्वराज्य* मधील गांधीजींना विज्ञानाचे शिक्षण अनावश्यक वाटते. इन्स्पेक्टरच्या अहवालातील पाटील-कुलकर्णी खेड्यांतील विद्यार्थ्यांना फक्त लिहिणे-वाचणे शिकवले तरी पुरे असे म्हणतात. गांधीजी ग्रामीण लोकांच्या बाबतीत तेवढेही गरजेचे मानत नाहीत. गांधीजींचा इंग्रजीच्या वर्चस्वाला प्रखर विरोध आहे. गांधीजींना 'आधुनिक' शिक्षणापेक्षा पारंपरिक शिक्षण अधिक स्वीकारार्ह वाटत होते. त्यातही त्यांचा धार्मिक-नीतिशिक्षणावर विशेष भर होता. चारित्र्याची उभारणी त्याच शिक्षणामधून होईल असे त्यांचे मत होते.

महात्मा गांधींच्या नजरेसमोरील भविष्यातील भारत पाश्चात्त्य वळणाच्या आधुनिकतेपासून मुक्त असलेला भारत होता. पारतंत्र्याच्या काळात या आधुनिकतेचा झालेला संसर्ग पूर्णपणे नष्ट झाल्याशिवाय भारताला खरेखुरे स्वातंत्र्य मिळणार नाही अशी त्यांची भूमिका होती. एका प्रकारे संस्कृतीच्या शुद्धीकरणाचा प्रकल्प त्यांच्या नजरेसमोर होता.

दक्षिण आफ्रिकेत असल्यापासून 'फिनिक्स स्कूल', 'टॉलस्टॉय फार्म' यांसारखे शिक्षणविषयक प्रयोग गांधीजींनी केले होते. ते छोट्या प्रमाणावरचे होते. १९३७ साली 'मूलभूत शिक्षणा'ची योजना गांधीजींनी राष्ट्रासमोर मांडली. *हिंद स्वराज्य*च्या तुलनेने ती अधिक व्यावहारिक होती. मुंबई सरकारने हा प्रयोग सरकारी पातळीवर करून पाहायचे ठरवले.

'मूलभूत शिक्षण' देणाऱ्या शाळांमध्ये उपयुक्त कलाकौशल्यांवर, भोवतालच्या पर्यावरणावर, विविध सामाजिक उपक्रमांवर भर असे. भूगोल, गणित आणि विज्ञान हे विषय असत, पण ते उपयुक्त कौशल्यांशी जोडलेले असत. इतर प्राथमिक शाळा आणि 'मूलभूत शिक्षण' देणाऱ्या शाळा यांच्यातील अंतर कमी करण्याचा प्रयत्न स्वातंत्र्योत्तर काळातील मुंबई सरकारने केला. या प्रयत्नात कोणी कोणाला नष्ट केले याचा इतिहास सर्वज्ञात आहे.

ई) इंग्रजी विद्या व शास्त्रांचा प्रसार हे इंग्रजप्रणीत शिक्षणाचे महत्त्वाचे उद्दिष्ट होते हे प्रथमपासून स्पष्ट होते. शिक्षणविषयक संयोजनातून अशी काही परिस्थिती निर्माण झालेली दिसते की तिच्यामुळे या उद्दिष्टाच्या परिपूर्तीस अडथळाच यावा. माध्यम, झिरप पद्धती, परीक्षापद्धती यांसारख्या घटकांनी प्रारंभापासून या उद्दिष्टाला पोखरलेले दिसते. डॉ. पाटणकरांच्या क्रांतीच्या भाषेत बोलायचे झाल्यास ही 'सुरू न झालेली क्रांती' होती. तथापि, हे उद्दिष्ट साधण्याच्या जेमतेम प्रयत्नांतून विज्ञाननिष्ठ, इहप्रवण, व्यक्तिवादी विश्वभानाचे जे कवडसे पोहोचले, त्याचे जाणत्या एतद्देशीयांनी मनःपूर्वक स्वागत केल्याचे दिसते. स्वसंस्कृतीची समीक्षा करण्याचे साधन या विश्वभानातून त्यांना प्राप्त झाले.

उ) इंग्रजी पद्धतीच्या शिक्षणाचा येथील संस्कृतीवर महत्त्वाचा परिणाम झाला. या शिक्षणव्यवस्थेला अभिप्रेत असलेल्या झिरप पद्धतीमुळे शिक्षणाचे फायदे थोड्याच लोकांपुरते मर्यादित राहिले व त्यातूनच उच्चशिक्षित विचारवंतांचा वर्ग निर्माण झाला. याच वर्गाने पुढे स्वातंत्र्य-लढ्याचे पुढारीपण केले. इंग्रजी शिक्षणव्यवस्थेतून निर्माण झालेल्या मूल्यव्यवस्थेमुळे तळागाळातील लोकांवरही परिणाम झाल्याचे दिसते. इंग्रजी शिक्षणव्यवस्थेबरोबर आलेल्या स्वातंत्र्य, समता यांसारख्या मूल्यांनी या वर्गामध्ये अस्मितेची जाणीव निर्माण केली. फुले, आंबेडकर हे सर्वार्थाने 'आधुनिक' विचारवंत होते. आधुनिकतेला वसाहतवादाची लादलेली देणगी म्हणायचे असेल तर फुले, रानडे, आगरकर, आंबेडकर या 'आधुनिक' विचारवंतांचे काय करायचे याचा निर्णय आपण घ्यायला हवा. मात्र याच शिक्षणव्यवस्थेने थोडे उच्चशिक्षित विचारवंत व जास्त अशिक्षित सर्वसामान्य निर्माण करून या दोन वर्गांमध्ये मोठी दरी निर्माण केली. विचारवंत निर्माण करणारा समाज आपल्याकडे यामुळेच निर्माण झाला नाही. विचारवंत ही जमात आपल्याकडे अपवाद आणि आश्चर्य म्हणूनच जन्माला येऊ लागली. या क्षेत्रातली सलग परंपरा यामुळेच आपल्याला निर्माण करता आली नाही.

ऊ) डॉ. रा.भा. पाटणकरांनी म्हटले आहे."इंग्रजांच्या दृष्टीने पाहता त्यांना मिळालेल्या शिक्षणाचा रोख येथील लोकांना भांडवलदारी समाजाचे नागरिक बनविणे हा होता, इंग्रजी साम्राज्याचे स्तुतिपाठक बनविणे हा नव्हता. येथे भांडवलदारी अर्थव्यवस्था व तिची मूल्यव्यवस्था प्रस्थापित होणे हे औद्योगिक भांडवलदारीच्या अवस्थेतील इंग्रजांच्याही निदान काही काळ सोयीचे होते." डॉ. पाटणकरांच्या विवेचनात इंग्लंडच्या औद्योगिक भांडवलदारीच्या अवस्थेत असण्याला बऱ्यापैकी महत्त्व आहे.

प्रत्यक्षात इंग्रजांनी प्रचारात आणलेले नव्या पद्धतीचे शिक्षण पाहिले तर ते 'औद्योगिक भांडवलदारी'चे वातावरण निर्माण करण्यात कितपत उपयुक्त ठरू शकले असेल याबद्दल शंका येऊ लागते. हे शिक्षण प्राथमिक पातळीपासून विद्यापीठीय स्तरापर्यंत प्रामुख्याने अकादमिक स्वरूपाचे होते. प्रत्यक्ष व्यवहारापेक्षा पुस्तकीपणाला आणि मूर्त पातळीवरील उत्पादनापेक्षा अमूर्त पातळीवरील ज्ञानव्यवहाराला या शिक्षणात कळीचे महत्त्व होते. पाठ्यपुस्तके, परीक्षा, विविध विषय, त्यांचे नेमकेपणाने युक्त असलेले आकलन या गोष्टी येथे महत्त्वाच्या ठरत. या प्रकारचे ज्ञान संपादन करून या शिक्षणव्यवस्थेच्या अंतिम टोकापर्यंत पोहोचलेली व्यक्ती स्वतःला सर्वसामान्यांहून श्रेष्ठ समजणारी होई. तिच्यामध्ये नेतृत्वाचे गुण निर्माण होत. लोकव्यवहाराला वळण लावून त्यांच्यावर नियंत्रण करण्याची कला या व्यक्तीला प्राप्त होई. ती अधिक सुसंस्कृत होई असेही आपण म्हणू शकू. या सर्व प्रक्रियेमधून अभिजनांची निर्मिती होत असे, असे आपल्याला म्हणता येईल. या वर्गापैकी उत्तम दर्जाचा माणूस सरकारी खात्यात उच्च पदावर नोकरी करणारा किंवा वकिली, प्राध्यापकी यांसारखा व्यवसाय करणारा, मोकळ्या वेळेत ज्ञानार्जन करणारा, स्वतःला अधिक सुसंस्कृत करत राहणारा आणि सर्वसामान्यांच्या उद्धाराचा मनःपूर्वक प्रयत्न करणारा असे. याच वर्गातील उत्तम दर्जा नसलेला माणूस स्वतःला श्रेष्ठ समजून आपल्याच लोकांपासून तोडून घेणारा, कारकुनी स्वरूपाचेच काम करू शकेल असा, इंग्रजांच्या संस्कृतीच्या वरवरच्या आकाराचे अनुकरण करण्यात धन्यता मानणारा

होत असे. मात्र या दोहोंपैकी एकाहीमध्ये अंग मोडून मेहनत कराव्या लागणाऱ्या प्रत्यक्ष उत्पादनाच्या क्षेत्रात प्रवेश करण्याची इच्छा नसे.

इंग्रजांनी सुरू केलेल्या शिक्षणव्यवस्थेच्या पाठीमागील प्रेरणा खरोखरच औद्योगिक भांडवलशाहीची होती का या गोष्टीची चौकशी महत्त्वाची ठरते. साम्राज्यवादाच्या संदर्भात इंग्लंडमध्ये प्रभावी ठरलेला आणि धोरणात्मक निर्णय घेणारा वर्ग कोणता होता? इंग्लंडमधले, तसेच शासक म्हणून भारतात येणारे लोक तेथील 'जंटलमन' वर्गातून आलेले होते. इंग्लंडमध्ये जंटलमन जन्माला येई तसाच तयारही होई. सतराव्या शतकात तो अभिजन जमीनदारीशी संबंधित होता. नव्याने जन्माला येऊ पाहणाऱ्या भांडवलदारीमध्ये तो सक्रिय सहभागी झाला होता. पण पैसा मिळवण्यासाठी काम करणे जंटलमनपणाच्या चौकटीत बसण्यासारखे नव्हते. औद्योगिक भांडवलदारींपासून सुरक्षित अंतर राखत या वर्गाने धोरणात्मक दृष्ट्या महत्त्वाच्या जागा अडवल्या होत्या. राजकारणावर या वर्गाचा पूर्वीपासून प्रभाव होताच, आता बँकिंग, सर्विस सेक्टर, नोकरशाहीमधील अत्युच्च पातळीवरील पदे या क्षेत्रांतही या वर्गाने प्रवेश केला. याच काळात जंटलमनची पुनर्व्याख्या होऊ लागली होती. ज्यांच्याजवळ पारंपरिक जमीनदारी नाही त्यांना जंटलमन होता येऊ लागले. मात्र त्यासाठी पब्लिक स्कूलमधले आणि विद्यापीठामधले शिक्षण अपरिहार्य ठरत होते. कर्तव्य, शिस्त व निष्ठा या मूल्यांच्या उपयुक्ततावादाशी घातलेल्या जोडणीतून हे शिक्षण आकाराला आले होते. हे शिक्षण घेऊन जंटलमन झालेला वर्ग राजकारणात, फायनान्स आणि सर्व्हिस क्षेत्रांत, तसेच आय.सी.एस. होऊन भारतात येत असे.[१९] भारताविषयीचे धोरणात्मक निर्णय घेण्यात त्याचा महत्त्वाचा भाग असे. या वर्गावर जेव्हा पारंपरिक जमीनदारांचा प्रभाव होता तेव्हा बंगालमध्ये स्वतःशी समकक्ष असा जमीनदारांचा वर्ग निर्माण करण्याचा प्रयत्न इंग्रजांनी केला होता. या वर्गावर पब्लिक स्कूलमध्ये तसेच विद्यापीठांत शिक्षण घेऊन नव्याने जंटलमन झालेल्या आणि उत्पादनाशी अप्रत्यक्ष संबंध ठेवणाऱ्या 'जंटलमनली कॅपिटॅलिस्ट्स'चा प्रभाव वाढू लागला तेव्हा स्वतःशी समकक्ष असणारा भारतीय 'सभ्य गृहस्थां'चा वर्ग निर्माण व्हावा, असे त्यांना वाटू लागले. इंग्रजांनी निर्माण केलेली शिक्षणव्यवस्था प्रामुख्याने अकादमिक स्वरूपाची राहिली यामागे या प्रेरणा असाव्यात, असे म्हणता येईल.

इंग्रजी शिक्षणामागील ही महत्त्वाकांक्षा कितपत फलद्रूप झाली? रानडे, गोखले, दादाभाई नौरोजी यांसारख्या मोजक्या लोकांवर भर दिला तर ती फार मोठ्या प्रमाणात फलद्रूप होऊ लागली होती, असे म्हणता येते. मात्र असे लोक वगळले तर दुय्यम दर्जाचे कारकून या शिक्षणव्यवस्थेने निर्माण केले असे म्हणावे लागेल. अनेक इंग्रज अधिकाऱ्यांना या गोष्टीची चांगलीच जाणीव होती आणि या वस्तुस्थितीचा त्यांना खेदही वाटत असे.[२०]

– ५ –

ब्रिटिश सत्तेच्या कालखंडातील शिक्षणाकडून आता आपल्याला याच कालखंडातील साहित्याच्या क्षेत्राकडे वळायचे आहे. शिक्षणव्यवस्था हे एक सुसंघटित करण्याजोगे संस्थात्मक साधन असल्यामुळे सरकारला तिच्यावर नियंत्रण मिळवणे सोपे असते. शिक्षणव्यवस्था हातात घेऊन तिच्यामधून आपल्याला हवे तसे उत्पादन बाहेर पडेल याची काळजी सरकारला बऱ्याच सहजतेने घेता येते. साहित्यादी कलांच्या बाबतीत असे करणे तुलनेने अवघड असते. ते अगदीच अशक्य असते असे म्हणता येणार नाही. लेखकांनी काय लिहावे यावर सत्ताधाऱ्यांनी नियंत्रणे घातल्याची व त्यासाठी संस्थात्मक यंत्रणा उभारल्याची उदाहरणे जगाच्या इतिहासात सापडतात. वसाहतवादाने निर्माण केलेल्या परिस्थितीमुळे देशी भाषा मुळापासून नष्ट झाल्याची उदाहरणेही आपण पाहतो. लोकांच्या स्वभाषेतील व्यवहाराला खीळ घालण्यासाठी आणि त्या भाषेतील सांस्कृतिक संचितापासून लोकांना तोडण्यासाठी देशी भाषांमधील ग्रंथांची होळी केल्याचेही आपल्याला दिसते. महाराष्ट्रात इंग्रजांनी एवढे टोकाला जात काही केल्याचे दिसत नाही. राजकीय असंतोषाला कारणीभूत ठरू शकतील अशा साहित्यकृतींवर त्यांनी बंदी आणली असेल, चळवळ्या संपादकांना दीर्घ मुदतीच्या शिक्षा दिल्या असतील. मराठी भाषेत उत्तम दर्जाचे साहित्यच नाही, अशा वल्गना केल्या असतील. परंतु देशी भाषेत साहित्यव्यवहार होऊच नये असे प्रयत्न त्यांनी केलेले दिसत नाहीत. उलट देशी भाषेतील साहित्याला त्यांनी उत्तेजनच दिलेले दिसते. असे उत्तेजन देऊन साहित्यव्यवहार आपल्याला हवा त्या दिशेने वळविण्याचा प्रयत्न त्यांना करायचा होता, असे एकवेळ म्हणता येईल. ते त्यांना कितपत साधले याची चौकशी



अनुक्रमणिका

आपल्याला करता येईल. साहित्याच्या संदर्भातील इंग्रजांचे एकूण वर्तन पाहिले तर त्यांनी या व्यवहारावर प्रत्यक्ष नियंत्रण मिळवण्याचा फारसा प्रयत्न केला नाही असे म्हणावे लागते.

या संदर्भात काही प्रश्न विचारून त्यांची उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करावा लागेल. मेकॉलेच्या अगोदरपासून इंग्रजी भाषेला इंग्रजांनी शिक्षणव्यवस्थेत महत्त्वाचे स्थान देण्याचा प्रयत्न केला होता. या प्रयत्नांमुळे इंग्रजी भाषा येथील लोकांच्या सर्व प्रकारच्या आविष्कारांचे माध्यम झाली का? इंग्रजांनी शिक्षण सार्वत्रिक न केल्यामुळे तिचा प्रसार फक्त सुशिक्षितांपुरता मर्यादित राहिला व सर्वसामान्य माणूस इंग्रजीच्या प्रभावापासून मुक्त राहिला. यामुळे मराठी टिकली असा युक्तिवाद करता येईल. पण तो टिकणार नाही. इंग्रजी सत्तेच्या काळात मराठीत लिहिणारे लोक इंग्रजी शिकलेले होते. मराठीत लिहिणे हे आपले नैतिक कर्तव्य आहे असे समजून त्यांच्यातील बहुतेकांनी मराठीतून लेखन केलेले दिसते.

इंग्रज राज्यकर्ते असताना मराठीतील साहित्यव्यवहार बंद पडला का? तर, तसेही म्हणता येत नाही. या व्यवहारामध्ये आमूलाग्र परिवर्तन झाले असे आपल्याला म्हणता येईल. त्याला वेगळी परिमाणे प्राप्त झाली. त्याच्यावर इंग्रजी साहित्याचा तसेच इंग्रजी राज्यामुळे निर्माण झालेल्या परिस्थितीचा परिणाम झाला. पारंपरिक साहित्याशी असलेले त्याचे नाते बदलले. पण हा व्यवहार चालू राहिला.

वसाहतवादी यंत्रणा आपली भाषा, साहित्य आणि संस्कृती लादण्याचा आटोकाट प्रयत्न करू लागली की, प्रतिक्रिया म्हणून वसाहतीमधील माणूस आपल्या भाषेकडे, तिच्यातील साहित्यपरंपरेकडे अधिक खेंचला जातो; वसाहतवादी दृष्टिकोणातून अशिष्ट समजले जाणारे साहित्य तो निर्माण करतो, असे फ्रांत्झ फनां यांनी म्हटले आहे. या साहित्याला ते 'कॉम्बॅट लिटरेचर' म्हणतात.[११] असे साहित्य मराठीत निर्माण झाले का? मराठीत नसले तरी इतर भारतीय भाषांमध्ये तरी झाले का? मराठीच्या बाबतीत तरी या प्रश्नाचे उत्तर 'नाही' असे आहे. असे का झाले असावे? एकतर सर्व मराठी माणसे स्वाभिमानशून्य असावीत किंवा वसाहतवादी यंत्रणेने तिची संस्कृती लादण्याचा आटोकाट प्रयत्न केला नसावा. काहीही असो, येथे मराठीत साहित्यव्यवहार चालू राहिला व या व्यवहारावर इंग्रजी संस्कृतीचे महत्त्वाचे परिणाम झाले, हे मान्य करावे लागते.

या परिणामांकडे वळण्याअगोदर ब्रिटिशपूर्व महाराष्ट्रातील साहित्याचे स्वरूप समजून घेणे आवश्यक आहे. ब्रिटिशपूर्व महाराष्ट्रात शिक्षणव्यवस्था अस्तित्वात होती, तशीच साहित्याची परंपराही अस्तित्वात होती. या परंपरेचे वर्णन समृद्ध परंपरा असे करता यावे इतकी ती विकसित होती. चक्रधर-ज्ञानेश्वरांपासून ती सुरू झाली होती आणि मोरोपंत, रामजोशी-पर्यंत येऊन पोहोचली होती. तिच्यामध्ये एक प्रकारची सलगता होती. याअर्थी की रामजोशी-मोरोपंतांना तुकाराम-ज्ञानदेव ठाऊक होते. त्यांच्या खांद्यावर आपण उभे आहोत याचे भान त्यांना होते. असे असले तरी संतसाहित्याचा प्रभाव कमी झाला होता. वारकरी आषाढी कार्तिकीला पंढरीला जात होते. कीर्तने होत होती. भारुडे होत होती. त्यांमधून संतांचे अभंग, गौळणी, भारुडे म्हटली जात होती. पण त्या प्रकारची नवी रचना करणारे संत जन्माला येणे थांबले होते. तुकाराम-निळोबांपर्यंत जी काही निर्मिती झाली होती तेवढ्या संचितावर काम भागवले जात होते. संतकवितेला धर्माचे, अध्यात्मिकतेचे परिमाण होते. त्या मर्यादेत ती संचार करीत होती. या परंपरेचा महत्त्वाचा आश्रयदाता महाराष्ट्रातील शेतकरी होता. ग्रामसंस्कृती आणि तिच्यातील कीर्तनसंस्थेसारख्या संस्थांनी ही परंपरा टिकवून ठेवली होती. समाजातील शिष्ट वर्गात तुलनेने तिचे महत्त्व नगण्य होते.

नरेंद्र, भास्कर, एकनाथ इत्यादींनी पाया घातलेली पंडिती कविता पेशवाईमध्ये अधिक प्रभावी झाली होती. ती शिष्टसंमतही झाली होती. पेशवाईमध्ये उच्चवर्णीय सरदारांची नवी परंपरा निर्माण झाली होती. सरदारांचा हा नवा वर्ग या कवितेचाच नव्हे, तर या प्रकारची कविता लिहिणाऱ्या कवींचाही आश्रयदाता झाला होता. या कवितेने संस्कृत साहित्यशास्त्राशी असलेले आपले नाते बऱ्याच प्रमाणात जपून ठेवले होते. अर्थातच संस्कृत साहित्यशास्त्राच्या परंपरेचे केवळ आदेशात्मक अवशेष शिल्लक राहिलेले होते. नारदीय कीर्तने, पुराणे, प्रवचने या लोकाविष्कारांशी ही कविता नाते ठेवून असली तरी कृषिसंस्कृतीशी तिचा काहीही संबंध येत नव्हता.

पंडिती कवितेच्या बरोबरीने उत्तर पेशवाईमध्ये प्रभावी ठरलेला कवितेचा नवा प्रवाह म्हणजे शाहिरी कविता होय. पहिल्या बाजीरावापासून महाराष्ट्रीय समाजात प्रभावी ठरू लागलेल्या सैनिकी पेशाच्या लोकांचा आणि या कवितेचा घनिष्ठ संबंध आहे. पंडिती कवितेसारखी शिष्टसंमतता या


अनुक्रमणिका

कवितेला लाभलेली नसली तरी पेशवे व त्यांच्या सरदारांपासून तो साध्या शिलेदारांपर्यंत ही कविता लोकप्रिय ठरली होती. रंजन करणे ही तिची महत्त्वाची अट होती. ही कविताही रंगपीठाच्या आश्रयाने बहरत होती. लोककलेशी ती अनुबंध ठेवून होती.

ब्रिटिशपूर्व महाराष्ट्रातील साहित्यावर कविता या साहित्यप्रकाराचा मोठाच प्रभाव होता. तुलनेने गद्य कमी होते. बखरी लिहिल्या जात होत्या. पण त्यांचा प्रसार मर्यादित होता. त्या लिहवून घेऊन जपून ठेवायच्या गोष्टी होत्या. साहित्य किंवा काव्यप्रकार म्हणून त्यांची गणना होत नव्हती.

या साहित्याची काही वैशिष्ट्ये आपण अधोरेखित करून घेऊया.

या साहित्यावर मौखिक परंपरेचा फार मोठा प्रभाव होता. कविता लिहिली जात असे. ती लिखित स्वरूपात जपूनही ठेवली जात असे. पण रंगपीठाच्या माध्यमातून सादरीकरणासाठी तिचा जन्म झाला असल्यामुळे, तिचे स्वरूप प्रयोगनिष्ठ असल्यामुळे तिच्या स्वरूपावर मौखिक परंपरेचा फार मोठा पगडा होता. मौखिक परंपरेत श्रोत्याची विशिष्ट प्रतिमा अभिप्रेत असते. तो कवीच्या पूर्ण माहितीचा, प्रत्यक्ष उपस्थित असणारा असतो. श्रोत्याला माहिती असलेल्या गोष्टीच कवी त्याला सांगत असतो. परिचित असूनही पूर्वज्ञात गोष्टींचे निवेदन केले जाते आणि महत्त्वाचे मानले जाते, याचे कारण त्यांना परंपरेमध्ये महत्त्वाचे स्थान असते. कवीसमोर उपस्थित असणारा श्रोता आणि स्वतः कवी एकाच सांस्कृतिक संचितात सहभागी होत असतात. या सर्व गोष्टींमुळे कवी आणि त्याच्या श्रोत्यांमधील संपर्कव्यवस्थेमध्ये अडथळा येण्याची शक्यता फार कमी असते.

या साहित्यचा त्यावेळच्या शिक्षणव्यवस्थेशी फारसा संबंध उरला नव्हता. संस्कृत पाठशाळांमध्ये शिकणाऱ्या ब्राह्मण विद्यार्थ्यांचा संस्कृत महाकाव्यांशी, नाटकांशी व साहित्यशास्त्राशी संबंध येत असावा. पण मराठीतील लेखन त्यांना अभ्यासण्याची वेळ येत नसे. संस्कृत काव्य आणि काव्यशास्त्र संस्कृतमधून शिकणारे पंडित मराठीत काव्य करीत, पण मराठी कवितेचे साहित्यशास्त्रीय दृष्टीतून विश्लेषण करीत नसत. प्राथमिक पातळीवरील व्यवहारशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा मराठी कवितेशी थोडाफार संबंध येई असे दिसते. पण त्यांतही पाठांतरापेक्षा अधिक काही स्थान कवितेला असेल असे वाटत नाही. शिक्षणव्यवस्थेचा साहित्यावर होणारा आणि साहित्याचा शिक्षणव्यवस्थेवर होणारा परिणाम यांपासून हा कालखंड मुक्त होता.

– ६ –

महाराष्ट्रात झालेल्या इंग्रजांच्या आगमनाने साहित्याविषयीच्या या चित्रात आमूलाग्र परिवर्तन झाले. शिक्षणव्यवस्थेचा आणि साहित्याचा एकमेकांवर परिणाम घडवून आणणारा संपर्क आला ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

इंग्रजांनी सुरू केलेल्या नव्या शिक्षणव्यवस्थेमुळे नवा सुशिक्षितांचा वर्ग महाराष्ट्रात निर्माण होऊ लागला होता. हा वर्ग प्रामुख्याने शहरात केंद्रित झालेला होता. साहित्याचा आस्वाद घेणाऱ्या पारंपरिक वर्गापेक्षा या वर्गाची मानसिकता वेगळी होऊ लागली होती. परंपरेपासून तो पूर्णपणे तुटला नव्हता, पण पारंपरिक साहित्याने त्याचे समाधान होण्यासारखे नव्हते. सरदारी, शिलेदारी या सरंजामी व्यवस्था आता लोपल्यासारख्या झाल्या होत्या. त्यामुळे लावणी, पोवाडे या नव्या वर्गाला आकर्षून घेत नव्हते. धर्म आणि आध्यात्मिकता पूर्ण लोपली नव्हती, पण जीवनविषयक विचारांना ऐहिकतेचे नवे परिमाण प्राप्त होऊ लागले होते. थोडक्यात, या वर्गाची मूल्यव्यवस्था बदलू लागली होती. हा नवा वर्ग परंपरेशी असलेले संबंध विरळ झाल्यामुळे आपल्या अस्मितेच्या शोधात होता. या अवस्थेत असलेले लोक नवे विधी, नव्या प्रथा शोधत असतात. 'पुढल्या माडीपासून चुलीपर्यंत व दिवाणखान्यातील टेबलापासून फणी-करंड्यापर्यंत कोणाच्या हाती पडेल त्याने वर्तमानपत्र'[१२] अथवा पुस्तक वाचणे हा या वर्गाच्या लेखी त्याची अस्मिता अधोरेखित करणारा एक नवा विधी होता. नवा वाचकवर्ग निर्माण होत होता. त्याच्या अपेक्षांनी आकाराला आलेले नव्या प्रकारचे साहित्य निर्माण होणे अपरिहार्य होते.

साहित्याची निर्मिती, स्वरूप आणि आस्वाद यांच्यावर खोलवर परिणाम करणारी दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे मुद्रणव्यवस्था होय. मुद्रणव्यवस्थेमुळे एका वर्तमानपत्राच्या अथवा ग्रंथाच्या अनेक प्रती निघणे शक्य झाले, ही गोष्ट सर्वांनाच ठाऊक आहे. मुद्रणक्रांतीमुळे संपर्क सुलभ झाला हेसुद्धा आपण जाणतो. साहित्याच्या निर्मितिप्रक्रियेच्या दृष्टिकोणातून याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे लेखकाला



अनुक्रमणिका

अभिप्रेत असलेले वाचकाचे स्वरूप मोठ्या प्रमाणात बदलले. मौखिक परंपरेतील वाचक लेखकाच्या समोर उपस्थित होता, त्याच्या मूल्यव्यवस्थेत आणि सांस्कृतिक विश्वात सहभागी असलेला होता, हे आपण पाहिले आहे. मुद्रणव्यवस्थेमुळे छापल्या गेलेल्या मजकुराची झेप काळ आणि अवकाश या दोन्ही पातळ्यांवर परिचिताची मर्यादा ओलांडून पलीकडे जाणारी असल्यामुळे लेखकाच्या संभाषितावर महत्त्वपूर्ण परिणाम झाले. त्यांचे स्वरूप आपण पुढे समजून घेऊ.

'वाङ्मयोत्पादनाच्या धंद्याचें आजचें स्वरूप' या १९२४ साली लिहिलेल्या लेखात डॉ. केतकर म्हणतात, "वाङ्मयोत्पादन हा महाराष्ट्रात अजून धंदा झाला नाही आणि जेव्हा हा उपजीविकेचा धंदा म्हणून निश्चित होईल, तेव्हाच मराठी वाङ्मय हे स्थिरपदावर येऊन पोहोचेल, हे निश्चित आहे."[२३] एक समाजशास्त्रज्ञ आणि साहित्याभ्यासक म्हणून डॉ. केतकरांनी कळीच्या मुद्यावर बोट ठेवले आहे. मराठीत लेखन करून उपजीविका करणे आजही अत्यंत कठीण गोष्ट असली तरी आपल्या दृष्टीने सूचना स्पष्ट आहे. मुद्रणव्यवस्थेमुळे लेखकाचा आश्रयदाता बदलला आहे. मुद्रणयुगात त्याला पारंपरिक आश्रयदात्यांशी किंवा पारंपरिक आविष्कारांशी, विधींशी जोडून घेण्याची आवश्यकता उरलेली नाही. वाचणाऱ्या वर्गाशी त्याचे नवे नाते निर्माण झाले आहे. हे नाते त्याच्या लेखनात प्रतिबिंबित होणे ही एक साहजिक प्रक्रिया होती. पेशव्यांच्या दरबारातील रमण्याचे आणि संस्थानिकांकडून वर्षासन मिळण्याचे अवशेष या काळात थोडेफार शिल्लक असले तरी वाचकाचे आश्रयदाता म्हणून असलेले महत्त्व लेखकांना जाणवू लागले होते. या वाचकाशी संपर्क साधून त्याचा अनुनय करण्याचा प्रयत्न हा या काळातील लेखकाच्या संभाषिताचे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

– ७ –

वरील छेदकात मांडलेल्या आशयसूत्रांचे त्या काळातील साहित्याच्या संदर्भात अधिक स्पष्टीकरण करून घेऊया.

या कालखंडातील साहित्याचा महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यामध्ये गद्य भाषेला आलेले महत्त्व होय. या काळातील गद्य लेखनभाषेच्या पायाभरणीचा प्रारंभ पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीपासून झाला. हे एक प्रकारे 'मूर्खास शहाणे करण्याचे काम'[२४] होते. पाठ्यपुस्तकाच्या संभाषिताचा महत्त्वाचा विशेष अपरिचित विषय समजावून सांगण्याचा असतो. परिचिताचा अपरिचिताशी संबंध जोडून अपरिचित विषय समजावून सांगता येतो. तो समजावून सांगताना विद्यार्थ्यांची मनधरणी करण्याचे कामही संभाषिताला करावे लागते. अपरिचित गोष्ट व्यक्त करावयाची असल्यामुळे भाषेत काहीसा अवघडलेपणा येण्याची शक्यता असते. भाषेची तथाकथित नैसर्गिकता, प्रसाद या प्रक्रियेमध्ये नष्ट होण्याची शक्यता असते. या काळातील पाठ्यपुस्तकांतच नव्हे तर इतरही गद्य लेखनात हा अवघडलेपणा दिसतो.

डॉ. पाटणकरांनी या संदर्भात रानड्यांच्या अर्थशास्त्र-विषयक लेखनाचा उल्लेख केला आहे.[२५] या काळातील मराठी निबंधलेखनात बहुतेक ठिकाणी हा अवघडलेपणा दिसतो. तो जांभेकरांच्या लेखनात आहे तसा लोकहितवादींच्या लेखनांतही आहे. आगरकरांनी इंग्रजी पद्धतीची प्रदीर्घ वाक्यरचना करून हा अवघडलेपणा दडविण्याचा प्रयत्न केला आहे, तरी तो दिसतो. तुलनेने मालाकार चिपळूणकर आणि केसरीकार टिळकांच्या लेखनामध्ये तो कमी दिसतो. पारंपरिक सांस्कृतिक संचिताशी अधिक घट्ट नाते असल्यामुळे, आपण जे सांगतो आहोत ते पूर्वपरिचित आहे या आत्मविश्वासाने हा अवघडलेपणा कमी दिसतो, असे म्हटले तर ते वावगे ठरू नये.

इंग्रजांच्या आणि इंग्रजीच्या संपर्कामुळे निबंधांप्रमाणेच कथा आणि विशेषतः कादंबरी हे नवे साहित्यप्रकार मराठीच्या परिचयाचे झाले. इंग्रजीचा संपर्क आला नसता तरी मराठीमध्ये कादंबरीलेखनाची पूर्वतयारी पूर्ण होत आली होती व त्यामुळे मराठीत कादंबरीलेखन इंग्रजीच्या संपर्काशिवाय शक्य झाले असते अशी भूमिका आपल्याकडे अधूनमधून मांडली जाते.[२६] हा युक्तिवाद खरे म्हणजे व्यर्थ आहे. जे झाले असते असे म्हटले जाते ते झाले नाही, आणि त्यामुळे ते झाले असते असे म्हणण्यात काहीच अर्थ नाही. जे झाले आहे ते कसे आहे याचे स्पष्टीकरण आपण करू शकतो व ते करताना कादंबरी हा साहित्यप्रकार आपण इंग्रजीमार्फत युरोपकडून स्वीकारला आहे असे म्हणावे लागते. साहित्यप्रकार केवळ रूपविषयक घटकांनी आकाराला येत नसतो. रूपविशेषांच्या मागे विशिष्ट प्रकारचे विश्वभान आणि मूल्यव्यवस्था असते. इहप्रवण दृष्टी, समाज आणि व्यक्ती यांचा व्यक्तिवादी तत्त्वज्ञानामुळेच शक्य होईल या प्रकारचा संबंध, कल्पित



अनुक्रमणिका

आणि वास्तव यांचा नवा समतोल या गोष्टींचा आणि कादंबरी या साहित्यप्रकाराचा अत्यंत घनिष्ठ संबंध आहे. मराठी कादंबरीचा आणि इंग्रजीतील कादंबरीचा संबंध बऱ्याच मोठ्या प्रमाणात अनुकरण करायचे प्रारूप आणि अनुकृती असा आहे यात शंका नाही. पण हा संबंध तेवढाच नाही. मराठी समाजात निर्माण होऊ लागलेल्या नव्या मूल्यदृष्टी, विश्वभानही कादंबरीच्या अवतरणाशी निगडित आहे.

मुद्रण, मूल्यव्यवस्था आणि वाचक या सर्व गोष्टींमध्ये परिवर्तन घडून आल्यामुळे गद्य भाषेमध्ये, विशेषतः कथनरूपाचे वाहक असलेल्या गद्य संभाषितामध्ये व त्याचबरोबर कल्पितकथेच्या परिमाणांमध्ये महत्त्वाचे बदल घडून आले. पारंपरिक कथनरूपाच्या तुलनेत हे बदल न्याहाळले तर दोहोंमधील भेद सुस्पष्ट होतात.

महाभारत-रामायणाच्याही अगोदरपासून आपल्याकडे कथनरूपाची प्रदीर्घ परंपरा आहे. पारंपरिक कथनरूपाच्या संरचनेचे महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे तिच्यावरील कल्पिताचे अधिराज्य होय. ही पारंपरिक कथनरूपे संरचनेच्या दृष्टीने अनेक पातळ्यांची असतात. कोणीतरी कोणाला तरी कथा सांगत असते. सांगितल्या जाणाऱ्या कथेतील एखादे पात्र दुसऱ्या एखाद्या पात्राला आणखी एखादी कथा सांगत असते. कथनरूपाच्या या रूपबंधामुळे कथेबाहेरील वाचकाचे अस्तित्व संरचनेमध्ये गृहीत धरले जात नाही. कल्पित निवेदक कल्पित श्रोत्याला कथा सांगत असल्यामुळे भोवतालच्या खऱ्याखुऱ्या वाचकापासून आणि वास्तवापासून कथनरूप सुरक्षित अंतरावर ठेवले जाते. कथा ऐकणाऱ्या श्रोत्याला आपल्या भोवतालचे सतत बदलणारे वास्तव कथनरूपाच्या सीमारेषेबाहेर ठेवून, पारंपरिक संचिताशी सूर जमवून घेऊन कथनरूपामध्ये प्रवेश दिला जातो.

इंग्रजीच्या प्रभावातून मराठीत कथा-कादंबऱ्यांचे लेखन सुरू झाल्यानंतर कथाबाह्य, प्रत्यक्षातला, भोवतालच्या वास्तवाने परिवेष्टित असलेला वाचक कथनरूपाच्या संरचनेच्या दृष्टीने महत्त्वाचा ठरू लागला. त्याला आवाहन करण्यासाठी आजवर काटेकोर असलेल्या कल्पिताच्या सीमारेषा अनिश्चित, संदिग्ध, पुसट केल्या जाऊ लागल्या. कथनरूपातील कल्पिताच्या अधिराज्याला हा फार मोठा शह होता.

ही प्रक्रिया केवळ वास्तवाचे प्रतिरूपण करणाऱ्या कादंबऱ्यांमध्येच नव्हे, तर अगदी प्रारंभीच्या 'मुक्तामाला', 'मंजुघोषा', 'विचित्रपुरी' यांसारख्या अद्‌भुतरम्य व कल्पनारंजित कादंबऱ्यांमध्येही घडताना आढळते. सर्वत्र पसरलेल्या अद्‌भुतरम्यतेमध्येच 'खुर्ची'वर बसलेली नायिका, घडी करून ठेवता येणारे 'विमान', 'इस्टेटी'च्या मोहातून होणारे संघर्ष अशा दचकावणाऱ्या गोष्टी येतात. मध्येच जमिनीवर उतरायला लावणारे वास्तवाचे हे संदर्भ औचित्याच्या दृष्टीने योग्य वाटत नसले, तरी कथनरूपातील परिवर्तनप्रक्रियेमधील ही महत्त्वाची चिन्हे आहेत. त्यांचे अधिक विकसित रूप पुढे हरिभाऊंमध्ये दिसू लागते. हेच आपल्याला वाचकाला 'वाचकहो' म्हणून उघडपणे केलेल्या आवाहनाबद्दल म्हणता येईल. इंग्रजी पद्धतीचे अनुकरण असले तरी या संबोधनातून जाणवणारे वाचकाचे ठसठशीत अस्तित्व केवळ अनुकरणापुरते नाही.

पारंपरिक कथनरूपांची अनेक पातळ्यांनी युक्त असलेली संरचना आणि तिच्यामध्ये कल्पित निवेदक व श्रोत्याला असलेले महत्त्वाचे स्थान या गोष्टी मध्ययुगीन आख्यानक कवितेमध्ये नाहीत. या दृष्टीने पाहिले तर पारंपरिक कथनरूपाची मर्यादा ओलांडून पलीकडे जाण्याचा प्रयत्न मध्ययुगीन आख्यानक कवितेपासूनच सुरू झाला होता, असे म्हणता येईल. या प्रयत्नाला खूप मर्यादा होत्या. आख्यानक कविता, पुराणे, महाकाव्यादिकांचा आधारस्रोत म्हणून उपयोग करते. पुन्हा पुन्हा वेगवेगळ्या स्वरूपात ऐकलेली कथाच तिच्यामधून सांगितली जाते: आख्यानक कविता व कीर्तन-पुराणांचा संबंध सर्वश्रुत आहे. तिच्या पठणप्रयोगाचा काळ आणि अवकाश परंपरेने भारलेला असतो. भवतापांचे हरण व्हावे म्हणून संसार आणि संसारचिंता मंडपाच्या उंबरठ्या बाहेर ठेवून श्रद्धा व विधींशी नाते जोडीत श्रोत्याला श्रवणात सहभागी व्हावे लागते. येथेही कल्पिताला आव्हान देणारे वास्तव आतमध्ये शिरकाव करू शकत नाही, हे लक्षात येते.

नव्याने निर्माण होऊ लागलेल्या कादंबरीचा वाचक समूहातला नव्हता. त्याच्या वाचनप्रयोगाचा काळ व अवकाश सामूहिक, धार्मिक, पारंपरिक प्रेरणांनी भारलेला नव्हता. तो एकाकी होता. तो भारला गेलेला नव्हता. त्याची विवेकशक्ती साधकबाधक विचार करत होती. पारंपरिक श्रोत्याप्रमाणे तो कथनरूपावर पूर्ण विश्वास टाकत नव्हता. वास्तव आणि हा वाचक यांच्यामधले पडदे झिरझिरीत झाले होते. हा वाचक स्वप्ने पाहणे विसरला नव्हता. पण त्या स्वप्नांना वास्तवाचा


अनुक्रमणिका

ठसठशीत संदर्भ होता. तो कल्पितांच्या साम्राज्यात झेप घेत होता, पण ही झेप वास्तवाचे सम्यक् दर्शन घेता यावे यासाठी आवश्यक असलेले अंतर निर्माण करणारी होती. असा नवा वाचक आणि त्याला हवे असलेले कथनरूप या दोहोंचा प्रारंभबिंदू म्हणजे आपण चर्चा करत असलेला काळ होय.

एकाकी, समूहापासून तुटलेला, पारंपरिक संचिताने न भारलेला वाचक हे या नव्या युगाचे वैशिष्ट्य आहे. तसेच लौकिक पातळीवरच्या कमीअधिक महत्त्वाच्या गोष्टी सार्वजनिक चौथऱ्यावर मांडणे हेदेखील गद्य साहित्याशी संबंधित असे महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे. मराठीतील कादंबरीची जडणघडण पाठ्यपुस्तके, निबंध, वर्तमानपत्रे यांच्या हातात हात घालून झाली आहे ही गोष्ट लक्षणीय आहे. प्रत्येक कथनपरंपरेत कथन करण्याजोगे काय असते याचे विधिनिषेध असतात. आपल्या पारंपरिक कथनपरंपरेत वस्तुस्थितीविषयक निवेदन करणारे, ऐकण्यासाठी सर्वांना खुले असणारे, प्रत्यक्षात घडलेले आणि प्रत्यक्षातील घडण्याला प्रेरणा देणारे कथनात्म संभाषित वसत नव्हते. आपल्या सामाजिक जीवनात असे एकच संभाषित होते, ते म्हणजे दवंडीचे. तेही मौखिक परंपरेतले. प्रत्यक्ष उपस्थित असलेल्या श्रोत्यांना आवाहन करणारे. 'त्यात कोणाचाच पक्षपात न ठेवता जे वास्तविक असेल तेच लिहिले जाईल'[३७] या प्रकारच्या प्रतिज्ञा करून अवतरलेल्या वर्तमानपत्रांनी दवंडीच्या संभाषिताला केवळ लेखी रूप दिले नाही. तिच्यातला आदेशात्मक भाग काढून टाकून वस्तुस्थितीबद्दल लोकांना विचार करायला भाग पाडले. १८४२ मधल्या 'प्रभाकरा'त कोण्या एका 'स्पष्टवक्त्या'ने सांगितलेली एक सत्यकथा आली आहे. गोपाळराव पटवर्धन जमखिंडीकर यांची सरस्वती नावाची नाटकशाळा सातारकर अप्पामहाराजांनी सातान्यास कशी आणवली या घटनेचे चुरचुरीत कथन तेथे केले गेले आहे.[३८] पेशवे डायऱ्या चाळून पाहिल्या तर त्यावेळच्या समाजातील अशा काही प्रकरणांचे निवेदन तेथेही आलेले दिसेल. पण हे निवेदन खुले नव्हते. सर्वांच्या वाचनासाठीचे नव्हते. वर्तमानपत्रांनी कथनयोग्य घटनांचे नवे नमुने प्रसारात आणायला प्रारंभ केला. वास्तवविषयक संभाषिताची जडणघडण यामधून सुरू झाली. वास्तवाशी घनिष्ठ संबंध असलेल्या कादंबरीने अर्थातच या संभाषिताला अधिक समृद्ध करण्याचा प्रयत्न केला.

पारंपरिक कथनरूपामध्ये घटनेच्या एकत्वाला विशेष महत्त्व नाही. त्यामधील घटना आवर्तकत्वाची क्षमता असलेल्या असतात. त्या टोकाच्या असंभाव्य असू शकतात. पण त्या तशाच का घडतात याच्या कारणमीमांसेला कथनात महत्त्वाचे स्थान नसते. असे असंभाव्य, अघटित काही घडले तर वाचकाला आश्चर्याचा धक्का वगैरे बसत नाही. असे काहीतरी घडणार, पुन्हा पुन्हा घडणार याची त्याला कल्पना असते. कथनरूपविषयक संकेतव्यूहाने घटनाक्रमाचा मार्ग निश्चित केलेला असतो. कादंबरीने घटनाक्रमाचा मार्ग अनिश्चित केला. तिच्यातील प्रत्येक घटना एकदाच घडणारी, तिची स्वतःची वैशिष्ट्यपूर्णता असलेली, पुनरावृत्त न होणारी केली. वास्तवात घडणाऱ्या जीवनक्रमाला कथानकाचे प्रारूप म्हणून कादंबरीने स्वीकारल्यामुळे 'पुढे काय होणार' याबद्दलची उत्सुकता निर्माण करणारे कथानक कादंबरीने घडवायला प्रारंभ केला.

संस्कृतिसंपर्कातून घडलेल्या बदलांनी कथनरूपाचे स्वरूप किती अंतर्बाह्य बदलले याची पुरेशी कल्पना वरील विवेचना-वरून यायला हरकत नसावी. कादंबरी हा पाश्चात्त्यांकडून घेतलेला नवा साहित्यप्रकार असल्यामुळे त्याचे विवेचन अधिक तपशिलात जात केले. याचा अर्थ फक्त कादंबरीत किंवा कथनरूपातच बदल होत होते असा नाही. समृद्ध परंपरा असलेल्या कवितेमध्येही परिवर्तन घडत होते. कवितेमधून कशाचा आविष्कार करायचा याबद्दलच्या संकल्पना बदलत होत्या. यामुळे गद्य संभाषितात जसा अवघडलेपणा आला होता तसा तो कवितेमध्येही आला होता. तो कुंटयांमध्ये दिसतो, तसाच केशवसुतांमध्येही दिसतो.

या सर्व परिवर्तनामागे नव्याने निर्माण होऊ लागलेली विशिष्ट मूल्यव्यवस्था होती. ती इंग्रजांच्या संस्कृतीशी आलेल्या संपर्कामुळे निर्माण झाली होती. तिला 'आधुनिक' मूल्यव्यवस्था म्हणता येईल. तिच्यामागील महत्त्वाचे सूत्र मानवकेंद्रिततेचे होते. सभोवताली जे काही घडते त्याचा अर्थ मानव लावू शकतो आणि भोवतालच्या परिस्थितीमध्ये त्याला आवश्यक वाटणारे बदल तो घडवून आणू शकतो, असा ठाम विश्वास तिच्यामागे होता. मानवी व्यक्तीला या मूल्यव्यवस्थेमुळे प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. प्रत्येक मानवी व्यक्तीला आपल्या व्यक्तिमत्त्वाचा विकास घडवून आणण्याचा हक्क आहे आणि त्याला विरोध होत असेल तर बळ एकवटून प्रतिकार केला पाहिजे याची तीव्र व्यक्तिवादी जाणीव या मूल्यव्यवस्थेमध्ये

अभिप्रेत होती. यामुळे समाज आणि व्यक्ती यांच्यातील संबंधांचे नव्या पायावर संयोजन होऊ लागले होते. बुद्धिप्रामाण्यवाद, विज्ञान, समतेचे तत्त्वज्ञान हे तिचे महत्त्वाचे पैलू होते.

युरोपमध्ये ही मूल्यव्यवस्था विशिष्ट सामाजिक-ऐतिहासिक प्रक्रियेमधून सिद्ध झाली होती. अशा प्रक्रियेमधून न जाता ही मूल्यव्यवस्था आपल्यावर लादली गेली किंवा आपल्याला आयती मिळाली असे काही लोकांचे म्हणणे पडेल. या मूल्यांना पोषक ठरणारी सामाजिक-आर्थिक परिस्थिती आपल्याकडे नसल्यामुळे ही मूल्यव्यवस्था वरवरची व उपरी ठरली असाही युक्तिवाद ते करू शकतील. ही मूल्ये 'आपली', 'या मातीतली' नाहीत म्हणून त्यांची आपल्याला गरज नव्हती अशी भूमिकाही कदाचित त्यांना घेता येईल.

मुख्य प्रश्न हा आहे की, या परक्या मूल्यव्यवस्थेने येथील लोकांची मने तळापासून ढवळून काढली की नाही? योग्य सामाजिक-आर्थिक परिस्थिती असो वा नसो येथील लोकांच्या मानसिकतेवर या मूल्यांनी परिणाम केला की नाही? हे घडले असेल तर इतर प्रश्न गौण ठरतात. विशिष्ट सामाजिक-आर्थिक परिस्थिती विशिष्ट प्रकारच्या मूल्यांना जन्म देते हे म्हणणे मान्य केले तरी, ती मूल्ये अवकाशाच्या पातळीवर प्रवास करू शकतात ही गोष्टही गृहीत धरणे आवश्यक आहे. हे गृहीत धरले नाही तर विविध प्रकारच्या धर्मकल्पना एका देशातून दुसऱ्या देशात, जगाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत प्रवास कशा करतात याचा खुलासाच करता येणार नाही.

केशवसुतांपासूनच्या आधुनिक कवितेच्या केंद्रस्थानी वर उल्लेखिलेल्या मूल्यव्यवस्थेचे दर्शन घडते. ती लौकिक विषयांकडे वळली आहे. तिच्यामधून समतेचे तत्त्वज्ञान मांडले जाते आहे. समाजरचनेच्या दृष्टीने महत्त्वाचे प्रश्न तिच्यातील चिंतनाचा विषय होत आहेत. तिच्यामधून होणारे विविध भावनांचे आविष्कार पारंपरिक मर्यादांच्या बाहेरचे आहेत. या सर्वांहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे कविता म्हणजे कवीच्या व्यक्तिगत भावनांचा आविष्कार ही संकल्पना प्रस्थापित होऊ लागली आहे. आधुनिकतेच्या मूल्यव्यवस्थेने आणि शाळा-महाविद्यालयांमध्ये अभ्यासाव्या लागलेल्या इंग्रजी रोमँटिक कवितेने या कवितेवर मूलभूत परिणाम केले आहेत.

इंग्रजांची आधुनिकता आणि इंग्रजीतील रोमँटिक कविता यांच्यातील संबंध खरे पाहिले तर सलोख्याचे नाहीत. तेथील रोमँटिक कविता ही साहित्याच्या पातळीवरील आधुनिकतेच्या विरोधातील प्रतिक्रिया आहे. येथे आंग्ल प्रभावाने भुलून जाऊन, तेथील परंपरेतील अंतर्विरोध लक्षात न घेता दिसले ते सर्व घेऊन त्यांचे एकत्रीकरण मराठी रोमँटिक कवितेने केले असा आक्षेप या कवितेवर घेतला जाण्याची शक्यता आहे.

थोडासा सहानुभूतिपूर्वक विचार केला तर मराठी कवितेतील या तथाकथित अंतर्विरोधाचा समाधानकारक उलगडा आपल्याला करता येईल. येथे एक लक्षात घेतले पाहिजे की, इंग्रजी रोमँटिक कवितेचे साहित्यशास्त्र आपल्या परंपरेतील कवीला जवळचे वाटणे ही एक साहजिक प्रक्रिया होती. इंग्रजी रोमँटिक कवितेला अभिप्रेत असलेला कवी नवनिर्मिती करणारा, प्रतिभेचे दैवी वरदान लाभलेला, अलौकिक पातळीवरून वावरणारा, सर्वसामान्यांपेक्षा वेगळ्या उंचीचा आहे. अनुकृतीला महत्त्व देणाऱ्या, साहित्यविषयक संकेतव्यूहाला महत्त्वाचे मानणाऱ्या, लौकिकतावादाकडे झुकलेल्या पाश्चात्त्य साहित्यशास्त्राच्या परंपरेत हा विचार तसा अभिनव होता. भारतीय परंपरेच्या बाबतीत असे म्हणता येत नाही. प्राचीन काळापासून येथील परंपरेत कवीचे असामान्यत्व आणि त्याच्या प्रतिभेचे लोकविलक्षणत्व मुरलेले होते. केशवसुतादिकांना इंग्रजी रोमँटिक कवितेशी आंतरिक नाते जोडता आले, ही कविता त्यांना जवळची वाटली याचे कारण अशा प्रकारे आपल्या परंपरेतही शोधता येते. भारतीय परंपरेतील अलौकिकतावाद आणि इंग्रजी रोमँटिक कवितेतील भावनाविष्कारवाद यांची सांगड या काळातील मराठी कविते घातली आहे.

अजूनही आधुनिकतेची विवेकाधिष्ठित मूल्यव्यवस्था आणि रोमँटिक भान यांचा तिढा कायम राहतो. आधुनिकतेची मूल्यव्यवस्था पेलून धरणारी सामाजिक-आर्थिक परिस्थिती त्या काळात आपल्याकडे अस्तित्वात नव्हती, असा उल्लेख वर आला आहे. याचा अर्थ असा की, ही मूल्ये फक्त कल्पनेच्या पातळीवर राहत होती. त्यांना वास्तवाच्या पातळीवर खेचण्यासाठीचे अनुकूल पर्यावरण अद्यापि तयार व्हायचे होते. या परिस्थितीमुळे आधुनिकतेच्या मूल्यव्यवस्थेला आपोआपच युटोपियाची किनार प्राप्त झाली. आजच्या वास्तवात आकाराला येऊ न शकणारी पण उद्याच्या भविष्यात



अनुक्रमणिका

निश्चित जागा असणारी स्वप्ने असे स्वरूपात तिला प्राप्त झाले. पृथ्वीला सुरलोक बनविण्याचे स्वप्न केशवसुतांच्या कवितेत वारंवार येते. पूर्णापासून ढळलले जग पूर्णाकडेच निघाले आहे असा विश्वास 'बी'ची कविता व्यक्त करते. यामागे सुंदर आणि निरोगी आयुष्याची कल्पना आहे. तिच्या मुळाशी आधुनिकतेची मूल्यदृष्टी आहे ही गोष्ट लक्षात घेतली तर इंग्रजी परंपरेतील अंतर्विरोधाचा निरास आपल्या कवितेने कसा केला होता, हे आपल्या लक्षात येते. हा युटोपिया केवळ कवितेच्या क्षेत्रातच नव्हे, तर कादंबरीच्या क्षेत्रातही आढळून येतो. एकमेकांशी बरोबरीच्या नात्याने वागणारी, बौद्धिक सुसंवाद असणारी, एकमेकांवर आधुनिक धाटणीचे प्रेम करणारी पती-पत्नी हा एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावरचा युटोपियाच होता. तो हरिभाऊंच्या कादंबरीतून मूर्त होताना दिसतो. त्याचेच सवंग स्वरूप पुढे ना.सी. फडके यांच्या कादंबरीतून साकारताना दिसते.

आधुनिकतेच्या मूल्यव्यवस्थेला पोषक असे पर्यावरण पुढे निर्माण होऊ लागले. आधुनिकीकरणाच्या रेट्यातून भांडवलदारी उत्पादनव्यवस्था भारतात हळूहळू निर्माण होऊ लागली. वैज्ञानिक दृष्टिकोण, समतेचे तत्त्वज्ञान, लोकशाही, मानवकेंद्रितता, बुद्धिप्रामाण्यवाद या गोष्टी केवळ कल्पनेच्या साम्राज्यातील राहिल्या नाहीत. त्यांना आधारभूत ठेवून आपण आपल्या चळवळी उभारल्या. आधुनिकतेच्या मूल्यव्यूहासोबत तिच्यातील अंतर्विरोधदेखील आले. ते इथे आले तसेच युरोपमध्येही आले. त्यांनी आधुनिकतेची समीक्षा करण्याचा प्रयत्न केला. आपल्या परीने आपणही तो केला. असे असूनही गेल्या दीडशे वर्षांत आपल्या साहित्याच्या आणि सामाजिक चळवळींच्या केंद्रस्थानी आधुनिकतेचा मूल्यव्यूह राहिला आहे. आपण विवेचन करीत असलेल्या काळातील साहित्य अशा प्रकारे भविष्यलक्ष्यी ठरले आहे.

– ८ –

इंग्रजीच्या संपर्कातून साहित्याच्या निर्मितीवर जसा परिणाम केला, तसाच साहित्याच्या वाचनपद्धतीवरही केला. पारंपरिक वाचकापेक्षा आधुनिक वाचक कसा वेगळा ठरतो याबद्दलच्या अगोदर केलेल्या विवेचनातून याची कल्पना येऊ शकते. साहित्याचे स्वरूप बदलले असेल, वाचकाची वाचनपद्धती आणि त्याच्या साहित्याकडूनच्या अपेक्षा बदलल्या असतील, तर साहित्याचे आकलन करून घेणारे संकल्पनाव्यूह बदलणे क्रमप्राप्त ठरते. हा संकल्पनाव्यूह सुस्पष्ट स्वरूपात समीक्षेमधून व्यक्त होत असतो. मराठी साहित्याच्या समीक्षेमध्ये मूलभूत परिवर्तन होणे यामुळेच साहजिक ठरले असते. मराठी साहित्यामध्ये ब्रिटिशपूर्व काळात समीक्षा अस्तित्वात असती तर हा बदल खात्रीने घडून आला असता. ती अस्तित्वात होती याचे पुरावे उपलब्ध नाहीत. इंग्रजीच्या संपर्कातून मराठीमध्ये साहित्यसमीक्षेचे नवे क्षेत्र उघडले गेले. प्रारंभी वर्तमानपत्रे व मासिक पुस्तके तिच्या अवतरणाला कारणीभूत ठरली असली तरी शिक्षणक्षेत्राचा आणि समीक्षेचा घनिष्ठ संबंध निर्माण झाला. शिकवायचा विषय म्हणून साहित्याचा महाविद्यालये, विद्यापीठांमध्ये प्रवेश झाला की समीक्षा-व्यवहाराला शिस्त येऊ लागते. अभ्यासाची परंपरा निर्माण होऊ लागते. क्षीण स्वरूपात का होईना, मराठीत अशी परंपरा निर्माण होऊ लागली. ती फार मोठ्या प्रमाणात इंग्रजीतील समीक्षाविचारावर आधारलेली होती.

या संदर्भात पुन्हा काही प्रश्न निर्माण होतात. मराठी समीक्षेला एवढ्या मोठ्या प्रमाणात पाश्चात्त्य समीक्षाविचारावर अवलंबून राहायची गरज आहे काय? पाश्चात्त्य समीक्षेतील समीक्षाव्यूह तेथील विशिष्ट परिस्थितीने निर्माण केलेले असल्यामुळे ते उत्तम असले तरी त्यांच्याच उपयोगाचे असतात. आपल्या साहित्याचे स्वरूप आणि गरजा लक्षात घेऊन आपले स्वतःचे असे संकल्पनाव्यूह घडविणे गरजेचे नाही काय? या संदर्भात आपल्याला आपल्या परंपरेकडून काही मदत होण्याची शक्यता नाही काय?

हे एकमेकांशी संबंधित असे प्रश्न आहेत. त्यांपैकी पहिल्या प्रश्नाचे उत्तर आज तरी होकारार्थी द्यावे लागते. साहित्याचे स्वरूप आणि समीक्षाविषयक संकल्पनाव्यूह यांच्या-मध्ये काही आंतरिक नाते असावे, असे आपल्याला वाटत असेल, तर पाश्चात्त्य संकल्पनाव्यूह स्वीकारण्याला काहीही हरकत नसावी. समीक्षेशी संबंधित संकल्पनाव्यूहाचा प्रधान हेतू त्याच्या साहाय्याने साहित्यव्यवहाराचे स्पष्टीकरण करणे हा असतो. तो संकल्पनाव्यूह कोणी निर्माण केला आहे या गोष्टीला विशेष महत्त्व देण्याची गरज नसावी. गेले दीड शतक साहित्याच्या विविध क्षेत्रांतल्या आपल्या आविष्कारा-समोर पाश्चात्त्य प्रारूपे आहेत. याचा अर्थ आपण केवळ नकलाच करतो आहोत असा नाही. समीक्षाविषयक

संकल्पनाव्यूहाचा उपयोग म्हणजे नक्कल नव्हे. कितीही चांगला संकल्पनाव्यूह असला तरी वाईट समीक्षकाच्या हातात पडल्यावर त्याचे काय होऊ शकते याची अनेक उदाहरणे आपल्याला आजूबाजूला पाहायला मिळतात. प्रश्न संकल्पना-व्यूहाच्या परकेपणाचा नाही, त्याच्या जाणतेपणाने केलेल्या उपयोगाचा आहे. या उपयोगातून नवे संकल्पनाव्यूह जन्माला येण्याचीही शक्यता असते. येथे आपण अजून कमी पडतो आहोत.

दुसरा प्रश्न सापेक्षतावादी दृष्टिकोणातून निर्माण झाला आहे. मूल्यव्यवस्था अवकाशाच्या पातळीवर पसरत जाऊ शकते, हे आपण अगोदर पाहिलेले आहेच. पाश्चात्त्य साहित्य आणि आपले साहित्य यांमध्ये काही पूल निर्माण झाले असतील, पाश्चात्त्य साहित्यकृतींचे वाचन आपण करू शकत असू, त्या आपल्याला भावत असतील तर, जगभरच्या साहित्या-मध्ये काही स्थानिक वैशिष्ट्ये असली तरी, वैश्विक स्वरूपाचे काहीतरी त्यामध्ये असावे असे म्हणता येईल. असे असेल तर कोठलाही संकल्पनाव्यूह फार काटेकोरपणे त्याला जन्माला घातलेल्या भूमीशी खिळवून ठेवता येणार नाही. संकल्पनाव्यूह जेव्हा उपयोगात येतात, तेव्हाच त्यांच्यातील बदलांना प्रारंभ होतो. ते लवचीक होतात. यातूनच नवे संकल्पनाव्यूह आकाराला येतात. तसे ते आपल्याकडेही येण्याची अर्थातच शक्यता आहे. आपली स्वतंत्र बुद्धी यातूनही दिसू शकते. अजून हे फारसे घडलेले नाही.

या सर्व प्रक्रियेमध्ये आपल्या परंपरेचा काही उपयोग होऊ शकेल काय याचे उत्तर अर्थातच होकारार्थी आहे. तिची चैतन्यशीलता संपलेली असली तरी तिच्यामधल्या क्षमता संपलेल्या नाहीत. तिचे अभ्यासपूर्वक परिशीलन करून तिचा उपयोग करता येईल. मात्र हे करताना परंपरापूजक वृत्ती न ठेवता चिकित्सक दृष्टिकोण अवलंबिण्याची गरज आहे. दुर्दैवाने आज हे घडत नाही. मात्र याचे खापर पाश्चात्त्य समीक्षाविचारावर फोडण्यात काहीच अर्थ नाही. यासाठी समीक्षेच्या क्षेत्रात अभ्यास करणाऱ्या लोकांची समर्थ परंपरा असावी लागते. येथेच साहित्यविश्वाचा आणि शिक्षणव्यवस्थेचा संबंध येतो. याबाबतीत आपल्याला बरेच काही करता येण्या-जोगे आहे.

*अपूर्ण क्रांती* या ग्रंथाच्या शेवटी डॉ. रा.भा. पाटणकरांनी आर्थिक, शैक्षणिक आणि साहित्यिक या क्षेत्रांतील सद्यःपरिस्थितीबद्दल असमाधान व्यक्त केले आहे. ते म्हणतात, "एकोणिसाव्या शतकात येथे वेगवेगळ्या स्थित्यंतरांची प्रक्रिया सुरू झाली. ती पुरी झाली असती, तर आमच्याकडे निदान काही प्रश्न सुटले असते. उदाहरणार्थ, आर्थिक स्थित्यंतराने वेग घेतला असता तर महाराष्ट्रातील दारिद्र्य जाऊन काही प्रमाणात संपन्नता आली असती. शैक्षणिक स्थित्यंतर पूर्ण झाले असते, तर आमच्याकडून कोठल्या तरी विद्याशाखेत थोडीफार मौलिक भर पडली असती. आणि साहित्यिक स्थित्यंतर पुरे झाले असते तर ज्यांना पाहून जग मान तुकवील अशा साहित्यकृती निर्माण झाल्या असत्या. पण यातील एकही स्थित्यंतर पूर्ण झाले नाही."[२१]

डॉ. पाटणकरांच्या मनातील असमाधानाशी मी सर्व-साधारणपणे सहमत आहे. मात्र इंग्रजांच्या प्रेरणेने येथे सुरू झालेली शिक्षणव्यवस्था त्यांना जेवढी आश्वासक वाटते, तेवढी ती मला वाटत नाही. तिच्यात मुळातच अनेक दोष होते. जे गुण होते ते त्यांच्या पूर्ण क्षमतेने प्रकट होऊ शकले नाहीत. त्यांची चर्चा आपण केलेली आहेच. तुलनेने साहित्य-क्षेत्रात घडून आलेले स्थित्यंतर अधिक अर्थपूर्ण वाटते. 'ज्यांना पाहून जग मान तुकवील' अशा साहित्यकृती नसल्या तरी, शिक्षणक्षेत्रातील स्थित्यंतरामध्ये जसे मूलभूत अंतर्विरोध दिसतात तसे साहित्यक्षेत्रातील स्थित्यंतरामध्ये दिसत नाहीत. अर्थात साहित्यक्षेत्रानेही निर्माण केलेल्या अपेक्षा पूर्ण केल्या नाहीत. विशेषतः जेथे शिक्षणव्यवस्थेशी संबंध येतो तेथे, म्हणजे समीक्षेसारख्या क्षेत्रात हे असमाधान तीव्रतेने जाणवते. शिक्षणक्षेत्राचा सरकारशी प्रत्यक्ष संबंध होता, साहित्याशी तो अप्रत्यक्ष स्वरूपातील होता, या वस्तुस्थितीचा या संदर्भात विचार करण्यासारखा आहे.

समीक्षेच्या तुलनेने सर्जनशील साहित्याच्या क्षेत्रात तुलनेने बरी परिस्थिती दिसत असली तरी फुले, लोकहितवादी, न्यायमूर्ती रानडे, हरी नारायण आपटे, केशवसुत यांनी सुरू केलेली प्रक्रिया पूर्णत्वाला गेलेली दिसत नाही. यामागे अनेक कारणे आहेत. आपल्याकडील जातिव्यवस्थेने विघटित झालेला समाज, त्याचे जातीपुरते मर्यादित असे विश्वभान, सहानुभूतीच्या कक्षेत संपूर्ण समाजाला आणण्यात आलेले अपयश, आपली आत्मसंतुष्ट, अल्पसंतुष्ट, अचिकित्सक वृत्ती, राजवाड्यांनी सांगितलेल्या जाज्वल्यतेचा तिच्यामधील अभाव, मुळापर्यंत न जाण्याची आपली सवय, कळीचे प्रश्न टाळण्याचा आणि

बौद्धिक आव्हाने न स्वीकारण्याचा आपला प्रघात, उत्तरोत्तर निःसत्त्व होत गेलेला आपला मध्यमवर्ग, मराठी पुस्तकांना असलेली मर्यादित बाजारपेठ अशा अनेक गोष्टी यामागे आहेत.

या परिस्थितीबद्दल आपण आपल्यालाच दोष द्यायला हवा.

### टिपा व संदर्भ

१. "Acculturation comprehends those phenomena which result when groups of individuals having different cultures come into continuous first-hand contact, with subsequent changes in the original culture patterns of either or both groups." Adelin Linton and Charles Wagley, *Ralph Linton*, Columbia University Press, 1971, New York and London, pp. 137.

२. J.P. Naik (editor), *A Review of Education in Bombay State : 1855-1955*, Bombay State, Poona, 1958, pp. 70.

३. तत्रैव, पृ. ७०.

४. तत्रैव, पृ. ७०.

५. S. Nurullah and J.P. Naik, *A History of Education in India*, Macmillan, Bombay-London, pp. 46.

६. तत्रैव, पृ. ५०.

७. तत्रैव, पृ. ११६-११८.

८. तत्रैव, पृ. १३०-१३१.

९. J.P. Naik (editor), उ.नि., पृ. ७१-७२.

१०. य.दि. फडके (संपादक), *महात्मा फुले समग्र वाङ्मय*, म.रा.सा. आणि सं. मंडळ, मुंबई, सुधारित चौथी आवृत्ती, १९९१, पृ. ७२२.

११. J.P. Naik (editor), उ.नि., पृ. १२४-१२५.

१२. वा.ब. पटवर्धन. *शिक्षण, शिक्षक व अभ्यासक्रम*, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई, २०००, पृ. २३-३०.

१३. J.P. Naik (editor), उ.नि., पृ. १२५-१२६.

१४. In 1891, Mr. Justice Birdwood observed : "There can be no question that this examination which every year assumes larger proportion.... is, in the judgement of many who are well able to form a sound opinion on that point, a gigantic failure. School boys who have passed the Matriculation in order to enter a college not infrequently find themselves unable to understand the lectures which they attend. The Matriculation Examination, in short, furnishes a very insufficient test of a knowledge of English..." J.P. Naik (editor), उ. नि., पृ. २०७.

१५. वा.ब. पटवर्धन, उ. नि., पृ. ४३.

१६. J.P. Naik (editor), उ.नि., पृ. २०६.

१७. तत्रैव, पृ. १६२.

१८. Anthony J. Parel (editor), *Hind Swaraj and Other Writings*, Cambridge University Press, 1997, Cambridge, पृ. १००-१०६.

१९. Imperialism, then, was neither an adjunct to British history nor an expression of a particular phase of its industrial development but an integral part of the configuration of British society, which it both reinforced and expressed... It was spearheaded, not by manufacturing interests, but by gentlemanly elites who saw in empire a means of generating income flows in ways that rather were compatible with the high ideals of honour and duty, and it remained a dynamic, expanding force long after decline, as measured by British comparative industrial performance, is conventionally thought to have set in." P.J. Cain and A.G. Hopkins, *British Imperialism : Innovation and Expansion 1688-1914*, Longman, London and New York, 1993, पृ. ४६.

२०. Sir Donald MacLeod, the Lieutenant Governer of the Punjab, however, did not want to move too fast. He deplored the shortcomings of the system of education that began with Macaulay's Minute in 1835 which, as Major Lees has observed, had "produced a class of persons fit for serving as clerks in public offices and railway stations, but none who pos-

sesses true literary merit." J.P. Naik (editor), *Selections from Educational Records of the Government of India, Volume II*, National Archives, Government of India, Delhi, 1963, Appendix, पृ. ४७४.

२१. Frantz Fanon, *The Wretched of the Earth*, Penguin Books, Harmondsworth, १९७३, पृ. १९३.

२२. प्र.न. जोशी, *मराठी वाङ्मयाचा विवेचक इतिहास*, प्रसाद प्रकाशन, पुणे, १९७९, पृ. ५३.

२३. गं.दे. खानोलकर (संपादक), *डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर ह्यांचे वाङ्मयविषयक लेख*, मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९७४, पृ. ४१.

२४. प्र.न. जोशी, उ.नि., पृ. ९.

२५. रा.भा. पाटणकर, *अपूर्ण क्रांती*, मौज प्रकाशन, मुंबई, १९९९, पृ. १८५-१९१.

२६. 'कादंवरी वाङ्मयाला लागणारी जीवनविषयक निरीक्षणाची सामग्री, एक विशिष्ट वृत्ती व दृष्टिकोण इंग्रजी आक्रमणापूर्वी मराठी वाङ्मयात तयार होती,...' कुसुमावती देशपांडे, *मराठी कादंबरी – पहिले शतक, १८५०-१९५०*, मुंबई मराठी साहित्य संघ प्रकाशन, मुंबई, दुसरी आवृत्ती, १९७५, पृ. १६-१७.

२७. प्र.न. जोशी, उ.नि., पृ. ३७.

२८. तत्रैव, पृ. ३९.

२९. रा.भा. पाटणकर, उ.नि., पृ. २८१.



**Form IV**

रूल नं. ८, रजिस्ट्रेशन ऑफ न्यूजपेपर्स सेंट्रल रूल्स १९५६ अन्वये प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| **प्रकाशन स्थळ** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशन दिनांक** | : | दरमहा १ तारीख |
| **मुद्रक** | : | श्रीकृष्ण गजानन दीक्षित, व्यवस्थापक, *नवभारत* मासिक |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **प्रकाशक** | : | सीताराम रामचंद्र रायकर, चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | द्वारा – प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **संपादक** | : | वसंत विष्णू पळशीकर |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **पत्ता** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |
| **मालक** | : | प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा) |

मी, सीताराम रामचंद्र रायकर जाहीर करतो, की वर दिलेली माहिती माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे संपूर्णतः खरी आहे.

**सीताराम रायकर**
प्रकाशक



अनुक्रमणिका

ग्रंथ-परिचय

# डॉ. रा.भा. पाटणकरांचे *अपूर्ण क्रांती*

अशोक दुण्णाजी जोशी

डॉ. पाटणकरांच्या अलीकडेच प्रसिद्ध झालेल्या पुस्तकाचे नाव *अपूर्ण क्रांती* आहे. या नावामुळे जयप्रकाश नारायणांची संपूर्ण क्रांतीची संकल्पना आठवते. पण अपूर्ण क्रांती या शीर्षकाचा संबंध भारतात एकोणिसाव्या शतकात जी क्रांती सुरू झाली ती अपुरीच राहिली या अर्थाशी आहे. भारतातील आर्थिक, शैक्षणिक व साहित्यिक क्षेत्रात एकोणिसाव्या व विसाव्या शतकात जी परिवर्तने झाली, त्यामुळे भारतीय समाज बदलला. एका जुन्या युगातून नव्या युगात भारतीय समाज आला. पण हा बदल समाजातल्या सर्व स्तरात पोहोचला नाही. समाजाचा केवळ एक भागच बदलला. ही क्रांती काही प्रमाणात अपूर्णच राहिली. या अर्थाने पुस्तकाचे शीर्षक अन्वर्थक आहे. पण दुसऱ्या दृष्टीने पाहिल्यास ते काहीसे अलंकारिकही आहे.

व्यापारी म्हणून इंग्रज भारतात १६०० मध्ये आले. त्यानंतर निव्वळ व्यापारी म्हणून ते इथे जवळ जवळ दीडशे वर्षे वावरले. १७५७ च्या प्लासीच्या लढाईनंतर ते निव्वळ व्यापारी म्हणून न राहता बंगालचे राज्यकर्ते झाले. ब्रिटिशांची व्यापारी कंपनी – ईस्ट इंडिया कंपनी – राज्यकर्ती म्हणून आपली भूमिका नंतर शंभर वर्षे पार पाडत होती. मराठ्यांचा पाडाव केल्यावर ही कंपनी जवळजवळ सर्व भारताचा राज्यकारभार पाहू लागली. १८५७च्या स्वातंत्र्ययुद्धानंतर किंवा उठावानंतर इंग्लंडच्या पार्लमेंटने या कंपनीकडून कारभार स्वतःकडे घेतला. भारताचा राज्यकारभार १९४७ पर्यंत चालविला. गेल्या चारशे वर्षांचा हा इतिहास सर्वज्ञात आहे. पाटणकरांनी *अपूर्ण क्रांती* या पुस्तकात हा सारा इतिहास सांगितला आहे. पुस्तकाचे त्यांनी तीन भाग केले असून त्यात भारतातील आर्थिक, शैक्षणिक व साहित्यिक स्थितीचा व परिवर्तनांचा अभ्यास केला आहे.

इंग्रज इथे आले त्यावेळी इथले जीवन बरेचसे स्थितिशील होते. परकीयांशी आलेल्या संबंधांमुळेच त्यात थोडे परिवर्तन आले, त्या जीवनाला थोडी गती मिळाली. भारतीयांचे स्थितिशील जीवन गतिशील कसे झाले याचा पुराव्यानिशी आपल्या पुस्तकाच्या तीन भागांत पाटणकरांनी चांगला आढावा घेतला आहे. या पुराव्यांबरोबरच त्यांनी भरपूर संदर्भ व इंग्रजी, मराठी ग्रंथांची सूची दिली आहे.

सुरुवातीस आपण 'आर्थिक परिवर्तने' या पाटणकरांच्या पुस्तकाच्या पहिल्या भागाचा विचार करू. अगदी पुरातन काळापासून भारतीयांनी अर्थ या पुरुषार्थाकडे दुर्लक्ष केले नाही. नंतरही हिंदू राजे व मुसलमान राजांनीही अर्थाकडे दुर्लक्ष केले नाही. त्यांनी परदेशी व्यापार व व्यापारी या दोन्ही गोष्टींचे स्वागतच केले. इंग्रज लोक जोपर्यंत भारतात व्यापारी म्हणून राहिले, म्हणजेच जोपर्यंत त्यांना भारतावर राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा नव्हती, तोपर्यंत भारतात त्यांचे स्वागतच झाले. या घटनेतून पाटणकरांनी तीन निष्कर्ष काढले आहेत : १) भारतातील हिंदू व मुसलमान राज्यकर्त्यांना व इतरांनाही आपला ऐहिक अभ्युदय हवा होता, २) या ऐहिक अभ्युदयासाठी व्यापाराची फार मदत होते व कमीत कमी जकात तरी मिळते हे राज्यकर्त्यांना माहीत होते, ३) परदेशी व्यापाराचे सर्वांनी स्वागतच केले; त्यांच्या लष्करी महत्त्वाकांक्षेचे मात्र त्यांनी स्वागत केले नाही. या तीन निष्कर्षांच्या संदर्भात नंतर पाटणकरांनी ईस्ट इंडिया कंपनीच्या स्थापनेपासून इंग्रजांनी भारतात राज्य स्थापन करण्यापर्यंतचा इतिहास सांगितला आहे.

इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीने एतद्देशीय राज्यकर्त्यांनी दिलेल्या सवलतींचा दुरुपयोग करून लोकांची लूट केली. इंग्रजांचे जेव्हा प्लासीलढाईनंतर बंगालमध्ये राज्य स्थापन झाले, तेव्हा एतद्देशीयांचा दुहेरी तोटा झाला – १) इंग्रजांनी इथल्या राज्यकर्त्यांना कमी कर दिला व २) राज्यकर्ते या भूमिकेमुळे इंग्रज व्यापारी व इतर व्यापाऱ्यांत फरक पडला. बंगालमधल्या एतद्देशीय राज्यकर्त्यांत दुफळी झाल्याने त्यांनी प्रथम नागपूरच्या रघुजी भोसलेंना व नंतर इंग्रजांना मदतीसाठी बोलावले. बंगालमधील राज्यकर्त्यांनीच इंग्रजांना पाचारण केल्याने इंग्रजांचा धनलाभ झाला.

अनुक्रमणिका

रॉबर्ट क्लाइवने बंगालमध्ये पैसा खाऊन इंग्लंडमध्ये तो नेला ही वस्तुस्थिति पाटणकर मान्य करतात, पण त्या पैशामुळे इंग्लंडमध्ये आदिम भांडवलसंचय झाला हे रजनी पाम दत्तचे म्हणणे त्यांना मान्य नाही (२०).

इतिहासकार फिलीस डीन व डब्ल्यू.ए. कोल यांना उद्धृत करून पाटणकर मांडतात की, प्लासीच्या लढाईआधी सतरा-अठरा वर्षे इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती सुरू झाली होती; म्हणून प्लासीच्या लढाईमुळे इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती सुरू झाली या म्हणण्यात काहीच अर्थ नाही (२०).

भारतावर राज्य करावे असे इंग्रजांना सतराव्या शतकापासूनच वाटत होते हे इतिहासकार गो.स. सरदेसाईंचे मत पाटणकरांना मान्य नाही (२१-२२). अठराव्या शतकाच्या मध्यावर इंग्रजांना वाटले की, राज्य करण्याची भारतात योग्य स्थिति निर्माण झाली आहे. या इराद्यात ते सफल झाले व त्यांनी इथे राज्य स्थापन केले असे पाटणकरांना वाटते (२२).

अठराव्या व एकोणिसाव्या शतकात इंग्लंडात जे बदल झाले त्याची अनेक कारणे होती. १) शेतीच्या क्षेत्रात 'एन्क्लोझर मूव्हमेंट' ('कुंपणीकरण') द्वारा घडून आलेले परिवर्तन व शेती उत्पादनात झालेली वाढ व फेरबदल, २) लोकरी कापडाचा नव्या जोमाने सुरू झालेला व्यापार, ३) दळणवळणात झालेली क्रांती, ४) जलवाहतुकीतील सुधारणा, ५) तंत्रविद्येतील सुधारणा, ६) वसाहतींची स्थापना, साम्राज्यवादाचा उदय, ७) राष्ट्रीय आर्थिक धोरण व ८) फ्रेंच राज्यक्रांती.

इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात जी औद्योगिक क्रांती झाली त्याची अनेक कारणे होती. अठराव्या शतकात भांडवलसंचयाला सुरुवात झाली, बाजारपेठा प्रस्थापित झाल्या, राजकीय-सामाजिक स्थैर्य व सुव्यवस्था निर्माण झाली. कच्चा माल उपलब्ध झाला व त्याच वेळी तंत्रज्ञानातील कौशल्ये व व्यापारी कौशल्ये उपलब्ध झाली. धाडसी व उद्योगी लोकांनी मोठी हिंमत दाखवून बरेच परिश्रम केले व यश मिळविले. त्यांनी भरपूर काम केले व पैसा, ज्ञान व अनुभव या तिन्ही गोष्टी मिळविताना कोणताही गंड त्यांनी ठेवला नाही (३०).

एकोणिसाव्या शतकात "इंग्लंड हे सबंध जगाचा कारखाना, सर्व जगाची बँक, जगड्व्याळ वाहतुकीचे केंद्रस्थान बनले होते" असे पाटणकर म्हणतात. (३३) अठराव्या शतकात एक प्रचंड आर्थिक शक्ती असलेले इंग्लंड भारतीय उपखंडासमोर एक आव्हान म्हणून उभे राहिले. शिस्तबद्ध सैन्य व आधुनिक शस्त्रास्त्रे ही इंग्लंडची केवळ साधने होती असे पाटणकर मानतात. त्यांच्या मते भारताचा इतिहास सोळाशे ते अठराशे व अठराशे ते एकोणीसशे सत्तेचाळीस अशा दोन भागांत विभागणे शक्य आहे. या तीनशे सत्तेचाळीस वर्षांतील सोळाशे ते अठराशे या काळात राज्यकर्ते सुखी होते यात काही प्रश्न नाही. पण त्या दोनशे वर्षांच्या काळात प्रजाजन सुखी होते का, हा अनुत्तरित प्रश्न आहे असे पाटणकरांना वाटते. राज्यकर्त्यांची श्रीमंती प्रजाजनांच्या श्रीमंत नसण्यावर आधारलेली होती का, हाही विचार करण्यासारखा प्रश्न आहे असे त्यांना वाटते.

ब्रिटिशांचे राज्य प्रस्थापित होण्यापूर्वी इथले प्रजानन सुखी होते असे काही लोकांचे म्हणणे आहे. उदाहरणार्थ, राष्ट्रवादी आर्थिक इतिहासकार ब्रिजनारायण यांचे Indian Economic Life – Past and Present हे १९२९ सालचे पुस्तक. त्यांनी आपल्या पुस्तकात परदेशी कागदपत्रांचा भरपूर वापर केला असून १५८३ ते १६८३ या काळात सामान्य माणसाला जीवनोपयोगी वस्तू स्वस्त व विपुल प्रमाणावर भारतात उपलब्ध होत्या असे म्हटले आहे. त्याकाळी भारतात अनेकदा दुष्काळ पडत हे म्हणणे चूक आहे असेही ब्रिजनारायणांचे म्हणणे आहे (३६).

पण पाटणकर म्हणतात, ब्रिजनारायणांचा हा दावा बरोबर नाही असे दाखवणारे पुरावे व तेही परदेशी पुराव्यावर आधारलेले मिळतात. मोरलँडची *India at the Death of Akbar* व *From Akbar to Aurangzeb* ही दोन पुस्तके ब्रिजनारायणांच्या दाव्याला छेद देतात. मोरलँड असे निष्कर्ष काढतात की, "येथील विणकर स्वतःला पुरेसे कपडे नसतानाही इतरांसाठी (श्रीमंतांसाठी) वस्त्रे निर्माण करीत होते. शेतकऱ्यांकडे स्वतःचे पोट भरण्याइतके अन्न नसतानाही ते शहरांकडे धान्य पाठवीत असत... ऋतूमागे ऋतू कसेबसे पोट भरणारे हे शेतकरी थोडेतरी धान्य मिळत असेपर्यंत तग धरत. तो पुरवठा संपला – उदाहरणार्थ, दुष्काळाच्या वेळी – म्हणजे आत्महत्त्या करणे, अन्नासाठी स्वतःला गुलाम म्हणून विकून घेणे, अन्नाशिवाय तडफडून मरणे, इतर माणसांना मारून त्यांचे मांस खाणे इतकेच पर्याय शेतकऱ्यांकडे उरत." (३६)

दुष्काळ नेहमीच पडत. स्वाभाविकपणेच गरिबांची त्यात अन्नान्नदशा होई. राजा अधिकाऱ्यांना पगार न देता काही

जहागिरी वाटून देई व जहागिरदार-सरंजामदार सारावसुली व इतर वसुली लोकांकडून करीत. गरिबांचे या व्यवस्थेत हाल होत. भारतीय लोकांच्या मूलभूत गरजा देशातच होणाऱ्या गोष्टींवर भागत. परदेशांतून मुख्यतः सोने, चांदी असे किंमती धातू आयात होत असत. पण त्यावेळची आयात-निर्यात जास्त नव्हती. "आजची एक आगगाडी एका आठवड्यात जितका माल नेऊ शकते तितकाच माल अकबराच्या काळात एका संपूर्ण मोसमात इकडून तिकडे नेला जात असे (४०). त्यावेळचा सागरी व्यापारही फार नव्हता व जो होता त्यातला बराचसा परदेशी व्यापाऱ्यांच्या हातात होता. आक्रमक परकीय फौजा, आपलेच अत्याचारी राज्यकर्ते व अधिकारी, नैसर्गिक संकटे, दुष्काळ यामुळे तेव्हा वरेचदा सामान्य माणसाची पिळवणूक होत असे व अर्थव्यवस्थेचीही वाताहत होत असे.

"भारतातील उत्पादक शेतकरी व कारागीर कितीही कुशल व मेहनती असले तरी ते ज्या सरंजामी अर्थव्यवस्थेत जगत होते तिच्यात त्यांचा अभ्युदय होणे अशक्य होते. जर 'सुवर्णयुग' याचा अर्थ त्यात सर्वसामान्य कष्टकरी जनता सुखी असते असा काळ असा घेतला, तर या अर्थाने मध्ययुगीन भारतात सुवर्णयुग कधीच नव्हते या पॅवलॉव्हच्या मूल्यनात खूपच तथ्यांश आहे असे मानावे लागते" (४४). पाटणकरांचे पॅवलॉव्हला उदधृत करून दिलेले हे मत चिंतनीय आहे.

इथला अतिरिक्त पैसा भांडवलसंचयाकडे न वळता भपकेबाज जगण्याकडे, धार्मिकतेकडे, कला व विद्वत्ता याला प्रोत्साहन देण्याकडे वळला. अतिरिक्त पैशांमुळे भांडवलसंचय होतो व त्यामुळे औद्योगिक क्रांतीसाठी आवश्यक असणाऱ्या लोखंड व कोळशाची उपलब्धता होते. त्यासाठी नवे विज्ञान व तंत्रज्ञान वापरले जाते. पण भारतीय समाजात भांडवलसंचय झाला नाही, नवे विज्ञान व तंत्रज्ञान आले नाही व भारतीय समाज सरंजामशाहीतच राहिला, असे पाटणकर म्हणतात (६४). पुणे शहर त्यावेळी उत्पादनाचे केंद्र नव्हते; उपभोक्त्यांचे ते शहर होते. सारा, खंडणी व लूट या तीन मार्गांनी त्याचे अर्थार्जन होई. मोहिमेवर जाणाऱ्या सरदारांना व्यापाऱ्यांनी पैसे देणे व सराफी करणे हे तिथले प्रमुख व्यवसाय होते. भांडवलसंचयाच्या अभावामुळे, भारतातले कोठलेही राज्य आर्थिक नकाशावर नव्हते. त्याचे आर्थिक, सामाजिक, लष्करी बळ व येथील विज्ञान व तंत्रज्ञान कमकुवत असल्याने पाश्चात्त्य सत्तांनी आपल्या आर्थिक बळावर व सैन्यबळावर येथील राज्ये जिंकली असे पाटणकर सप्रमाण मांडतात. १८५७ चा उठाव जरी यशस्वी झाला असता तरी यात काही फरक पडला नसता. तो जरी यशस्वी झाला असता तरी त्यामुळे आपली शेती, उद्योगधंदे व व्यापार यांची संतुलित वाढ झाली असती असे मानायला जागा नाही. त्यात यशस्वी झाल्यामुळे सरंजामशाहीचे एक नवे पर्व सुरू झाले असते इतकेच, असे पाटणकर म्हणतात (६५).

सरंजामशाहीत घराणेशाही व वंशपरंपरागत वतनदारीचे महत्त्व वाढते. कोणताही शासनकर्ता ती मोडण्याचा प्रयत्न करीत नाही. अगदी शिवाजीनेही तसा प्रयत्न केला नाही. असे पाटणकर म्हणतात (५३). यावेळी स्वामिनिष्ठा हे सर्वात महत्त्वाचे मूल्य ठरते. समाजनिष्ठा, राष्ट्रनिष्ठा ही मूल्ये अजून प्रस्थापित व्हायची होती. अधिकाऱ्यांतही हेच वातावरण होते. उदाहरणार्थ, वृद्ध औरंगजेबाला आपले अधिकारी गरीब रयतेला छळतात या गोष्टीची चिंता वाटत असे, असे पाटणकर म्हणतात (५७).

फुकटात काम करून घेणे किंवा वेठबिगार पद्धतीला आज आपण वाईट मानतो, पण इंग्रजपूर्व काळातील मध्ययुगात ही पद्धती सार्वत्रिक होती. स्वामिनिष्ठ नसण्याबद्दल, काम न करण्याबद्दल शारीरिक छळ ही नेहमीची रीत व वस्तुस्थिती होती (५७ व ५९). आर्थिक विवंचना गरिबांना होतीच, पण राज्यकर्तेही तीमधून सुटले नाहीत. उदाहरणार्थ, नानासाहेब पेशव्याला मिळालेली पेशवाईची वस्त्रे कर्जामुळे सुखकारक न ठरता त्रासदायक ठरली. जन्मभर कर्जाने गांजला जाऊन पराक्रमी पहिला बाजीराव कर्जातच मरण पावला. मृत्यूसमयी त्याचे चौदा लाखांचे कर्ज होते व सावकारांची संख्या तीस होती. नानासाहेब पेशव्याने ही आर्थिक स्थिती थोडी सुधारली. त्याने उत्तर हिंदुस्थानातील द्रव्यनद्यांच्या प्रवाहाचे ओघ महाराष्ट्राकडे वळवले. प्रचंड फौजा ठेवणे, जवळच्या लष्करी सत्तेपासून आपले रक्षण करणे, खंडण्या वसूल करणे हे मार्ग मराठ्यांना द्रव्यार्जनासाठी पत्करावे लागले. खरे पाहता शेतकरी व कारागीर हे द्रव्योत्पत्ती करीत होते व सरंजामदार ही संपत्ती हडप करीत होते. हे चक्र अव्याहतपणे चालू होते (५७-५९).

सरंजामदारीबरोबरच 'जैसे थे वाद' किंवा 'ठेविले अनंते तैसेचि रहावे" हा हिंदू दृष्टिकोणही त्यावेळच्या आर्थिक चिंतेला कारणीभूत ठरला. हिंदू धर्मात धर्म, अर्थ, काम व

अनुक्रमणिका

मोक्ष या चारही पुरुषार्थांना समान महत्त्व असले तरी या काळात धर्म व मोक्ष या निवृत्तीपर पुरुषार्थांना महत्त्व मिळाले. या जगाशी संबंधित असलेले अर्थ व काम हे पुरुषार्थ दुर्लक्षित राहिले. गरिबांकरिता तर धर्म व मोक्ष हे पुरुषार्थ फारच महत्त्वाचे ठरले.

विज्ञान व तंत्रविद्या या महत्त्वाच्या गोष्टी आहेत हेच मध्ययुग विसरले. त्या काळी प्रगल्भ तंत्रविद्या नव्हती व त्यामुळे उत्पादित वस्तूंच्या किंमतीही कमी नव्हत्या. उपलब्ध निसर्गशक्तीची मदत घेणारी तंत्रविद्या त्यावेळी नव्हती(४६). उदाहरण देताना पाटणकर तत्कालीन लोखंडाच्या उपलब्धतेकडे लक्ष वेधतात. ते म्हणतात की, एतद्देशीय गरजा शेतीची-औजारे, तलवारी, ढाली इत्यादी – भागवण्यासाठी उपलब्ध लोखंडाचा उपयोग होऊ शकतो. पण रेल्वे तयार करणे यासारखी प्रचंड व आधुनिक गरज भागविण्यासाठी ते लोखंड अपुरे पडते. मग नव्या तंत्रविद्येने उपलब्ध झालेले अधिक लोखंड मिळविण्यासाठी आपल्याला प्रगत देशांकडे वळावे लागते.

एकोणिसाव्या शतकातील भारताविषयी म्हणजे इंग्रजी अंमलाखालील भारताविषयी विविध मते आहेत. धरमपाल यांसारखे अलीकडील गांधीवादी लेखक इंग्रजांनी केलेल्या गोष्टी स्वतःच्या भल्यासाठी केल्या, भारताच्या वा येथील लोकांच्या भल्यासाठी त्या केल्या नाहीत असे म्हणतात. याउलट दादाभाई नवरोजी, म.गो. रानडे यांसारख्या पूर्वसूरींना इंग्रजी राजवट काही बाबतींत चांगली, तर काही बाबतींत वाईट दिसली (६९). भारताचा आर्थिक देवाण-घेवाणीत कसा तोटा होतो हे दादाभाईंनी दाखविले. आर्थिक गळती झाल्यामुळे भारतात भांडवलसंचय झाला नाही असे दादाभाईंनी म्हटले. पण त्यावेळी वसाहतीतल्या लोकांची क्रयशक्ती काय होती हाही विचार करण्यासारखा मुद्दा आहे. पाटणकरांना वाटते की, देशीवादी लोकांनी इथल्या लोकांची त्यावेळी क्रयशक्ती कमी होती हे लक्षात घ्यावे (८१).

भारतीय सरंजामी राज्यकर्त्यांनी राज्याचा खर्च भागविण्यासाठी साऱ्याची रक्कम वाढविणे हा धोपट मार्ग स्वीकारला. त्यावेळी आपले खरेखुरे उत्पन्न किती होते हे दाखविण्यासाठी पाटणकर ग.व्यं. जोशींना उद्धृत करतात, "ज्या वेळी इंग्लंडचे उत्पन्न दरडोई ४१ पौंड, ऑस्ट्रेलियाचे ४३.४ पौंड, युनायटेड स्टेट्सचे २७.२ पौंड होते, त्यावेळी भारताचे दरडोई उत्पन्न फक्त २ पौंड होते." (८७)

भारतात औद्योगिक क्रांती घडविण्याबद्दल व भारताची औद्योगिक प्रगती घडविण्याबद्दल इंग्लंड उदासीन वाटत होते, पण खुद्द इंग्लंडमध्येच आर्थिक प्रगती सरकारने केली नाही तर खाजगी व्यक्तींनी केली असे पाटणकर सांगतात : "जे त्यांनी खुद्द इंग्लंडमध्ये केले नाही ते भारतात करावे, असा विचार त्यांना शिवलाही नसेल." (८९)

खंडणी, राष्ट्रीय कर्ज, होम चार्जेस या विविध नावांखाली गोळा केलेल्या पैशाचा बराचसा भाग इंग्लंडकडे जात असे (९६). पण इंग्लंडकडे वळवलेले पैसे इथे कमी पैसे असण्याचे एक लहान कारण होते. भारतात भांडवलसंचय होत नव्हता व इथल्या जगतात काही महत्त्वाची हालचाल होत नव्हती हे इथल्या दारिद्र्याचे खरे कारण होते.

व्यक्तिवाद हे नव्या युगाचे मूल्य होते व तो शिक्षक, व्यापारी, इंग्रजी प्रशासक व मिशनऱ्यांनी इथे आणला. मिशनरी ही त्यावेळची मोठी ताकद होती. मिशनऱ्यांनी व्यक्तिवाद औद्योगिक क्रांतीसाठी आणला नाही. जास्तीत जास्त लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारावा, त्यांचे भले व्हावे, जुन्या आर्थिक व राजकीय चौकटीतून त्यांनी बाहेर पडावे असे मिशनऱ्यांना वाटत असे (६९).

लोकांना मदत करण्याची काही कामे इंग्रजांनी केली हे मान्यच करावे लागेल. पाणीपुरवठा सुरू करणे, कालवे खणणे, रेल्वे सुरू करणे, दळणवळणाची साधने वाढविणे, नवी सारा व्यवस्था सुरू करणे, नवे वस्त्रोद्योग सुरू करणे, कायदेकानू बदलणे, दलित व स्त्रियांच्या बाबतीत नवे कायदे करणे अशी बरीच लोकोपयोगी कामे इंग्रजांनी केली. हे सर्व त्यांनी स्वतःच्या सोयीसाठी, राज्य चालविण्यासाठी उपयोगी पडते म्हणून केले असेल. पण त्याचा उपयोग इथल्या लोकांना व विशेषतः पददलितांना झाला हे निर्विवाद सत्य आहे. इंग्लंडमधील भांडवलदारी-औद्योगिक ताकदीने, अहेतुतः असेल, पण भारताच्या औद्योगीकरणास चालना देऊन भारताला सरंजामशाहीतून वर काढले हे सत्यच आहे. भारतात याच काळात सामाजिक-आर्थिक परिवर्तन झाले. *अपूर्ण क्रांती* या पुस्तकाच्या पहिल्या भागातील पाटणकरांचे हे मत देशीवाद्यांना, उत्तर-आधुनिकतावाद्यांना व उत्तर- वसाहतवाद्यांना आवडणार नाही, पण त्यातील सत्यभाग सर्वांनाच मान्य करावा लागेल.

भांडवलदारी समाजाने सरंजामशाही समाजाचा पाडाव करणे हे स्वाभाविक व अटळ होते असे पाटणकर म्हणतात.

म्हणून भारत-इंग्लंड संबंधांकडे केवळ राजकीय संबंध म्हणून न पाहता आर्थिक संबंध म्हणूनही पाहणे आवश्यक आहे, असे पाटणकर आवर्जून सांगतात.

"पूर्वी स्वतःच्या जीविताची व संपत्तीची शाश्वती नव्हती. नव्या राजवटीत शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित झाली. कायद्याने राज्य चालू झाले. सोन्यासारख्या गोष्टी अगदी उघडपणे बरोबर घेऊन लोक कोठेही प्रवास करू लागले. हे एक अप्रूप होते." (९९)

व्यक्तिवाद व शिक्षणप्रसार ही एकोणिसाव्या शतकाची प्रमुख वैशिष्ट्ये होती. शिकणाऱ्यांच्या संख्येचा दबाव तेव्हा नव्हताच. जे शिकायला येत ते विद्यार्जनाला महत्त्व देत, परीक्षेला नाही.

एकोणिसाव्या शतकातील इंग्रज अधिकाऱ्यांविषयी अनेकांकडून मिश्र स्वरूपाचे मूल्यमापन झाले आहे. बऱ्याच लोकांचे असे मूल्यमापन आहे की, त्या वेळचे काही इंग्रज अधिकारी चांगले, तर काही वाईट होते. त्यांनी काही चांगल्या गोष्टी केल्या, तर काही वाईट गोष्टी केल्या. काही इंग्रज अधिकारी त्यांच्या भारतातल्या वागण्यामुळे इंग्लंडमध्येही कुप्रसिद्ध झाले. लॉर्ड कॉर्नवॉलिसच्या इथल्या आगमनानंतर अधिकाऱ्यांना पगारवाढ मिळाली व त्यांना खास प्रशिक्षणही मिळाले. त्यामुळे इंग्रज अधिकाऱ्यांची प्रतिमा उजळली. त्याबरोबरच नव्याने जागृत झालेली धार्मिकता, आध्यात्मिकता, नैतिकता यामुळे हे बदलते वातावरण उदारमतवादी झाले होते. पण एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस हे वातावरण बदलले. इंग्लंड साम्राज्यवादी व वसाहतवादी राष्ट्र बनले. ते बेल्जियम, अमेरिका व जर्मनी यांच्याशी साम्राज्यवादी बनून स्पर्धा करू लागले.

भारत ही वसाहत सोडून आपल्याला एक ना एक दिवस परत जावे लागेल हे इंग्रजांना माहीत होते. राज्य चालविण्यासाठी इथे कार्यक्षम कारागीर, नोकर, प्रशासक व चांगले नागरिक बनवण्यासाठी इंग्रजांनी इथल्या शिक्षणाची आखणी केली.

इंग्रजांनी या काळात शिक्षण व शासनव्यवस्थेची जी आखणी केली त्याबद्दल एडवर्ड सैद या प्रसिद्ध विचारवंताने आपल्या *ओरिएंटॅलिझम* या गाजलेल्या पुस्तकात विवेचन केले आहे. त्याचे विवेचन प्रसिद्ध इटालिअन मार्क्सवादी विचारवंत आन्तोनिओ ग्राम्स्की याच्या *प्रिझन नोटबुक्स* या पुस्तकातील भूमिकेचा आधार घेते. सैदच्या मते ओरिएंटॅलिझम ही पाश्चात्त्य माणसांची पौर्वात्यांबद्दलची कल्पना आहे. पौर्वात्य लोकांची जी प्रतिमा पाश्चात्त्यांसमोर आहे तीप्रमाणे ते पौर्वात्यांना समजून घेतात. पौर्वात्यांचा पाश्चात्त्य नजरेतून केलेला अभ्यास म्हणजे ओरिएंटॅलिझम. हा अभ्यास अर्थातच पूर्वदूषितच असणार. या पूर्वदूषित नजरेने काही पौर्वात्यही स्वतःकडे पाहू लागले.

सैदचे हे म्हणणे पाटणकरांना मान्य नाही. ते सांगतात की, १६०० ते १८१३ पर्यंत एकूण दोनशे तेरा वर्षे पाश्चात्त्यांनी (इंग्रजांनी) भारताच्या धार्मिक-सामाजिक जीवनात ढवळाढवळ केली नाही. या काळात इंग्रजांनी भारतात मिशनऱ्यांना येऊ दिले नाही. या वस्तुस्थितीमुळे त्यांना सैदचे ओरिएंटॅलिझम संबंधीचे म्हणणे प्रस्तुत व उपयुक्त वाटत नाही. इंग्रजांचा व्यक्तिवाद व उदारमतवाद दुर्लक्षिता येण्यासारखा नाही असे त्यांना वाटते. त्याच वेळी ते हे पण मान्य करतात की, क्रुसेड्समुळे युरोपिअनांना अरबांबद्दल एक प्रकारची आदरयुक्त भीती वाटत होती, तर भारतीयांना दुय्यम दर्जाचे लोक म्हणून मानणे व तसे वागवणे त्यांना शक्य होते. सैदच्या यासंबंधीच्या अभिप्रायाशी ते सहमत होतात, पण त्याच्या वर्चस्वस्थापन सिद्धान्ताशी ('हेगेमनी') मात्र ते सहमत होत नाहीत (१०३) त्यांना पूर्ण आर्थिकवाद (इकॉनॉमिझम्) व पूर्ण संस्कृतीवाद मान्य नाही, पण मार्क्सचा आर्थिक पाया अधिरचना सिद्धान्त मात्र त्यांना मान्य आहे (१०५).

इंग्रजी काळातील आर्थिक स्थितीसंबंधी आपले अभ्यासपूर्ण मत मांडल्यावर पाटणकर त्या काळातल्या शिक्षणव्यवस्थेकडे वळतात.

भारतात एकोणिसाव्या शतकात आधुनिक शिक्षण सुरू झाले व ते इंग्रजांनी सुरू केले हे मत सर्वांनाच मान्य आहे. त्याआधी संस्कृत पाठशाळा व व्यवहारज्ञान देणाऱ्या शाळा अशा दोनच प्रकारच्या शाळा भारतात होत्या. ब्रिटिशपूर्व काळातील शिक्षणाविषयी लिहिणारे परुळेकर-नुरुल्ला-नाईक हे पाटणकरांना अधिक विश्वसनीय वाटतात, तर धरमपालां-सारखे राष्ट्रवादी, गांधीवादी त्यांना अभिनिवेशी, विवाद्य व राष्ट्रीयतेच्या एका विशिष्ट अभिमानाने लिहिणारे वाटतात. धरमपालांनी दिलेला पुरावा ते चिकित्सक दृष्टीने पाहून मगच स्वीकारतात. "इंग्रज येण्याआधी भारतीय शिक्षणव्यवस्था उत्तम होती व इंग्रजांनी सर्व गोष्टींत बिघाड केला" हे धरमपालांचे म्हणणे पाटणकरांना मान्य नाही.

शिक्षण जीवनोपयोगी असावे की व्यवहारोपयोगी असावे हा वाद त्यावेळीही होता. पहिले भारतीय कुलगुरू न्यायमूर्ती काशिनाथ त्रिंबक तेलंग यांना उदधृत करून पाटणकर लिहितात, "विशेषीकरणाकडे वळण्यापूर्वी विद्यार्थ्यांना जीवनात उपयुक्त ठरतील अशा विविध विषयांची माहिती आवश्यक आहे. या प्रकारचा अभ्यासक्रम लावला तरच चांगला नागरिक निर्माण होईल." (१३७) व्यवहारी, विशेषीकृत ज्ञानापूर्वी मनाचे उन्नयन करणारे, सुसंस्कृतता निर्माण करणारे, चांगले नागरिक निर्माण करणारे शिक्षण न्यायमूर्ती तेलंगांना आवश्यक वाटत होते.

त्यावेळी पाठ्यक्रमांत जी पुस्तके लावली गेली (व अजूनही जी लावली जातात) ती वलयांकित (canonize) होती, हे देशीवाद्यांचे, उत्तर-आधुनिकतावाद्यांचे म्हणणे पाटणकरांना मान्य नाही. त्याकरिता ते वरीच उदाहरणे देतात. त्यांचे स्वानुभवावर आधारलेले असे मत आहे की, ती पुस्तके निवडण्यात कोठलेही वर्गीय, वांशिक, साम्राज्यवादी, पुरुषी हितसंबंध नसणार; त्यावेळच्या अभ्यासमंडळांना (वोर्ड्स ऑफ स्टडीज) जी पुस्तके चांगली वाटली व जी पुस्तके बाजारात उपलब्ध होती ती अभ्यासासाठी लावली गेली. वलयांकित पुस्तके व विशिष्ट हेतूने ती लावणे असा कोठलाही प्रकार त्यावावतीत झाला नसणार. हे भारतात जसे घडले, तसेच इंग्लंडमध्येही घडले असणार. त्यात काही हेतू होता असे म्हणणे पाटणकरांना योग्य वाटत नाही (१३६ ते १५५).

आपले राज्य चालविण्यासाठी उपयोगी पडेल असे शिक्षण ब्रिटिशांनी दिले, आपल्या राजवटीत व नंतरही 'काळे साहेब' निर्माण होतील अशी शिक्षणपद्धती त्यांनी निर्माण केली, ते वंशवादीपणे वागले, त्यांना येथील जातीव्यवस्था मान्य होती, हे देशीवाद्यांचे, उत्तर-वसाहतवाद्यांचे विविध आरोप पाटणकरांना मान्य नाहीत. आपण वस्तुनिष्ठपणे परिस्थितीकडे पाहिले पाहिजे असे ते म्हणतात तेव्हा त्यांच्याशी सहमत व्हावे लागते.

पाटणकरांच्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकात तिसरा व शेवटचा भाग 'मराठी साहित्याचा इंग्रजी अवतार' हा साहित्याच्या अभ्यासकांच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. या भागात त्यांनी इंग्रजकाळातील मराठी साहित्याचा विचार केला आहे. त्यात त्यांनी मराठीतील त्यावेळी गाजलेल्या *मराठी ज्ञानप्रसारक* व *विविधज्ञानविस्तार* या दोन नियतकालिकांचा सविस्तर विचार केला आहे, त्यांना उदाहरणासहित दाखवायचे होते की, त्यावेळी काही लोक ज्ञानासाठी भुकेलेले होते व त्यांनी या मासिकात लिहिले व ही मासिके वाचली (२०९-२२४). त्यावेळी नवे वाङ्मयप्रकार मराठीत आले. मराठी व संस्कृतमध्ये निबंध हा वाङ्मयप्रकार नव्हता. इंग्रजीतून हा वाङ्मयप्रकार मराठीत आला. थोड्याच काळात मराठीत या वाङ्मयप्रकाराची जी वाढ झाली ती स्तिमित करणारी होती. चिपळूणकरांनी आपल्या *निबंधमाले*तले निबंध लिहिताना जो आत्मविश्वास दाखवला, जे वैविध्य दाखविले, जी कल्पकता दाखविली ती पाटणकरांना आशादायक घटना वाटते (२०९).

याच काळात समीक्षेचीही मराठीत प्रगती झाली. पूर्वीच्या संस्कृत टीकेत काव्यपंक्तींचा अर्थ सांगून त्यावर मल्लीनाथी केली जात असे. पाश्चात्त्य समीक्षेत मात्र या दोन्ही गोष्टींवरोबरच साहित्याचे अर्थनिर्णयन व मूल्यमापन केले जात असे. मराठीने थोड्या काळातच पाश्चात्त्य समीक्षेची ही वैशिष्ट्ये आत्मसात करून प्रगल्भता दाखवली, प्रगती केली.

उदाहरणासाठी पाटणकरांनी दादोवा पांडुरंगांची मोरोपंतांच्या केकावलीवरील समीक्षा घेतली आहे. केकावलीचे आपल्या समीक्षेत दादोबा पांडुरंगांनी मूल्यन केले आहे, तिच्या लोकप्रियतेची कारणमीमांसा केली आहे, औचित्याचा विचार केला आहे, ईश्वर-मानव संबंध हा तात्त्विक विषय हाताळला आहे. समीक्षेचे विशिष्ट पुस्तकाच्या बावतीत केलेले हे उपयोजन व विस्ताराने केलेली समीक्षा, समीक्षापद्धतीची कोणतीही ओढाताण न करता केली असे पाटणकर अभिमानाने सांगतात (२००).

मराठी कवितेइतकीच तिची समीक्षाही जुनी आहे, व संस्कृतमधल्या साहित्यशास्त्राप्रमाणे मराठी वाङ्मय निर्माण झालेले नाही, ही डॉ. केतकरांची दोन मते पाटणकर विचारासाठी घेतात. आपण लक्षात घेतले पाहिजे की, केतकरांनी उपयोजित वरोबरच सैद्धान्तिक समीक्षाही केली आहे. केतकरपूर्व मराठी समीक्षेत या दोन्ही गोष्टी अभावानेच झाल्या. डॉ. केतकर 'मराठी काव्यपरीक्षणाचा इतिहास' लिहू पाहत होते. मराठी परंपरेत काव्यपरीक्षण नसल्यामुळे त्यांना काव्यपरीक्षणाचा इतिहास लिहिता आला नाही (१९३). संत रामदासांनी सैद्धान्तिक परीक्षण केले आहे असे रा.श्री. जोग म्हणतात. त्यांच्याशी पाटणकर सहमत होतात. पण ते पुढे बजावतात

अनुक्रमणिका

की, संत रामदासांची कर्तबगारी एका व्यक्तीची कर्तबगारी होती; त्यातून परंपरा निर्माण झाली नाही.

कादंबरी हा वाङ्मयप्रकार एकोणिसाव्या शतकात उदय पावला व नावारूपास आला. अद्‌भुतरम्यतेकडून कादंबरीची वाटचाल वास्तवदर्शनाकडे होत होती. इंग्रजीतल्या आदर्शांची या वेळी मराठीला मदतच होत होती. कादंबरीने पन्नास-साठ वर्षांतच मोठा पल्ला गाठला हे हरिभाऊ आपट्यांच्या *पण लक्ष्यात कोण घेतो* या कादंबरीवरून स्पष्ट होते. त्याआधीच्या *यमुनापर्यटन किंवा हिंदु विधवांच्या स्थितीचे निरूपण* या कादंबरीला काही मराठी साहित्य इतिहासकार पहिली वास्तव-दर्शक व वास्तववर्णनात्मक कादंबरी मानतात. पाटणकरांना हे मत मान्य नाही. ते म्हणतात की, "तिला कादंबरी व त्यातही वास्तवदर्शक कादंबरी का म्हणायचे हे कळत नाही." (२४४) त्यांच्या मते तीमध्ये सलग कथावस्तू नाही, विशिष्ट पात्रांना आलेले अनुभव इथे दिलेले आहेत असे म्हणावे तर मध्यवर्ती अशी पात्रे तीमध्ये नाहीत. यमुना व विनायकराव यांना मध्यवर्ती पात्रे मानल्यास त्या जिवंत व्यक्ती वाटत नाहीत. त्यांच्या भावना, ईप्सिते, प्राप्तव्ये स्पष्ट नाहीत. त्यांचा जीव कोणात गुंतलेला दिसत नाही. लेखका-प्रमाणेच वाचकही पात्रांना कळसूत्री बाहुल्या समजतात असे पाटणकर म्हणतात (२४५). त्यांच्या चित्रणापेक्षा अधिक प्रत्ययकारी चित्रण बाबा पदमनजींच्या *अरुणोदय* या आत्म-चरित्रात आहे, त्यात जातींची उतरंड, बाटवाबाटवी, हिंदूंचे शतखंडित रीतिरिवाज दिसतात असे पाटणकरांचे मत आहे (२४५-२४६).

सैद्धान्तिक समीक्षेविषयी विचार करता इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांचा कादंबरीवरील विस्तृत लेख देशीयता व देशीवाद यांची समर्थ सैद्धान्तिक मांडणी करणारा आहे. याशिवाय राजवाडे भाषांतराच्या मर्यादा सांगतात. ते म्हणतात, "भाषांतरे ही आमच्या अस्सल प्रतिभेची प्रजा नव्हे – आमचा आत्मा, आमचा स्वभाव, आमचा उत्साह, आमची महत्त्वाकांक्षा, आमचा पुरुषार्थ त्या नकलेत नाही."(२५४) आपल्या लेखात राजवाडे वास्तवदर्शी कादंबरीची तरफदारी करतात. त्याच वेळी राजवाडे बजावतात की, कादंबरीकाराने मेहनतीने पूर्वतयारी केली पाहिजे, सर्व भाषांतील जागतिक दर्जाच्या कादंबऱ्या त्यांनी वाचल्या पाहिजेत, त्यांना इथली समाजस्थिती नुसती माहिती पाहिजे असे नाही, तर इथल्या समाजस्थितीने ते अस्वस्थ झाले पाहिजेत, त्यात ते समाविष्ट झाले पाहिजेत (२५३).

आपला देशीवाद स्पष्ट करताना राजवाडे म्हणतात, "श्रेष्ठ विद्या, विस्तृत वाचन, मोठा प्रवास, तीक्ष्ण निरीक्षण, कडक परीक्षण, थोर औदार्य, गाढ सहानुभूती व नाटकी लेखणी हे गुण तर नाव घेण्यासारख्या प्रत्येक कादंबरीकारात हवेतच. परंतु सर्वांत मुख्य गुण म्हटला म्हणजे जाज्वल्य मनोवृत्ती हवी. ही मनोवृत्ती कृत्रिम तऱ्हेने येणे नाही; ही ईश्वराची देणगी आहे." (२५३)

कादंबरीकाराची जाज्वल्य मनोवृत्ती हेच देशीवादाचे पायास्वरूप आहे. परदेशी साधनांच्या वापराला त्यांचा आक्षेप नाही. त्यांच्या मते परदेशी साधनांचा वापर करायचा, पण आशय मात्र इथलाच. मूल्य ठरविण्याचे निकष देशी असे नाहीत तर आंतरराष्ट्रीय, असा राजवाड्यांचा युयुत्सु देशीवाद होता. देशीपणाला, प्रादेशिकपणाला ते संरक्षण देऊ इच्छित नव्हते (२४५).

कादंबरीकार भालचंद्र नेमाडे यांनी इतिहासाचार्य राजवाडे यांचे वास्तवदर्शी कादंबऱ्यांसंबंधीचे व देशीवादासंबंधीचे हे मत पुन्हा एकदा समकालीन संदर्भात व वेगळ्या रीतीने आपल्या 'साहित्यातील देशीयता' या लेखात मांडले. त्यांच्या मते "प्रत्येक मानवी समूहाची आपली स्वतःची संस्कृती असते... माणसाला किंवा साहित्याला आपल्या भूमीवरच, आपल्या भाषिक समूहातच डौलाने उभे राहता येते. त्याला परदेशी किंवा आंतरराष्ट्रीय असण्याची खरंच गरज नसते." देशी संस्कृतीच वाङ्मयीन चळवळीचे मूल्य ठरविते असे नेमाड्यांचे मत आहे. हिंदुस्थान हे केवळ एककेंद्री राष्ट्र नसून, हळूहळू बदलत जाणारे बहुकेंद्री, बहुअक्षी भूमिसातत्य आहे. विशिष्ट युगात विशिष्ट साहित्यिक सर्व माणसांचे नेतृत्व करतात व त्या समूहाचे साहित्य सर्व साहित्याचा मापनदंड बनते. उदाहरणादाखल नेमाडे पंधराव्या शतकातील इटॅलिअन, एकोणिसाव्या शतकातील इंग्रजी व त्या शतकाच्या उतरार्धातील रशियन व फ्रेंच साहित्य विश्वसाहित्य बनले, हे सांगतात. ते म्हणतात की, "नंतरच्या युगातही त्यांचे मध्यवर्ती-पण टिकून राहिले. विश्वसाहित्याची कल्पना यातूनच पुढे आली... भारतीय प्रदेशात विसाव्या शतकाच्या सुरुवातीला बंगाली साहित्यिक जाणिवा मध्यवर्ती ठरल्या (२६२).

नेमाड्यांचा विश्वास आहे की, विश्वसाहित्याच्या कल्पनेमागे देशीयतेचे तत्त्व आहे. ते म्हणतात, "देशीयतेचे तत्त्व असे की, आपण निर्माण केलेली प्रमाणके सोडून इतर

प्रमाणकांचा स्वीकार करता कामा नये. भाषेचे स्वरूप तर इतके सूक्ष्मपणे देशकालविशिष्ट असते की, तिच्यातील साहित्यकृतीचा काल आणि स्थळ ठळकपणे उभी राहतात." (२६२) नेमाडे मान्य करतात की, देशीयता या कल्पनेला निश्चित तसेच एकार्थ नसतो, तसेच-ती लवचिक आहे. पण नेमाडे नंतर म्हणतात की, "देशी असणे म्हणजे त्या एकंदर भूमितत्त्वाचे भान, त्याच्यातील सर्व जाती-वंशांचे समूह, संप्रदाय, धर्म, परंपरा, स्थलकालाचे उभे-आडवे छेद या सर्वांसकट येणारे एकजिनसीपणाचे भान." (२६२) देशीपणाची व्याख्या करून नेमाडे पुन्हा एकदा एतद्देशीय प्रमाणकांची गरज अधोरेखित करतात.

पहिल्या वाचनात पाटणकरांना नेमाड्यांची देशीवादासंबंधीची भूमिका पटण्यासारखी व परिणामकारक वाटते. पण अधिक चिकित्सक वाचनानंतर त्यांना नेमाड्यांच्या देशीवादासंबंधी काही शंका येऊ लागतात व त्या भूमिकेतील काही मुद्दे परस्परांना छेद देणारे आहेत हे त्यांना जाणवते. नेमाड्यांच्या देशीयता या संकल्पनेवर मग ते एकूण चार आक्षेप घेतात. ते म्हणतात की १) वैश्विकता हे महत्त्वाचे मूल्य असून आपण साहित्यकृतीचे वैश्विक मूल्यमापनही करतो. २) इंग्रजी ज्यांची भारतात पहिली भाषा आहे त्यांनी इंग्रजीत लिहू नये असे म्हणणे दुराग्रही आहे. ३) लोकांनी देशीवादी असावे असे म्हणताना आपण दुसऱ्याच्या वतीने निर्णय घेऊ शकतो का हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. हा प्रश्न अस्मितेच्या प्रश्नाशी निगडीत आहे. ४) काही वेळा देशीवाद व्यक्तीची सलगता, अस्मिता व एकता याविरुद्ध जाऊ शकतो. या तिन्ही गोष्टी मान्य करायलाच हव्यात. देशीवादात हे चार कच्चे दुवे पाटणकरांना आढळतात व ते नेमाड्यांचा देशीवाद पूर्णतः स्वीकारीत नाहीत (२६५).

अलीकडच्या काळात निर्वसाहतीकरणवाद, उत्तर वसाहतवाद व उत्तर आधुनिकतावाद या तीन वादांतून एक प्रकारचा देशीवाद पुढे आला आहे. त्यावर अनेक मते व्यक्त झाली आहेत व बरीच पुस्तके लिहिली गेली आहेत. त्यातील तीन पुस्तके व त्या पुस्तकातील भूमिका पाटणकरांनी तपासणीसाठी घेतल्या आहेत.

प्रथम त्यांनी गौरी विश्वनाथन या लेखिकेचे Masks of Conquest (मास्क्स ऑफ् कॉन्क्वेस्ट) हे साहित्याभ्यासात महत्त्वाचे मानले गेलेले पुस्तक व त्यातील भूमिका तपासली आहे. गौरी विश्वनाथननी म्हटले आहे की, आपली आर्थिक व राजकीय अधिसत्ता गाजविण्यासाठी इंग्रजांनी विशिष्ट प्रकारची शिक्षणपद्धती इथे एकोणिसाव्या शतकात आणली. पण त्यांनी त्या शिक्षणपद्धतीचे तपशीलवार विवेचन दिले नाही व तपशीलवार विश्लेषण केले नाही. हे चुकले असे पाटणकर म्हणतात (१०७). इंग्रजी शिक्षणपद्धतीवर टीका करताना इंग्रजी शिक्षणपद्धती म्हणजे इंग्रजी ललित साहित्याचे अध्ययन असे समीकरण मांडताना त्या चूक करतात असे पाटणकर म्हणतात.

आपल्या विश्लेषणासाठी पाटणकरांनी स्वाती जोषी यांचे Re-thinking English (री-थिंकिंग इंग्लिश) हे पुस्तक व त्यातील भूमिका घेतली आहे. इंग्रजी शिक्षणपद्धतीचा नीट इतिहास माहीत पाहिजे ही स्वाती जोषींची भूमिका त्यांना एकदम मान्य आहे. पण पाटणकर असे दाखवतात की, शिक्षणपद्धतीच्या या इतिहासाबद्दल स्वतः स्वाती जोशी मात्र पूर्णतः अनभिज्ञ आहेत. त्या काळात भारतात प्रगत शेती होती व उद्योगधंदेही प्रगत होते व इंग्रजांनी सतत वाढता शेतसारा गोळा केला ही स्वाती जोषींची Re-thinking English या पुस्तकातील दोन्ही मते त्यांना विवाद्य व अनैतिहासिक वाटतात (१०७). स्वाती जोषींची आपल्या पुस्तकातील भूमिका पुरावाहीन व म्हणून पाटणकरांना अस्वीकार्य वाटते.

पाटणकरांचे तिसरे उदाहरण गणेश देवींच्या After Amnesia (आफ्टर ॲम्नेशिया) या साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त पुस्तकाचे आहे. हे पुस्तक वाचल्यानंतर देवींच्या या पुस्तकातील भूमिकेबद्दल त्यांना सखेद आश्चर्य वाटते. त्यांच्या मते या पुस्तकात भारतीय व इंग्रज लोक या दोन्हींबद्दल देवींचे अज्ञान नुसते व्यक्त झाले आहे असे नाही, तर अज्ञानाचा कळस झाला आहे (१०७). देवींच्या पुस्तकाचे उपशीर्षक 'ट्रॅडिशन ॲण्ड चेंज इन इंडियन लिटररी क्रिटिसिझम' असे आहे. मान्य मत असे आहे की, मराठी साहित्याला सातशे वर्षे जुनी परंपरा आहे, पण मराठी समीक्षेला तितकी जुनी परंपरा नाही. डॉ. केतकरांनी आपल्या *महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण* या पुस्तकात मराठी साहित्याइतकीच मराठी समीक्षा जुनी आहे हे दाखविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांचा हा प्रयत्न अयशस्वी झाला. देवींनी असा कोणताही प्रयत्नच केला नाही. एडवर्ड सैदच्या *ओरिएंटॅलिझम* या पुस्तकातील

भूमिकेचा त्यांनी आधार घेतला व म्हटले की, आपल्या सुंदर साहित्य-समीक्षेचा आपल्याला विसर पडला. देवींच्या या म्हणण्यात अजिबात तथ्य नाही असे पाटणकरांचे स्पष्ट मत आहे (१०८).

मध्ययुगात मराठीत साहित्य-समीक्षाच नव्हती. त्यामुळे त्या परंपरेचे आपल्याला विस्मरण झाले या म्हणण्यात काही अर्थ नाही असे पाटणकरांचे मत आहे. ते म्हणतात, "जे मुळातच नव्हते ते आठवणे किंवा विसरणे दोन्ही तर्कदृष्ट्या अशक्य आहे." (१०९)

देवींच्या विस्मरणाच्या तर्काला पाटणकर एक भ्रामक इमला म्हणतात. ते म्हणतात, "पण त्यांची व इतर देशीवादी इंग्रजी प्राध्यापक लेखकांची पद्धती पाहिली की, या प्रकारचे लेखक काहीही लिहू शकतात हे कळते, आणि कसलेच आश्चर्य वाटेनासे होते." (१०९)

देवींच्या शैलीबद्दल पाटणकर उद्विग्न होऊन लिहितात, "पारिभाषिक संज्ञांचा अर्थ नीट माहीत नसतानाही त्यांचा वेधडक वापर करणे व अनेक विशेषनामांचा वापर करणे हे देवींच्या शैलीचे खास व मतलबी वैशिष्ट्य आहे." (११०) देवींची शैली ज्ञानात्मकदृष्ट्या पोकळ असली तरी बहुसंख्य वाचक तीमुळे गांगरून जाऊन त्यांच्या मनात लेखकाविषयी प्रचंड आदर निर्माण होतो (११०). यावर योग्य व उत्तम उपाय म्हणजे तशा पुस्तकांकडे न वळणे असे पाटणकरांचे मत आहे. ते असे सुचवितात की "ज्यांना भारतीय भाषेत साहित्यकृती निर्माण करताना आपल्या अस्मितेबद्दल (identity) काही प्रश्न पडत असतील त्यांनी ते स्वतंत्रपणे सोडवावेत." (११०)

एकोणिसाव्या शतकात नव्याने येत असलेल्या भांडवलशाहीने, औद्योगिक पद्धतीच्या उत्पादनपद्धतीने सरंजामशाहीचा जो पराभव केला त्याला प्रगतीचे एक पाऊल मानले पाहिजे, असे पाटणकरांना वाटते. रानड्यांविषयी पाटणकर जे लिहितात ते एकोणिसाव्या शतकाविषयी त्यांच्या मताशी जुळणारे आहे. "रानड्यांनी कृषी व उद्योगधंदे या दोन्ही क्षेत्रांत भांडवलदारी पद्धतीचा पुरस्कार केला आहे... रानड्यांना समष्टीच्या कल्याणाविषयी बेफिकीर असलेल्या भांडवलदारी व्यक्ती कधीच अभिप्रेत नव्हत्या. एकोणिसाव्या शतकात भांडवलशाही ही जगातली सर्वात प्रगत अर्थव्यवस्था होती हे येथे आपल्याला लक्षात ठेवायला हवे. भांडवलशाही म्हणजे फक्त आर्थिक पिळवणूक हे समीकरण फार एकांगी म्हणून जरा बाजूला ठेवायला हवे. रानड्यांच्या भूमिकेचा पाया पाश्चात्त्य शिक्षणात व त्यावरील चिंतनात आहे, हे लक्षात ठेवायला हवे." (१६५)

एकोणिसाव्या शतकाचें भारतीय जीवनातले महत्त्व पाटणकर अधोरेखित करतात व त्या शतकाच्या सिद्धीबद्दल ते म्हणतात, "प्राचीन भारतीय परंपरेशी जवळीक राखायची, पण आजच्या आपल्या सर्वांगीण उन्नतीसाठी पाश्चात्त्यांकडून जे घेण्यासारखे आहे ते सर्व घ्यायचे असा एकोणिसाव्या शतकातील सुशिक्षितांचा प्रयत्न होता, हे उघड आहे. त्यात स्वाभिमान व आत्मविश्वास हे गुण आहेत, त्याचप्रमाणे नवे शिकण्याची जिद्द आहे. आपण कशात तरी कमी पडलो म्हणून आपला पराभव झाला, आपल्यातल्या उणिवा काढून टाकायला हव्यात असा निग्रह आहे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर आपल्याकडे नुसता रनेसान्स सुरू झाला असे नाही, तर रिफर्मेशन व एन्लायटन्मेंट या आणखी दोन चळवळी सुरू झाल्या" असे पाटणकर म्हणतात. म्हणून एकाच वेळी आपल्याला स्वतंत्र झालेल्या मानवी मनाचा विविध क्षेत्रांतील दिमाखदार विलास, बहुतेक सामाजिक-धार्मिक सुधारणांच्या मुळाशी असलेला व्यक्तिवाद आणि लोकभ्रमांचा नाश करायला सज्ज झालेला ऐहिक क्षेत्रातला बुद्धिवाद या सर्वांचा प्रत्यय या काळात येतो असे पाटणकर म्हणतात (२३८).

एकोणिसाव्या शतकाविषयी आणखी सांगताना पाटणकर म्हणतात की, त्यावेळी काही सुशिक्षितांनी व हळूहळू समाजानेही व्यक्तिस्वातंत्र्यासारखे नवे मूल्य आत्मसात केले होते. इथल्या व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न पाश्चात्त्यांच्या याविषयीच्या कल्पनेपेक्षा वेगळा होता. अगदी खोलवर रुजलेल्या, अनेक मार्गांनी येणाऱ्या, अनपेक्षितपणे येणाऱ्या रूढीदास्यातून व्यक्तीची सुटका करणे हा इथला प्रश्न होता. व्यक्तिवाद हे वाईट मूल्य नाही. त्यामुळेच एकोणिसाव्या शतकात आपण सर्व प्रकारची प्रगती केली. तशीच प्रगती आपण करीत राहिलो असतो, तर आपले संपूर्ण जीवनच बदलले असते, त्यात आमूलाग्र क्रांती झाली असती. पण तसे झाले नाही. आमच्या कर्तृत्वाने आमच्या इतिहासाला दिलेले आश्वासन आम्ही पुरे करू शकलो नाही. एकोणिसाव्या शतकात सुरू झालेली सर्वांगीण जागृतीची क्रांती अपूर्णच राहू दिली याबद्दल पाटणकरांना खेद होतो (२६१).

डॉ. पाटणकरांनी आपल्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकातील भूमिकेत आन्तोनिओ ग्राम्ची या प्रसिद्ध मार्क्सवादी विचारवंताची हेगेमनी ही कल्पना वापरली आहे. विचारवंत हे काठावरचे सुधारक नसून त्यांच्या विचाराचा समाजावर, सामाजिक कृतीवर परिणाम होतो, ते परिणामकारक असतात असे ग्राम्चीप्रमाणे पाटणकरांना वाटते. म्हणूनच त्यांनी पुस्तकाचे नाव *अपूर्ण क्रांती* असे ठेवलेले आहे.

पाटणकरांनी आपल्या पुस्तकात पुराव्याशिवाय एकही गोष्ट लिहिलेली नाही. पुराव्यांचा भरपूर वापर करणे पाटणकरांचे शक्तिस्थान आहे. ते जरी एकोणिसाव्या शतकात सुरू झालेली क्रांती अपूर्ण राहिली अशी खंत व्यक्त करतात, तरी भविष्याविषयी ते आशावादी आहेत, निराशावादी नाहीत.

पाटणकरांनी आपल्या पुस्तकात इंग्रजी राजवटीचे समर्थन केलेले नाही. पण इंग्रजांशी संपर्क आल्याने आपली जीवनशैलीच बदलली, आपण सरंजामशाही समाजरचनेकडून भांडवलशाही व आधुनिक समाजरचनेकडे आलो हे सत्य त्यांनी आपल्या पुस्तकात ठामपणे मांडले आहे. त्यांची सत्य-दर्शनाची कास, भविष्याविषयीची आस्था व असमाधानकारक वास्तवाविषयीची पोटतिडीक कोणालाही नजरेआड करता येणार नाही.

देशीवादी, उत्तरवसाहतवादी व उत्तर-आधुनिकतावादी भूमिकांतील अभिनिवेश, सत्यापलाप करून पुरावाहीन विधाने करणे, दुटप्पीपणा त्यांना आवडत नाही. देशीवादी लेखक पाश्चात्त्य जीवनशैली असणारे जीवन जगतात हे त्यांना आवडत नाही. एकोणिसाव्या शतकातील वैचारिक क्रांती व ते घडवणारे विचारक व त्यांनी केलेला त्याग याविषयी त्यांना ममत्व वाटते. त्यावेळी आपले समाजजीवन, अर्थव्यवस्था व साहित्य सरंजामशाही युगातून नव्या युगाकडे आले याचा त्यांना आनंद वाटतो. अनेक समाजशास्त्रांवर त्यांचे प्रभुत्व आहे. या मोठ्या तयारीने त्यांनी ब्रिटिशकालीन अर्थव्यवस्थेचे, समाजव्यवस्थेचे व साहित्याचे विश्लेषण केले आहे. अशी अनेक समाजशास्त्रांतील व साहित्यातील गती महाराष्ट्रातील थोड्याच लोकांकडे आहे.

आपल्या आधी काही शतके ज्यांनी बुद्धिप्रामाण्यवाद जोपासला, शास्त्र व तंत्रज्ञानाची कास धरली, त्या पाश्चात्त्यांची मदत आपल्याला काही काळ तरी घ्यावी लागणार असे त्यांना रास्तपणे वाटते. मराठीच्या भवितव्यासंबंधीही त्यांना आस्था आहे. मराठीने केवळ ज्ञानवाहक भाषा म्हणून न राहता ज्ञानोत्पादक भाषा म्हणून स्वतःला प्रतिष्ठापित केले पाहिजे; तेव्हाच मराठीला अव्वल दर्जाचे स्थान मिळेल असे त्यांना वाटते.

पाटणकरांच्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकात ब्रिटिश राजवटीखालील भारताची साधार माहिती आहेच, पण त्याकडे एका आस्थेवाईकाचे भारताच्या भूतकाळाविषयीचे व भविष्याविषयीचे चिंतन म्हणूनही पाहणे शक्य आहे.

**वि.सू.**

लेखातील कंसांत दिलेले आकडे रा.भा. पाटणकरांच्या *अपूर्ण क्रांती* या पुस्तकाचे पान क्रमांक आहेत. त्यासाठी मौज प्रकाशन गृह, मुंबई यांची १९९९ ची पहिली आवृत्ती वापरली आहे.










परिशिष्ट

# *अपूर्ण क्रांती**

**रा.भा. पाटणकर**

**प्रास्ताविक**

[साम्राज्यसत्ता व वसाहती यांच्यातील एकतर्फी वर्चस्वाचे संबंध – 'वसाहतीकरण' – हा अलीकडे अभ्यास-विश्लेषणाचा मोठा विषय बनला आहे. जेता समाज जित समाजाचा प्रदेश जिंकून घेऊन त्याचे आर्थिक शोषण तर करीत असेच; पण जित समाजाचे विपर्यस्त चित्रण प्रमाणित करून मनानेही जित समाजातील नवशिक्षित पांढरपेशा मध्यमवर्गीयांना दुबळे व परावलंबी बनवीत असे, अशी मांडणी केली जात आहे. 'वासाहतिक मानसा'मधून मुक्त होण्यासाठी, ज्ञान म्हणून प्रमाणित केलेल्या या विपर्यस्त चित्रणाच्या प्रभावामधून सोडवणूक करून घेण्याची – 'निर्वसाहतीकरणा'ची – आवश्यकता प्रतिपादिली जात आहे. पुष्कळदा 'वस्तुनिष्ठ' म्हणून प्रसृत केलेले 'ज्ञान' हे वस्तुतः हितसंबंधांच्या चष्म्यामधून 'दिसणारे', सत्ताधाऱ्यांची सोय पाहणारे, सत्ताधाऱ्यांच्या धोरणांचे व कृतींचे नैतिक समर्थन करणारे मतलबी 'ज्ञान' असते ही मीमांसा आज विद्वत्जगात मान्यता पावली आहे.

साम्राज्यसत्तांनी प्रसृत व प्रमाणित केलेले 'ज्ञान' मतलबी असते, तेव्हा ते अव्हेरून आपापल्या मुळांचा शोध घेत, परंपरा जाणून घेत, देशी दृष्टिकोन अंगिकारून स्वतःच्या अस्मितेचे (identity) ज्ञान करून घ्यावे, असे म्हटले जात आहे.

आधुनिक पाश्चात्त्य समाज हे उन्नत, प्रगत, कर्तृत्ववान व समर्थ आहेत. याचे कारण त्यांनी जवळ केलेली आधुनिक मूल्ये, वृत्ती व रीती; त्यांनी जोपासलेली सामाजिक व भौतिक शास्त्रे; तसेच, त्यांची तंत्रवैज्ञानिक आणि आर्थिक शक्ती. आपण पारतंत्र्यात होतो ही गोष्ट खरी. त्यांनी आपले शोषण केले हेही खरे. पण त्यांच्यापासून आम्ही आधुनिकतेचे धडे घेतले. ते आत्मसात करण्याची गरज होतीच. आणि त्यांचे राज्य प्रस्थापित झाले नसते तर आमचे आम्ही आधुनिक युगात प्रवेश करूही शकलो नसतो. आम्ही 'निर्वसाहतीकरणा'च्या नावे हे सत्य दृष्टीआड करणारी देशीवादी भूमिका घेणे आत्मघातकी व कृतघ्न ठरेल. प्रा. पाटणकरांनी *अपूर्ण क्रांती* या अभ्यासपूर्ण ग्रंथात आपले हे म्हणणे विस्ताराने सोदाहरण मांडले आहे. त्यांच्या प्रतिपादनाचा सारांश पुढे सादर केला आहे. – *संपादक*]

---

"आपल्या येथील बरेच लोक अजून दारिद्र्यरेषेखाली का आहेत? ... येथील सुशिक्षित लोक कोणत्याही विद्याशाखेत फारशी महत्त्वाची भर का टाकू शकले नाहीत? आपल्या साहित्यात अधूनमधून मोठेपणाची बीजे दिसतात; पण त्यातून मोठी वृक्षराजी निर्माण झाल्याचे का दिसत नाही? पूर्वी आम्ही अशा विपन्नावस्थेत नव्हतो, असे असताना आज या अवस्थेला कसे आलो?" (पृ. सात) या प्रश्नांची उत्तरे, ब्रिटिशांनी लादलेल्या पारतंत्र्यात शोधणारे लोक असे म्हणतात की, "त्यांनी (म्हणजे ब्रिटिशांनी) येथील लोकांचे आर्थिक शोषण केले; नवी शिक्षणपद्धती प्रस्थापित केली व तिच्यामार्फत वेगळ्या प्रकारचे साहित्य येथे आणून आपली सांस्कृतिक सर्जनशीलता नष्ट केली." (पृ. सात) हा युक्तिवाद करणाऱ्यांना प्रा. रा.भा. पाटणकर "देशीवादाचे पुरस्कर्ते" म्हणतात. हा युक्तिवाद कितपत यथार्थ आहे याची तपासणी करण्यासाठी, आणि प्राधान्याने तो नाकारण्यासाठी, पाटणकरांनी काही वर्षे अभ्यास करून मोठ्या परिश्रमपूर्वक *अपूर्ण क्रांती* हा ग्रंथ सिद्ध केला आहे.

* *अपूर्ण क्रांती*, रा.भा. पाटणकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई, १९९९.

आपली मांडणी त्यांनी तीन सदरांखाली विभागली आहे : (१) आर्थिक परिवर्तने (२) शैक्षणिक स्थित्यंतर, आणि (३) मराठी साहित्याचा इंग्रजी अवतार.

**भाग १ : आर्थिक परिवर्तने**

आर्थिक परिवर्तने या विभागात पाटणकरांनी प्रथम चर्चेला घेतलेले मुद्दे असे : ईस्ट इंडिया कंपनी इ.स. १६०० मध्ये व्यापाराच्या हेतूने येथे आली. कालांतराने येथे ब्रिटिश राजवट प्रस्थापित झाली. व्यापारी कंपनी ते राज्यसत्ता हा प्रवास कसा व का झाला?

पाटणकरांचे म्हणणे असे : "इ.स. १६०० पासून १७५७ पर्यंत इंग्रजी ईस्ट इंडिया कंपनी भारतात फक्त एक व्यापारी कंपनी म्हणून वावरत होती." (पृ. १०) "प्लासीच्या लढाईनंतर हे चित्र पालटू लागले. व्यापाराखेरीज पैसे मिळविण्याचा अन्य एक मार्ग असल्याचे त्यांच्या लक्षात येऊ लागले. या मार्गाने जाण्यासाठी त्यांना भारतातील राज्यांमध्ये लष्करी व राजकीय मार्गांनी प्रवेश करावा लागला. अर्थात याच्यामागे आर्थिक लाभ हाच एकमेव हेतू होता." (पृ. १४) "भारतीयांकडे आधुनिक शस्त्रास्त्रे नव्हती, त्यांचे सैन्य शिस्तबद्ध नव्हते, त्यांच्याकडील पुढाऱ्यांनी राजकीय डावपेचांत चुका केल्या... आणि म्हणून त्यांचा पराभव झाला, हे वस्तुस्थितीचे पर्याप्त वर्णन ठरणार नाही. एक आर्थिक शक्ती म्हणून भारत इंग्लंडशी यशस्वीपणे तोंड देण्याच्या स्थितीत होता का, या सर्वात महत्त्वाच्या प्रश्नाचे उत्तर देईपर्यंत असे पर्याप्त वर्णन सिद्ध होणार नाही.' (पृ. १) पाटणकरांचे म्हणणे असे की, अठराव्या शतकातच इंग्लंड ही प्रबळ आर्थिक-औद्योगिक शक्ती म्हणून उदयास आली होती. प्लासीच्या लढाईनंतर, विशेषतः बंगालची दिवाणी (१७६५) संपादित केल्यावर जी 'लूटमार' कंपनीच्या अंमलदारांनी केली तिच्याद्वारा 'आदिम भांडवलसंचय' घडून आला व त्यामधून 'औद्योगिक क्रांती'च्या घडामोडीला चालना मिळाली, हे म्हणणे यथार्थ नाही. या आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ इंग्लंडच्या आर्थिक-औद्योगिक शक्तिसंवर्धनाचे काही तपशील पाटणकरांनी दिले आहेत. (पृ. १७-३३) मग ते लिहितात, "... एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीच्या काळातच इंग्लंड हे सबंध जगाचा कारखाना, सर्व जगाची बँक, जगड्व्याळ वाहतुकीचे केंद्रस्थान बनले होते... अशी ही प्रचंड आर्थिक शक्ती ईस्ट इंडिया कंपनीच्या रूपाने भारतीय उपखंडातील राज्यांसमोर एक आव्हान म्हणून अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात उभी राहिली. हे आव्हान मुख्यतः लष्करी, राजकीय, सांस्कृतिक... नव्हते. इंग्रजी राज्यकर्त्यांचे साध्य एकच होते; आर्थिक क्षेत्रातील वर्चस्वाची स्थापना." (पृ. ३३) "इंग्लंडजवळ निश्चित विजयाचे एक अमोघ अस्त्र होते. चांगल्या व स्वस्त वस्तूंची प्रचंड प्रमाणात निर्मिती करण्याची व त्या वस्तू जगभर पोचविण्याची क्षमता." (पृ. ३४)

या तुलनेत येथील राज्यांची स्थिती काय होती? डब्ल्यू. एच. मोरलँड व प्रा. इर्फान हबीब यांच्या ग्रंथांचा आधार पाटणकरांनी घेतला आहे. आशिन दासगुप्त यांच्या एका पुस्तकातील लेखनाचाही हवाला दिला आहे. औरंगजेबानंतर भारतात उत्पन्न झालेल्या अराजकसदृश राजकीय स्थितीचाही संदर्भ दिला आहे. त्यांच्या विवेचनाचे सार पुढील शब्दांत व्यक्त होते : "(इंग्लंडच्या तुलनेत) दुसऱ्या बाजूला भारतीय उपखंडातील आर्थिकदृष्ट्या गोठलेल्या व कमकुवत अशा शक्ती उभ्या होत्या." (पृ. आठ) आर्थिक-औद्योगिक शक्ति-संवर्धनासाठी निर्णायक ठरणाऱ्या भांडवलसंचय व गुंतवणुकीचा (येथील सरंजामशाही व्यवस्थेमुळे) अभाव, तंत्रविद्येच्या क्षेत्रातली अवरुद्ध व मागास स्थिती. या टप्प्यावर पाटणकर एक मोठा सूचक युक्तिवाद करतात. 'युरोपियनेतर समाजांची बांधणी व उद्दिष्टे-लक्ष्ये मूलतः वेगळी होती; विकासाची प्रक्रिया यांना अनुरूप, विकेंद्रित व्यवस्थेला पूरक अशी होती. ही सामाजिक व राजकीय प्रगल्भतेची द्योतक गोष्ट होती. म्हणून येथल्या विज्ञान, तंत्रविज्ञानाचाही विकास वेगळ्या दिशेने व स्वरूपाचा राहिला आहे.' – धर्मपाल या गांधीवादी-देशीवादी इतिहासकारांचे हे मत उद्धृत करून पाटणकर लिहितात, "आधुनिकतेच्या उंबरठ्यावर असलेल्या कोणत्याही देशाला अशी भूमिका घेता येत नाही. विशिष्ट माणसांनी स्वतःला विशिष्ट टापूत बंदिस्त करावयाचे ठरविले तरी बाहेरचे जग त्याला तसे करू देणार नाही." (पृ. ४८) या न्यायानुसार इंग्लंडने ईस्ट इंडिया कंपनी या साधनामार्फत 'गोठलेल्या व कमकुवत' भारतीय अर्थव्यवस्थेचा ताबा घेतला.

(२) पाटणकरांनी महाराष्ट्राच्या – विशेषतः पश्चिम महाराष्ट्राच्या – अर्थव्यवस्थेचे वर्णन व विवेचन केले आहे (पृ. ५०-६५). "भारतीय उपखंडातील इतर भागांप्रमाणे महाराष्ट्रातही एक प्रकारची (वतनदारी) सरंजामशाही अर्थ-

व्यवस्था होती. तिचे एक वैशिष्ट्य म्हणजे आर्थिक व राजकीय सत्तेचे विकेंद्रीकरण. ...त्या काळातला शेतकरी आर्थिकदृष्ट्या सुखात नव्हता. पैशाची चणचण भासल्यावर राज्यकर्त्यांपुढे तीन मार्ग असत : कर वाढविणे, कर्ज काढणे व मुलुखगिरी करणे... दारिद्र्य घालविण्यासाठी गरज होती नवी संपत्ती निर्माण करण्याची; बळजबरीने द्रव्य इकडून तिकडे नेणे म्हणजे नव्या संपत्तीची निर्मिती करणे नव्हे. शेतकरी व कारागीर खऱ्या अर्थाने द्रव्योत्पत्ती करीत होते आणि आसेतुहिमाचल पसरलेले सरंजामदार त्यांनी निर्माण केलेले द्रव्य हडप करीत होते. या व्यवस्थेतून बाहेर पडण्याचा मार्ग म्हणजे व्यापार व क्रयवस्तूंचे मोठ्या प्रमाणात केलेले उत्पादन." (पृ. ५३-६०). पुणे हे पेशव्यांनी राजधानीचे शहर म्हणून वाढविले. "ते मुख्यतः राज्याचे अधिकारी व लष्करप्रमुख यांचे गाव होते... सावकारही असत. या सावकारांजवळ बऱ्यापैकी भांडवल-संचय झालेला असे... हा सर्व पैसा उत्पादनाकडे मात्र कधीही वळला नाही... ते भांडवल कर्ज देण्यासाठी वापरले जात होते हे उघड आहे... जेथे उत्पादन होत होते तेथे, तंत्रविद्येच्या अभावी ते वाढून पाश्चात्त्य देशांतील उत्पादनाच्या जवळपास येईल अशीही स्थिती नव्हती. एक आर्थिक शक्ती म्हणून भारतीय उपखंडातील कोणत्याही राज्याला जगाच्या आर्थिक नकाशावर स्थान नव्हते... या दृष्टीतून पाहिले तर असे लक्षात येते, की इंग्रजपूर्व भारतीय उपखंडातील राज्ये आर्थिक, राजकीय, सामाजिक, लष्करी, विज्ञान-तंत्रविद्येच्या बाबतीत कमकुवत होती. पाश्चात्त्य शक्तींपुढे त्यांचा पराभव होणे अटळ होते." (पृ. ६३-६५)

वरील विवेचनाशी पूर्णपणे मेळ न खाणारे पाटणकरांचे विवेचन असे. आधुनिक युग हे व्यक्तिवादाच्या प्रकर्षावर उभारलेले युग आहे. "व्यक्तिवादात व्यक्तीची प्रतिष्ठा, स्वातंत्र्य, व्यक्ती-व्यक्तीमधील समानता हे प्रमुख घटक आहेत." (पृ. ६६) भांडवलशाही, लोकशाही यांचा उत्कर्ष व विकास व्यक्तिवाद प्रतिष्ठित झाल्याखेरीज होऊ शकला नसता. पाटणकर लिहितात, "(व्यक्तिवादाचे) काही आविष्कार (महाराष्ट्रात) मध्ययुगातही दिसतात." (पृ. ६६) भोसले घराण्याचा उत्कर्ष, पेशवाईत चित्पावन ब्राह्मण जातीयांचा उत्कर्ष, पेशवाईत उत्कर्ष पावलेले, "शिवकालीन मराठा सरदारांच्या कुटुंबीयांपैकी" नसलेले आणि "स्वतःच्या कर्तबगारीने अठराव्या शतकात प्रथमच वर चढलेले" नवे सरदार वगैरे उदाहरणे ते देतात. आर्थिक उलाढालीच्या क्षेत्राबद्दल पाटणकर लिहितात, "सामाजिक गटांच्या अभिसरणाचा दुसरा मार्ग म्हणजे आर्थिक उलाढाली... या मार्गाचा उपयोग करणे उत्तर पेशवाईत अठराव्या शतकापासूनच सुरू झाले होते." (पृ. ६५-६८) त्यांनी पुण्यातील गंज पेठेचे उदाहरण देत म्हटले आहे : "इंग्रजांनी १८२२ साली केलेल्या गणतीनुसार गंज पेठेत ४४ जातींचे लोक राहत,... ही पेठ आर्थिक उलाढालींसाठी प्रसिद्ध होती." (पृ. ६८)

(३) इंग्रज अंमलाखाली काय घडले याकडे पाटणकर मग वळतात. ते लिहितात, "इंग्रजांनी येथे कायदा व सुव्यवस्था, प्रशासन, शिक्षण यांच्याबाबतीत काही सुधारणा केल्या होत्या. त्या येथील लोकांना आवडल्या होत्या. त्यामुळे इंग्रज येथे आपल्या भल्यासाठी आहेत असे त्यांना वाटू लागले." (पृ. ६९-७०)

पण इंग्रज सरकारचे भारतातील वर्तन अनेकांना खटकले. पाटणकरांनी दादाभाई नवरोजींच्या *पॉव्हर्टी ॲण्ड अन्-ब्रिटिश रूल इन इंडिया* या ग्रंथातील विवेचनाकडे लक्ष वेधले आहे. त्यांच्या खंडणी, गळती या सुप्रसिद्ध सिद्धान्तनाची माहिती करून दिली आहे. "आपण आपल्या (म्हणजे ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या) हितासाठी केलेला खर्च भारताच्याच हितासाठी केला आहे असे भासवून तो खर्च भारत सरकारच्या माथी मारण्याचे प्रकार इंग्लंडमधील सरकारने त्यावेळी केले." (पृ. ७२) अर्थशास्त्रज्ञ रावबहादूर गणेश व्यंकटेश जोशी यांचा हवाला देऊन पाटणकर म्हणतात, "भारताचे रक्षण करणे हा इंग्रजांचा खरा उद्देश नसून आपल्या बाजारपेठा सुरक्षित राहाव्यात व त्या वाढाव्यात हा होता. ग.व्यं. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणे वरील लक्ष्य गाठण्यासाठी सरकारने भारतीय रयतेच्या खऱ्या भल्यासाठी होणाऱ्या खर्चात (उदाहरणार्थ, दुष्काळ-विमा) कपात केली आणि करांमध्ये वाढ केली." (पृ. ७२)

ज्या गुंतवणुकीला आपण आर्थिक विकास व स्थैर्य या कामी केलेली भांडवली गुंतवणूक वा खर्च म्हणू त्या प्रकारच्या गुंतवणूक व खर्च याकडे नंतर पाटणकर वळतात. काही क्षेत्रांमधील ब्रिटिश भांडवलाच्या गुंतवणुकीस (उदा. रेल्वे) सरकारने केवळ प्रोत्साहनच दिले असे नाही; तर, अमुक एक दराने त्यावर परतावा दिला जाईल, मग ती गुंतवणूक किफायतशीर ठरो वा न ठरो, अशी हमी दिली. या मार्गाने

भारताची लूट होत राहिली व इंग्लंडची – तेथील भांडवल गुंतवणूक करणाऱ्यांची व अर्थव्यवस्थेची – पुष्टी झाली; हा पैसा सरकारला येथील शेतीचे वा उद्योगांचे उत्पादन वाढविण्यासाठी गुंतवता आला असता. दादाभाई, न्या. रानडे यांच्यासारख्यांची या आशयाची टीका रास्त नाही; अशी हमी देऊन अत्यावश्यक अशा सोयीसुविधा वा उद्योग यामध्ये गुंतवणूक करण्यास आमंत्रण देण्याची त्या काळी अनेक देशांमध्ये रीत होती, हे प्रा. नी.वि. सोवनी या अर्थशास्त्रज्ञांचे मत उद्धृत करून, पाटणकरांनी हा मार्ग ब्रिटिश राजवटीने अवलंबिल्याचे समर्थन केले आहे. (पृ. ७४-७५) काही प्रकारच्या बांधकामांद्वारे (धरणे, कालवे, तळी) शेतीला पाणीपुरवठा करण्याच्या सोयींमध्ये वाढ केली गेली, याकडेही पाटणकर लक्ष वेधतात (पृ. ७५-७६). पाटणकरांनी या संदर्भात त्रिंबक नारायण अत्रे यांच्या *गांवगाडा* या पुस्तकाचा आधार घेतला आहे. भारतातील शेतीतील उत्पादकता वाढावी, नवनवी नगदी (व्यापारी) पिके काढावीत यासाठी नव्या सरकारने पुष्कळ परिश्रम घेतले व पैसा खर्च केला. याच संदर्भात, एम्.एल्. दांतवाला यांनी, इंग्लंडच्या आर्थिक हितसंबंधांची पूर्तता करण्यासाठी कच्चा माल पिकविणाऱ्या शेतीचा विकास इंग्रज सरकारने मोठ्या प्रयत्नपूर्वक केला, अशी टीका केली आहे. ती उद्धृत करून पाटणकरांनी "कंपनी सरकारने मँचेस्टरला कापूस पुरवावा म्हणून खरेच इतकी खटपट केली हे शंकास्पद विधान आहे" (पृ. ७७). अशी टिप्पणी केली आहे. भांडवलशाही अर्थव्यवस्थेसोबत विकसित केलेल्या आर्थिक सिद्धान्तनाचा आधार घेत, या ठिकाणी पाटणकरांनी जित देशावर/समाजावर, 'वसाहती अर्थव्यवस्था' लादावयाची असली तरी, "त्या देशातील कच्च्या मालाचे उत्पादन क्रमशः वाढत जाईल याकडे शोषणकर्त्याने लक्ष द्यावे लागते. तसे इंग्रजी राज्यकर्त्यांनी काही प्रमाणात केल्याचे आपण पाहिले. पक्क्या मालाच्या उत्पादक देशाला हेही पाहावे लागते की, जर प्रस्तुत माल वसाहतींमध्ये खपायचा असेल तर वसाहतींमधील लोक पूर्णपणे दरिद्री होऊन चालणार नाही; पक्का माल घेण्याची त्यांच्यात ऐपत असायला हवी. इंग्रजांनी केलेल्या भारताच्या वाढत्या दरिद्रीकरणाचा सिद्धान्त मांडणाऱ्यांनी या मुद्याकडे दुर्लक्ष केल्याचे दिसते." असे म्हटले आहे. (पृ. ८१)

इंग्रजी राजवटीने (महाराष्ट्रात) रयतवारी पद्धत अवलंबिली. भांडवलशाही प्रणालीत पायाभूत असलेले व्यक्तिवादाचे तत्त्व येथे लागू करून येथील सरंजामशाही अर्थव्यवस्था मोडीत काढण्याचे प्रगतीशील धोरण या मागे होते, असा युक्तिवाद पाटणकरांनी केला आहे (पृ. ८५). या स्थित्यंतराचा परिणाम 'कमी गुणवत्तेचे' शेतकरी 'बाहेर फेकले गेले व त्यांच्या जागी चांगले, शेतीत सुधारणा घडविण्यात रस असलेले, श्रीमंत शेतकरी आले तर त्यामुळे एकूण समाजाचा आर्थिक फायदाच होईल" हे विन्गेट या त्या वेळच्या अधिकाऱ्याचे मत पाटणकरांनी उद्धृत केले आहे. त्याची पुष्टी व भलावण केली आहे. (पृ. ८६)

इंग्रजी अमदानीत असा एक सधन शेतकऱ्यांचा वर्ग निर्माण झाला. पण एरवी सर्वसाधारण जिराईत शेती करणारा शेतकरी दारिद्र्यात राहिला, व कर्जबाजारी झाला. ही वस्तुस्थिती नमूद करून, इंग्रज येण्यापूर्वीही परिस्थिती अशीच असावी असे पाटणकरांनी म्हटले आहे. (पृ. ८७)

ब्रिटिश राजवटीखाली भारतातील सर्व शेतकऱ्यांची शेती उत्पादक व किफायतशीर झाली असती तर, पाटणकर लिहितात, "फार तर वर पाहिलेल्या आंतरराष्ट्रीय श्रम-विभागणीच्या तत्त्वाप्रमाणे भारत कच्च्या मालाच्या बाबतीत संपन्न झाला असता, आणि इंग्लंड किंवा अन्य पाश्चात्त्य देश यांच्याकडे हा माल पाठवीत राहिला असता... औद्योगिकदृष्ट्या प्रगत अशा कोणत्या तरी राष्ट्राची वसाहत म्हणून जगण्या-पलीकडे त्याच्या हाती काही लागले नसते." (पृ. ८८)

"वसाहती अर्थव्यवस्थेतून बाहेर पडण्यासाठी व्यापार व उद्योगधंदे यांची उभारणी करून भारत स्वतःच्या सामर्थ्यावर स्वयंपूर्ण व संपन्न देश झाला असता का?" असा प्रश्न उपस्थित करून पाटणकर लिहितात, "मध्ययुगीन सरंजामशाही भारतातील कोणीही सारावसुलीच्या पलीकडे जाऊन व्यापार व उद्योगधंदे यांच्याकडे अर्थोत्पादनाची साधने म्हणून पाहात नव्हता. एकोणिसाव्या शतकात अर्थव्यवस्थेच्या सर्वांगीण प्रगतीकडे तो वळला असता का? तो आपणहून वळला नसता; आणि त्याला तसे वळविण्याची कुवत जुन्या भारतीय राज्यकर्त्यांकडे नव्हती." (पृ. ८८-८९) त्यांच्या मते "इंग्लंड हे करू शकत होते; पण कृषिक्षेत्राखेरीज इतर क्षेत्रांतल्या भारतीय प्रगतीबद्दल ते उदासीन होते." (पृ. ८९)

भारतात आधुनिक उद्योग वाढावेत म्हणून प्रयत्नशील असलेल्या भांडवलदार-उद्योजकांना ब्रिटिश राज्यकर्त्यांनी कधी उत्तेजन दिले, जरूर ते संरक्षणही दिले; तर कधी तसे दिले नाही. (पृ. ८९)

पाटणकरांनी केलेला निवाडा असा : "... सर्व वेळ इंग्रजी व्यापारी व साम्राज्यवादी यांचे साध्य अधिकाधिक पैसे मिळविणे हे होते. इ.स. १६०० ते १७५७ पर्यंत त्यांनी सम-पातळीवरील व्यापाराच्या मार्गे ते गाठावयाचा प्रयत्न केला; १७५७ सालानंतर त्यांनी विषम व्यापाराच्या साहाय्याने तेच केले. तसेच प्रथम येथे राज्यांच्या महसुलात वाटा मिळविणे व नंतर सर्व महसूलच मिळविणे यावर त्यांनी लक्ष केंद्रित केले. या टप्प्यावर त्यांना लष्करी व राजकीय मार्गांनीसुद्धा पैसा मिळविणे शक्य झाले.... (१८५७ नंतर) द्रव्यार्जनाचे एक महत्त्वाचे साधन म्हणजे भारतातील सर्व आर्थिक गोष्टींचे राजकीय मार्गाने नियंत्रण करणे. हा मार्ग वापरणे अपरिहार्यच होते. दुसरे तितकेच अपरिहार्य साधन म्हणजे येथील कायदेकानूंत केलेले बदल." (पृ. ९३-९४)

"(कायदेकानूंमधील) व्यक्तिवादी बदल घडविण्यामागील एक महत्त्वाचे कारण त्यांच्यामुळे भांडवलदारी अर्थव्यवस्थेतले व्यवहार विनाव्यत्यय होऊ शकतात हे आहे. हे बदल केले नसते तर औद्योगिक भांडवलदारी युगातले खास असे आर्थिक शोषण येथे करता आले नसते." (पृ. ९६) त्याच वेळी, "...भारतात व्यक्तिवाद केवळ भांडवलशाहीची अनिवार्य अट म्हणून आला नाही. तो प्रॉटेस्टंटिझमच्या प्रभावामुळेही आला. तो प्रभावही केवळ मिशनऱ्यांमार्फत आला असे नाही. तो येथील इंग्रजी प्रशासक, शिक्षक, व्यापारी यांच्याही मार्फत आला." (पृ. ९६)

'आर्थिक परिवर्तने' या विभागाच्या अखेरीस पाटण-कारांनी लिहिलेय "त्या काळी इंग्रजी आर्थिक शक्तीसमोर भारतीय उपखंडातील राज्यांमधल्या दुबळ्या सरंजामशाही आर्थिक शक्ती उभ्या होत्या... खूपच प्रगत व संपन्न अशा इंग्लंडने त्यांचा पराभव केला यात आश्चर्यकारक काही नाही. असे केव्हा तरी होणारच होते."(पृ. ९६) इंग्रजी अंमल प्रस्थापित झाल्यानंतरच्या काळासंबंधी ते म्हणतात, "आपल्या येथे फारसा भांडवल-संचय होऊ शकत नव्हता. जो संचय होत असे त्यातील एक मोठा भाग खंडणी, राष्ट्रीय कर्ज, होम चार्जेस या नावांखाली इंग्लंडकडे जात असे. फक्त त्यातून उरलेला भाग भारताच्या आर्थिक उत्पादनासाठी वापरणे शक्य होते. इंग्रजी राज्यकर्त्यांनी वरील मर्यादेत जे करता येईल तेवढे केले." (पृ. ९६-९७)

**भाग २ : शैक्षणिक स्थित्यंतर**

*अपूर्ण क्रांती* या पुस्तकाच्या लेखनाचा संदर्भ स्पष्ट करताना पाटणकर म्हणतात, "प्रस्तुत पुस्तकाचे लेखन व वाचन करणे म्हणजे या चर्चेत – 'निर्वसाहतीकरणा'विषयीची चर्चा (de-colonization debate) – भाग घेणे होय." (पृ. १००-१०१) या चर्चेत एडवर्ड सैद या मूळ इजिप्शियन विचारवंतांच्या *ओरिएंटॅलिझम* या ग्रंथात मांडलेल्या दृष्टिकोनाचे विशेष स्थान व महत्त्व आहे. पाटणकर त्याची अशी मांडणी करतातः "ओरिएंटॅलिझम ही पूर्वेकडे पाहण्याची चौकट आहे; तसेच पौर्वात्य देशांवर स्वामित्व प्रस्थापित करण्याचे ते प्रभावी साधन आहे." सैदचे पुढील वाक्य ते उद्धृत करतात : 'The relationship between occident and orient is a relationship of power, of domination, of varying degree of a complex hegemony.' (पाटणकर तसे म्हणत नाहीत, पण असे म्हणता येईल की, जित लोकांवर सांस्कृतिक वर्चस्व (hegemony) प्रस्थापित करण्यात सहायभूत ठरेल असे त्यांच्याविषयीचे ज्ञान उत्पन्न करण्याचे कार्य पाश्चात्त्य शास्त्रे व विचारवंत यांनी आधुनिक काळात केले. हे ज्ञान जित लोक प्रमाण व सत्य म्हणून स्वीकारतात व आत्मसात करतात तेव्हा जेत्यांचे राजकीय-आर्थिक वर्चस्वदेखील जित लोक कृतज्ञभावाने स्वीकारतात.) परिणामी, पौर्वात्य लोक "स्वतःकडे पाश्चात्त्यांच्या नजरेने पाहू लागले." पश्चिम आशियाई मुस्लिम समाजांशी ख्रिश्चनांच्या 'क्रूसेड्स'च्या काळापासून युरोपीय सत्तांचा जसा कडवा धार्मिक-सांस्कृतिक विरोध होता तसा भारताबरोबर नव्हता, असे सैद यांचेही मत असल्याचे पाटणकर नमूद करतात. पुढे ते लिहितात, "पण इंग्रजांनी इ.स. १६०० पासून १८१३ पर्यंतच्या मोठ्या कालखंडात ख्रिस्ती मिशनऱ्यांचाही भारतात प्रवेश होऊ दिला नाही, आणि भारतात आपले राज्य स्थापन झाल्यानंतरही येथील धार्मिक व सामाजिक जीवनाला स्पर्श करण्याचे शक्य तो टाळले. तेव्हा इंग्रज-भारतीय संबंधात सैदचा सिद्धान्त प्रस्तुत व उपयुक्त ठरण्याची शक्यता अत्यंत क्षीण ठरते."(पृ. १०३)

इंग्रजी राजवटीच्या प्रस्थापनेनंतर शिक्षण व साहित्य या क्षेत्रांमध्ये पण परिवर्तने घडून आली. या परिवर्तनांच्या संदर्भात पाटणकर पुढील प्रश्न उपस्थित करतात : "(या परिवर्तनांमुळे) येथील लोक इंग्रजधार्जिणे, इंग्रजी शोषणाला मान्यता देणारे किंवा त्याकडे काणाडोळा करणारे झाले का?" (पृ. १०५) पाटणकरांच्या प्रश्नाचा रोख स्पष्ट आहे. शिक्षण व साहित्य या क्षेत्रांतील बदलांमुळे आधुनिकतेला पायाभूत अशी मूल्ये, वृत्ती व विचार रुजले तर तो, सैद यांच्या अर्थाने, राजकीय-सांस्कृतिक वर्चस्व प्रस्थापित करणारा सत्ता-संबंध आहे असे म्हणता येणार नाही.

पाटणकरांनी गौरी विश्वनाथन यांच्या *मास्क्स ऑफ कॉंक्वेस्ट*, स्वाती जोषी यांनी *री-थिंकिंग इंग्लिश* या ग्रंथाला लिहिलेली प्रस्तावना आणि गणेश देवी यांच्या *आफ्टर ॲम्नेशिया* या तीन ग्रंथांतील विवेचनांचा परामर्श घेतला आहे. या परखड टीकात्मक परामर्शाच्या शेवटी पाटणकर लिहितात, "...देशीवादाचा पुरस्कार करणाऱ्या भारतीय-इंग्रजी लेखकांना अनेक वेळा पाश्चात्त्यांची नीट माहिती नसते आणि भारतीयां-विषयीही ते तितकेच अनभिज्ञ असतात. देशीवाद हा एक महत्त्वाचा विचारप्रवाह आहे. पण त्याचे आकलन व पुरस्कार यांच्यासाठी भारतीय-इंग्रजी लेखकांकडे न जाणे हे योग्य. ज्यांना भारतीय भाषेत साहित्यकृती निर्माण करताना आपल्या अस्मितेबद्दल (identity) काही प्रश्न पडत असतील त्यांनी ते स्वतंत्रपणे सोडवावेत." (पृ. ११०)

अठराव्या-एकोणिसाव्या शतकांतील इंग्लंडमध्ये नव्याने जागृत झालेली धार्मिकता – जिच्यात अध्यात्म व नैतिकता यांचे मिश्रण होते – आणि युटिलिटेरियन, लिबरल सुधारणावादी विचारप्रवाह यांच्या प्रभावाखाली, पाटणकर लिहितात, "कंपनीला स्वतःच्या जबाबदाऱ्यांची जाणीव झाली, आणि ती नव्या सुधारणांना सक्रिय प्रोत्साहन देऊ लागली. त्यातील एक म्हणजे शिक्षणाची प्रस्थापना". (पृ. ११३) ते आणखी लिहितात, "इंग्लंड व भारत यांच्यामधील संबंधातील जास्तीत जास्त सौहार्दाचा काळ इ.स. १८१३ सालच्या सुमारास सुरू झाला असे म्हणता येईल. कॉर्नवॉलिसच्या सुधारणांमुळे नव्या दृष्टिकोणाचे, प्रशिक्षित, कार्यतत्पर, जबाबदारीने वागणारे, आपापल्या कामात कुशल, येथील रयतेच्या भल्यासाठी काहीतरी करावे असे मनापासून वाटणारे प्रशासक भारतात येऊ लागले होते." (पृ. ११३) ओ'मॅली यांच्या *दि इंडियन सिव्हिल सर्व्हिस १६०१-१९३०* या ग्रंथाचा हवाला त्यांनी दिला आहे. ओ'मॅली हे स्वतः एक सनदी प्रशासक होते.

नव्या शिक्षणाच्या मुद्याकडे वळत पाटणकर लिहितात, "भारतात कोणत्या प्रकारचे शिक्षण द्यायला हवे हे त्या काळातील इंग्रज प्रशासकांनी ओळखले होते. एकामुळे अगदी व्यावहारिक, ऐहिक पातळीवरील प्रश्न सोडविणे शक्य व्हायला हवे; आणि या घटकाबरोबर ज्यामुळे मनाचे उन्नयन होते, दृष्टिकोणात विशालता येते असा घटक असणेही आवश्यक होते. या दोहोंच्या योग्य मिश्रणानेच ज्याला दैनंदिन व्यावहारिक प्रश्न सोडविता येतील आणि एक उत्तम नागरिक व प्रशासक म्हणून जगता येईल असा माणूस निर्माण होऊ शकेल अशी यामागील धारणा होती." (पृ. ११७)

१८५२ साली मुंबईच्या प्रतिष्ठित नागरिकांनी एका जाहीर सभेत इंग्रज राज्यकर्त्यांनी येथे आधुनिक लिबरल आशयाचे तसेच औद्योगिक कौशल्ये वाढविणारे शिक्षण लोकांना द्यावे, अशी मागणी केली. ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराच्या काळात मुंबई या एका मुख्य ठाण्याच्या शहरी, कंपनीच्या व्यवहारांमध्ये सहभागी होत, नव्या संधींचा लाभ उठवत भरभराट पावलेली ही सर्व नामवंत व्यावसायिक मंडळी होती. कोणते शिक्षण येथील लोकांना दिले पाहिजे याबावतचे "इंग्रज व महाराष्ट्रीय यांचे दृष्टिकोन परस्परपूरक होते." (पृ. ११९)

ब्रिटिशपूर्व काळात शिक्षणाची काहीच व्यवस्था नव्हती असे म्हणण्यासारखी स्थिती नव्हती. शिक्षण ही सरकार स्वतःची जबाबदारी मानीत नसे. त्या काळी शिक्षणाच्या ज्या सोयी होत्या व जे शिक्षण दिले जाई त्याची माहिती देऊन काही विवेचन पाटणकरांनी केले आहे (पृ. ११९-१२७). शेवटास ते लिहितात, "नव्या जगात प्रवेश करण्यासाठी अनेक ठिकाणी नवी बौद्धिक कौशल्ये शिकण्याखेरीज गत्यंतर नव्हते. जेथे नव्या गोष्टी शिकण्याकडे दुर्लक्ष झाले, तेथे भारतीयांचे नुकसान झाले; उदाहरणार्थ, शेतीच्या व्यवसायात." (पृ. १२८)

पारंपरिक आणि आधुनिक यांची सुयोग्य सांगड घालून स्वतःचा स्वतंत्र अभ्यासक्रम तयार करण्याची वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट वाई येथील प्राज्ञपाठशाळेचे श्री. नारायणशास्त्री मराठे (संन्यास घेतल्यावरचे नाव : केवलानंद सरस्वती) यांनी

केली, व त्या अभ्यासक्रमानुसार पाठशाळा काही वर्षे चालविली-देखील. पाठशाळेचा अभ्यासक्रम व मुंबई विद्यापीठातील अभ्यासक्रम यांची माहिती देऊन तौलनिक चर्चा पाटणकरांनी केली आहे. (पृ. १२९-१४६) आपल्या विवेचनाच्या ओघात पाटणकर लिहितात, "ज्या विद्याशाखांच्या ज्ञानाशिवाय आधुनिकतेच्या जगात माणसाचे चाललेच नसते त्यांना भारतीय विद्यापीठांच्या अभ्यासक्रमात प्रमुख स्थान मिळणे अपरिहार्य होते. या विद्याशाखांची उभारणी व वाढ पाश्चात्त्य देशांत व जुन्या-नव्या भाषांमध्ये झालेली असल्याने आणि त्यांच्या तोडीचे भारतीय विद्यापरंपरेत व भारतीय जुन्या-नव्या भाषांमध्ये काहीही निर्माण झालेले नसल्याने पाश्चात्त्य गोष्टींना विशेष महत्त्व मिळाले. ते तसे मिळणे क्रमप्राप्त होते. आधुनिकतेला अभिमुख होऊ पाहणाऱ्या एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राला व एकूण भारताला दुसरा पर्याय नव्हता." (पृ. १४७)

विद्यापीठामध्ये पदवी व पदव्युत्तर टप्प्यांवर कोणती पुस्तके नेमली जात याची माहिती पाटणकर देतात. पाटणकरांनी दिलेल्या माहितीवरून असे लक्षात येते की, इंग्लंडमधील ऑक्सफर्ड-केंब्रिज या, उच्चभ्रू वरिष्ठवर्गीयांच्या-साठी कार्य करणाऱ्या परंपरानिष्ठ विद्यापीठांमधील विषय व अभ्यासक्रम भारतात उपयोगी नाहीत या निर्णयावर इंग्रज राज्यकर्ते आले. 'औद्योगिक क्रांती'मधून एक नवीन लोकशाहीवादी भांडवलशाही समाज इंग्लंडमध्ये उत्कर्ष पावत होता, जगावर साम्राज्य प्रस्थापित करीत होता. या समाजाचे धुरीणत्व करणाऱ्यांनी, उपयुक्ततावादी भूमिकेमधून, भारतात पाठवावयाच्या प्रशासकांचे शिक्षण करताना जी आखणी केली, तशीच जवळपास येथील नव्या शिक्षणाचीही केली. पाटणकर म्हणतात, "(इंग्लंडमधील) 'ईस्ट इंडिया कॉलेज' व 'मुंबई-विद्यापीठ या दोन्हींच्या अभ्यासक्रमांचा तोंडवळा सारखा आहे हे वरील तुलनेने स्पष्ट होते." (पृ. १५५) भारतातही भांडवलशाही अर्थव्यवस्था, प्रातिनिधिक लोक-नियुक्त राज्यपद्धती (लोकशाही), धार्मिक-सामाजिक सुधारणांकरवी आकारास आलेला प्रागतिक लिबरल समाज या गोष्टी अस्तित्वात येण्याच्या दृष्टीने शिक्षणाच्या क्षेत्रातील ही घडामोड उपकारक होती.

"त्या काळात भारतात नव्याने उदयाला येऊ पाहणारी अर्थव्यवस्था म्हणजे भांडवलशाही होय. तिचे मध्यवर्ती मूल्य म्हणजे व्यक्तिवाद. ते प्रस्थापित करण्यासाठी सरंजामशाही अर्थव्यवस्थेत आणि परंपरागत सामाजिक, धार्मिक, जातीय रूढींमध्ये अनेक शतके बद्ध असलेल्या व्यक्तींना मुक्त करणे आवश्यक होते. त्यासाठी प्रयत्न करणाऱ्यांत रानडे व ग.व्यं जोशी होते. दोघेही विद्याविभूषित वर्गाचे सभासद होते... (सरकारी नोकरीत असले तरी) ते सरकारचे होयबा झाले नाहीत. अनेक बाबतींत ते सरकारचे टीकाकार बनले. इंग्रजांच्या दृष्टीने पाहता त्यांना मिळालेल्या शिक्षणाचा रोख येथील लोकांना भांडवलदारी समाजाचे नागरिक बनविणे हा होता, इंग्रजी साम्राज्यशाहीचे स्तुतिपाठक बनविणे हा नव्हता." (पृ. १७७)

**भाग ३ : साहित्याच्या क्षेत्रातील परिवर्तने**

**मराठीतील समीक्षाव्यवहार :**

"मध्ययुगातील मराठीत आवड-निवड व्यक्त करण्याच्या भाषिक व अभाषिक पद्धती होत्या. इंग्रजीच्या संपर्काने या पद्धतींऐवजी साहित्यकृतीचे विश्लेषण व मूल्यन करणारी समीक्षाविधाने (critical judgements) प्रचलित झाली. सर्वमान्यतेवर (universal acceptability) दावा करणे हे अशा विधानांचे एक तार्किक वैशिष्ट्य. आवडीनिवडींच्या आविष्काराची जागा समीक्षा-विधानांनी घेणे हे प्रगतीचे लक्षण आहे. त्यामुळे व्यक्तींमध्ये कुंठित असलेला समीक्षाव्यवहार सार्वजनिक विनिमयाचा भाग होतो; वेगवेगळ्या व्यक्तींच्या मतांची देवाणघेवाण सुरू होते आणि समीक्षाव्यवहारात अनुस्यूत असलेल्या बौद्धिक कौशल्यांच्या देवाणघेवाणीची शक्यता निर्माण होते व एक साहित्यिक जीवनप्रकार (form of life) निर्माण होतो. तो निर्माण झालेला असणे हे प्रगल्भ समाजाचे एक लक्षण आहे." (पृ. २०२)

"इंग्रजांनी नुसती नवी अर्थव्यवस्था आणली असे नाही. त्यांनी व्यक्तिवादाला अनन्य महत्त्व देणारा एक संपूर्ण सांस्कृतिक संकल्पनाव्यूह आणला होता. खरी स्पर्धा येथील पारंपरिक व्यूह व पाश्चात्त्यांनी आणलेला एक वेगळा व्यूह यांच्यात होती." (पृ. २०३)

"फक्त आवड-निवड व्यक्त करण्याच्या पातळीवर असलेली मराठी समीक्षा इंग्रजी विद्येच्या येथील प्रस्थापनेनंतर तीस-चाळीस वर्षांतच समीक्षा-विधाने करू लागली. इतकेच नव्हे तर त्याविषयी वादही करू लागली... या क्षेत्रात पुरावे कसे द्यायचे, युक्तिवाद कसा करायचा हे ज्या समीक्षेला

कळते ती प्रगल्भ किंवा निदान प्रगल्भावस्थेकडे जाणारी समीक्षा ठरते यात शंका नाही. मराठी समीक्षेने अगदी थोड्या काळात जी प्रगती केली ती लक्षणीय म्हणावी लागेल." (पृ. २०८)

**नव्या युगातील निबंधलेखन**

मुद्रणाची सोय झाल्यावर इथे पुस्तके, नियतकालिके प्रसिद्ध होऊ लागली. यापैकी नियतकालिकांमधील निबंधलेखनाची चर्चा पाटणकरांनी केली आहे. *मराठी ज्ञानप्रसारक* या मासिकाच्या कार्यकर्त्यांच्या व संपादकांच्या उद्देशांविषयी पाटणकर लिहितात, "आपण आज निकृष्टावस्थेत आहोत व सांप्रतचे इंग्रजी राज्याधिकारी वैभवास चढले आहेत; याचे महत्त्वाचे कारण त्यांच्याजवळ विशिष्ट कलाकौशल्ये आहेत, त्यांचा पाया विज्ञानादिकांमध्ये आहे; त्यांची आपल्याला माहिती असणे आवश्यक आहे; ती करून घेणे शक्यतेच्या कोटीतील आहे, कारण प्राचीन काळात जेव्हा अनेक देश अज्ञानादशेत होते तेव्हा आपल्या देशातील लोक उत्तमावस्थेत होते; आज जे नाही ते मिळविण्याची आपल्यात क्षमता आहे; पूर्वी आपल्याकडे जे होते तेवढे मात्र पुरणार नाही, कारण पूर्वीच्या आपल्या व आजच्या इंग्रजांच्या ज्ञानात फार मोठा फरक आहे; आपल्याला आजचे इंग्रजी ज्ञान प्राप्त करून घ्यायचे आहे. या उद्देशांतून जी मन:स्थिती व्यक्त होते तिच्यात आजकालच्या आपल्यातील त्रुटींची जाणीव व प्राचीन परंपरेचा अभिमान हे दोन्ही घटक दिसतात." (पृ. २१०)

अर्थशास्त्रीय विषयांवर *मराठी ज्ञानप्रसारक* मध्ये प्रसिद्ध होणाऱ्या लेखनाचा परिचय करून दिल्यावर पाटणकर लिहितात, "एक नवा संकल्पनाव्यूह ते इकडे आणीत आहेत. तो जेत्यांचा संकल्पनाव्यूह आहे आणि ते त्यानुसार विचार करतात व धोरणे आखतात, केवळ या कारणामुळेच तो इकडे आणणे आवश्यक आहे इतकेच नाही; हा नव्या युगाचा आर्थिक-राजकीय विचारव्यूह आहे; आपली इच्छा असो वा नसो, आपण आधुनिक युगात फेकलो गेलो आहोत; तेव्हा नव्या विचारव्यूहांचा चांगला परिचय होणे आपल्याला अत्यंत आवश्यक आहे; आपल्या परिस्थितीचे आपले आकलन व तिच्या बाबतची आपली धोरणे या व्यूहांवर अवलंबून आहेत, आणि त्याचमुळे नव्या ज्ञानाचा प्रसार व्हावा म्हणून नवसुशिक्षित पोटतिडिकीने इतके प्रयत्न करीत होते." (पृ. २१६) पाटणकर लिहितात, "त्या काळातील तरुणांनी सुरू केलेल्या ज्ञानप्रसारक चळवळींचा व इंग्रजी पद्धतीच्या शिक्षणाचा जवळचा संबंध असल्याचे स्पष्ट होते." (पृ. २१९) "सामूहिक विचारप्रक्रियेची एल्फिन्स्टन शिक्षणसंस्थेमध्ये सुरूवात व्हावी, त्यातून याच सामूहिक प्रक्रियेचा विस्तार म्हणून पहिल्या मासिकाचा जन्म व्हावा हा केवळ योगायोग नव्हता. नव्या युगाच्या आगमनाचे ते एक प्रातिनिधिक चिन्ह होते. यातून जाणीवपूर्वक सुरू करून वाढत्या सामर्थ्याने चालणाऱ्या वेगवेगळ्या सामाजिक, शैक्षणिक, राजकीय, चळवळी सुरू झाल्या हेही त्याच प्रकारचे चिन्ह होय." (पृ. २२४)

विविधज्ञानविस्तार या नियतकालिकामध्ये १८९८ साली आलेल्या एका लेखाचा पुढील काही भाग पाटणकरांनी उद्धृत केला आहे. "युरोपखंडांत सन १४५३ सालीं 'रिनेसान्स' म्हणून ज्ञानाचा जो पुनर्जन्म झाला तोच इंग्लिश सरकारचा अंमल या देशांत झाल्यापासून इकडे झाला आहे. बुद्धीला व मनाचे व्यापाराला जें चालन युरोपखंडांत मिळालें तेंच चालन इंग्लिश राज्यामुळें या देशीं मिळालें." याच लेखकाने पुढे असे म्हटले की, "आमच्या इकडे आम्हांला दोन ज्ञानभंडारें एकाच काळीं प्राप्त झालीं असें म्हटलें पाहिजे." आपले प्राचीन ज्ञानभांडार इंग्रजी भाषेच्या द्वारा उपलब्ध झाले याचाही निर्देश लेखकाने केला. (पृ. २३५-२३६) प्राचीन संस्कृत ग्रंथांची भाषांतरे त्या काळच्या नियतकालिकांत प्रसिद्ध होत. तसेच इतिहास निवेदन करणारे लेखनही येई. पाटणकर म्हणतात, "आपण काय आहोत व काय होतो हे शोधण्याचा हा प्रयत्न आहे... प्राचीन भारतीय परंपरेशी जवळीक राखायची पण आजच्या आपल्या सर्वांगीण उन्नतीसाठी पाश्चात्त्यांकडून जे घेण्यासारखे आहे ते सर्व घ्यायचे असा एकोणिसाव्या शतकातील सुशिक्षितांचा प्रयत्न होता हे उघड आहे. त्यात स्वाभिमान व आत्मविश्वास हे गुण जसे आहेत, तसे नवे शिकण्याची तीव्र इच्छा, नवी कौशल्ये आत्मसात करण्याची जिद्द आहे; आपण कशात तरी कमी पडलो म्हणून आपला पराभव झाला, आपल्यातल्या उणिवा काढून टाकायला हव्यात असा निग्रह आहे. आपल्याकडे एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर नुसता रनेसान्स सुरू झाला असे नाही, तर रिफर्मेशन व एन्‌लायटनमेंट या चळवळीही सुरू झाल्या. म्हणूनच एकाच वेळी आपल्याला स्वतंत्र झालेल्या मानवी मनाचा विविध क्षेत्रांतील दिमाखदार विलास, बहुतेक सामाजिक-धार्मिक



अनुक्रमणिका

सुधारणांच्या मुळाशी असलेला व्यक्तिवाद आणि लोकभ्रमांचा नाश करायला सज्ज झालेला ऐहिक क्षेत्रातील बुद्धिवाद या सर्वांचा प्रत्यय या काळात येतो."(पृ. २३८)

**मराठी कादंबरी**

इंग्रजी साहित्याच्या परिचयाने व प्रभावाखाली साहित्य-समीक्षा प्रगल्भ झाली. नवे साहित्यप्रकार हाताळले जाऊ लागले. वास्तवदर्शनात्मक कादंबरीपर्यंत आम्ही मजल मारली होती. पाटणकर लिहितात, "आमच्या नसलेल्या अशा एका परंपरेतून आम्ही अनेक गोष्टी घेतल्या; त्यांच्या साहाय्याने आमचे वैचारिक, धार्मिक, अर्थशास्त्रीय, समाजशास्त्रीय, साहित्यिक संसार उभे केले; त्यांना अस्सल भारतीय, महाराष्ट्रीय म्हणणे योग्य आहे का?.... परदेशी परंपरेतून काय घेतले असता, त्यातून निर्माण केलेल्या गोष्टीतील अस्सलपणाला धक्का लागणार नाही, आणि इतर काय घेतल्यास असा धक्का लागेल? – हे व अशासारखे इतर प्रश्न साधारणतेच्या (generality) पातळीवर नेऊन इतिहासाचार्य वि.का. राजवाडे यांनी आपल्या 'कादंबरी' या सुप्रसिद्ध निबंधात मांडले आहेत... राजवाड्यांच्या लेखाला देशीयता आणि देशीवाद यांचे मराठीतील एक विस्तृत, समर्थ व पहिले प्रतिपादन म्हणायला हवे." (पृ. २५२-२५३) राजवाड्यांची युयुत्सू देशीवादी भूमिका पाटणकरांनी उचलून धरली आहे. राजवाड्यांचा जो उतारा त्यांनी उद्‌धृत केला आहे त्यातला काही भाग असा आहे : "प्रस्तुत काली सहृदय असे शिकलेले लोक पाहावे तर ते उच्च प्रतीच्या युरोपियन कादंबऱ्याच वाचण्यात गुंग झालेले दिसतात... ह्या लोकांना मराठी कादंबऱ्या वाचण्याला जो लावील व त्या वाचल्या नाहीत तर उत्कृष्ट विचारांना आपण मुकू असे जो भासवील तोच उत्कृष्ट कादंबरीकार या पदवीला प्राप्त होईल." यासाठी लेखकापाशी कोणते गुण हवेत? राजवाडे लिहितात, "तेव्हा उत्तमोत्तम कादंबरीकार व्हावयाचे म्हणजे मनोवृत्ती अशी अत्यंत जाज्वल्य पाहिजे. श्रेष्ठ विद्या, विस्तृत वाचन, मोठा प्रवास, तीक्ष्ण निरीक्षण, कडक परीक्षण, थोर औदार्य, गाढ सहानुभूती व नाटकी लेखणी हे गुण तर नाव घेण्यासारख्या प्रत्येक कादंबरीकारात हवेतच. परंतु सर्वांत मुख्य गुण म्हटला म्हणजे जाज्वल्य मनोवृत्ती हवी." (पृ. २५३) १९०२ साली त्यांनी लेख लिहिला त्यावेळपावेतोच्या मराठी ग्रंथोत्पत्तीविषयी राजवाडेंचे पुढील उद्‌गार पाटणकरांनी उद्‌धृत केले आहेत : "पण ही ग्रंथोत्पत्ती आमच्या अस्सल् प्रतिभेची अस्सल प्रजा नव्हे... आमचा आत्मा, आमचा स्वभाव, आमचा उत्साह, आमची महत्त्वाकांक्षा, आमचा पुरुषार्थ ह्या नकलेत नाही." (पृ. २५३)

पाटणकरांनी प्रा. भालचंद्र नेमाडे यांच्या देशीयतेवरील मांडणीचा परामर्श घेतला आहे. राजवाड्यांच्या मांडणीतील 'आमचा' हा शब्द वेगळ्या अंगाने नेमाड्यांच्या मांडणीत मध्यवर्ती आहे. नेमाड्यांच्या मांडणीवरील आक्षेप नमूद केल्यावर (पृ. २६२-२६४) पाटणकर पुढील प्रश्न उपस्थित करतात (व विचारासाठी घेतात). "येथे प्रश्न निर्माण होतो तो हा, की 'आपली' (स्वतःची प्रमाणके) म्हणजे कोणाची? या प्रश्नाचे उत्तर देणे सोपे नाही, कारण तो देशाच्या अस्मितेच्या (identity) प्रश्नात अडकलेला आहे. हा प्रश्न तत्त्वज्ञानात्मक आहे... कोणत्याही समूहाची अस्मिता कशात असते? आणि काय झाले असता ती ओळखू न देण्याइतकी बदलते?" (पृ. २६४)

व्यक्तीची अस्मिता आयुष्यभरात तीच एक राहात नाही. हीच गोष्ट समाजाची. या संदर्भात पाटणकर लिहितात, "*आजचे आपण* पाश्चात्त्य संस्कृतीशी द्वंद्वात्मक संबंध राखल्या-मुळे संस्कारित झालेल्या *कालच्या आपणचे* रूप आहोत; आणि आजचे संस्कारित आपण *उद्याच्या आपणचे* जन्मदाते आहोत."(पृ. २६६) 'राष्ट्र' ही संकल्पना व त्यासोबत येणारी जाणीव आपल्याला अठराव्या शतकाच्या शेवटापर्यंत प्राप्त झाली नव्हती. इंग्रजांच्या 'मध्यस्थी'ने आपल्या ठायी ही जाणीव उत्पन्न झाली. हीच गोष्ट 'व्यक्तिवादा'ची. "व्यक्ति-वादाच्या, आधुनिकतेच्या व ऐहिकतेच्या दृष्टीने पाहता पाश्चात्त्य विद्याशाखा व साहित्य आपल्यापेक्षा पुष्कळ पुढे आहेत; त्यांची तेथील परंपरा खूपच जास्त जुनी आहे. ...आमची *या क्षेत्रातील* परंपरा एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धाच्या मागे जात नाही.... तेव्हा आपण पाश्चात्त्यांचे अनुकरण करतो यात अस्वाभाविक काहीच नाही." (२६८-२६९) असे म्हणून पाटणकर म्हणतात की, अनुभव जर आपला असला तर आपली निर्मिती अस्सल ठरेल. मग आपण संकल्पना परदेशांमधून घेतल्या तरी त्याने काही बिघडत नाही. आमची निर्मिती देशी ठरण्यात काही बाधा येत नाही.

"पाश्चात्त्यांमुळे झालेल्या या नव्या दर्शनाने आम्ही स्तिमित झालो, पण भांबावलो किंवा गलितगात्र झालो नाही...

अनुक्रमणिका

आम्हांला नव्या जगाच्या उंबरठ्याशी त्यांनी (इंग्रजांनी) आणून सोडले आणि येथील जीवन काही प्रमाणात बदलले. या सर्वांबाबतची भारतीयांची प्रतिक्रिया प्रगल्भ होती." आर्थिक, वैचारिक, राजकीय विषयांत इंग्रजांनी परस्पर निर्णय केले, जे येथील नवशिक्षित लोकांनी विनासंकोच पूर्णतः स्वीकारले. पाटणकरांच्या म्हणण्याप्रमाणे, साहित्याबद्दल मात्र ते बरेच चोखंदळ होते. "आपल्याकडे ऐहिक जीवनाबद्दलचे साहित्य – विशेषतः गद्यात्मक साहित्य – नाही हे लक्षात येताच ही वाण भरून काढण्याच्या प्रयत्नास ते लागले. नवे गद्य साहित्यप्रकार बाहेरून आणले, आपले प्रश्न सोडविण्यासाठी वापरता वापरता त्यांना आपलेसे केले. हे सर्व करण्याची शक्ती आमच्यात होती व आजही आहे. आमचा तेजोभंग (loss of nerve) इंग्रजी शिक्षण व साहित्य यांच्या संपर्कानंतर पहिली पन्नाससाठ वर्षे तरी झाला नाही." असे म्हणून पाटणकर शेवटी म्हणतात, "आजही आम्हांला राजवाड्यांच्या देशीवादाची गरज आहे... जोपर्यंत अनुभवाच्या आकलनाचे, व्यवस्थापनाचे स्वतंत्र संकल्पनाव्यूह आमच्याकडे स्वतंत्रपणे निर्माण होत नाहीत तोपर्यंत नव्या युगात आमच्या आधी काही शतके पोचलेल्या पाश्चात्त्यांची मदत घेणे अपरिहार्य ठरणार आहे. जोपर्यंत मराठी ही ज्ञानवाहक भाषा आहे तोपर्यंत तिला दुय्यम स्थानच मिळणार. जेव्हा ती ज्ञानोत्पादक भाषा होईल तेव्हा हे चित्र पूर्णपणे बदलेल. जे ज्ञानाबद्दल खरे आहे. ते इतर संकल्पनाव्यूहांविषयीही खरे आहे." (पृ. २७१-२७२)

पाटणकरांचे असे मत आहे की, इंग्रजी अंमलामुळे येथे आर्थिक-वैधानिक-राजकीय, शैक्षणिक व साहित्यिक (ललित व वैचारिक) क्षेत्रांत क्रांतिकारक परिवर्तने घडून येण्यास आरंभ झाला. मात्र विसाव्या शतकाच्या आरंभानंतरच्या काळात त्यांचा जोम ओसरला; ती क्षीण बनली. हे कां घडले?, हा प्रश्न उपस्थित होतो.

ब्रिटिशांना येथे अशी सर्वांगीण समर्थ क्रांती घडून यायला नको होती, किंवा आपल्या समृद्ध वारशाचा व परंपरांचा विसर पडेल असे त्यांनी आमचे मानस घडविले, ही कारणमीमांसा त्यांना योग्य व यथार्थ वाटत नाही.

पाश्चात्त्य समाजांचे उत्थान व परिवर्तन ज्या मूल्यांमुळे घडून आले त्यांपैकी व्यक्तिवाद हे मूल्य आपल्याकडे अगदीच आढळत नव्हते असे नाही. एकोणिसाव्या शतकात 'रनेसान्स', 'रेफर्मेशन' व 'प्रबोधन' या तिन्ही चळवळी येथे आकारास आल्या. पण 'भांडवलशाहीचा मूलाधार' नसल्यामुळे या चळवळींमधून उत्कर्ष पावलेला व्यक्तिवाद अखेरीस सर्वांगीण परिवर्तन व उत्थान घडवून आणण्यात अयशस्वी ठरला. *पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास* या पुस्तकात प्रा. मे.पुं. रेगे यांनी आधुनिककालीन व्यक्तिवादाचे वैशिष्ट्य एका ठिकाणी विशद केले आहे. तो उतारा उद्धृत करून पाटणकर पुढे म्हणतात, "आपल्या दुर्दैवाने आपल्याकडे ही वाटचाल अजूनही अपुरी राहिलेली आहे." (पृ. २६०)

निर्बंधरहित व्यक्तिवाद व भांडवलशाही व्यवस्था परस्परांना आणखी चालना देतात व परस्परांची पुष्टी करतात. यामधून समर्थ आधुनिक समाजाची निर्मिती होते. पाटणकरांच्या मते व्यक्तिवाद व भांडवलशाही यांची अशी परस्परसंवर्धक सांगड येथे बसली नाही, व त्यामुळे क्रांती अपूर्ण राहिली.



हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




